# A TREATISE

ON

# HUMAN ANATOMY;



COMPILED FROM THE ENGLISH,

BY

BHICAJEE AMROOT,

GRADUATE OF GRANT MEDICAL COLLEGE,

SUB-ASSISTANT SURGEON IN THE JAMSETJEE JEJEEBHOY HOSPITAL,
TEACHER OF ANATOMY AND PHYSIOLOGY TO THE VERNACULAR CLASS
GRANT MEDICAL COLLEGE

Bombay:

PRINTED AT THE "INDU PRAKASH" PRESS

1863.

TO

# JOHN PEET, M.D.,

SURGEON MAJOR, BOMBAY ARMY, FELLOW OF THE ROYAL COLLEGE OF PHYSICIANS, PRINCIPAL AND PROFESSOR OF MEDICINE, AND FORMERLY PROFESSOR OF ANATOMY, GRANT MEDICAL COLLEGE, SURGEON TO THE JAMSETJEE JEJEEBHOY HOSPITAL;

WHO FIRST SUCCESSFULLY TAUGHT ANATOMY IN THIS PRESIDENCY.

This Work is Dedicated,

**As a humble token of deep gratitude for many acts of kindness received at his hands; of sincere respect for his high professional attainments; and in admiration of his zeal in the promotion of Native Education, and his exertions for the introduction of Vernacular Medical Instruction into this Presidency,**

BY HIS HUMBLE AND OBEDIENT SERVANT,

THE AUTHOR.

885

# PREFACE.

THE present work is a compilation in the Marathi language, from Modern English works on Anatomy, and is the substance of thirty-six lectures delivered to the Vernacular Class in Grant Medical College.

The Parts which have an important practical bearing on Medicine, Surgery, and Physiology, are fully described, whilst the other parts are more cursorily noticed. With the exception of Ossification of Bones, no subject has been altogether omitted.

With respect to nomenclature, the English terms are chiefly used, the equivalent words in Marathi being also given when possible. The Sanscrit renderings for bone, ligament, muscle, artery, vein, lymphatic, nerve, organ of sense, viscus, &c., have been taken from Dr. McLennan's Marathi work on Anatomy; but when words which are more generally understood could be found, they have also been employed or substituted.

In the description of certain parts, the expediency of using the English names, in preference to the Marathi, is obvious. For example, the inner bone of the leg, or the tibia, is, from its position, called in Sanscrit 'Anter Junghasthee;' but the English word tibia is used in the description, because some of the arteries, veins, nerves, and muscles of the leg are named after it, and are thus readily called to mind and easily remembered. With a view to facilitate the study of important English words, a Glossary has been appended.

The writer is fully aware of the imperfections of the work; but the plan which was adopted of writing each chapter in

English and subjecting it to the inspection of the Professor of Anatomy in Grant Medical College, after which the translation was proceeded with, is calculated to prevent any error of importance.

At the desire of Government, the translation was forwarded to the office of the Marathi translator to Government for revision, and was revised there by Mr. Vishnu Parashram Shastri, Translation Exhibitioner.

The Illustrations are mostly copied from English works; each is accompanied by a short description, and is placed as nearly as possible in connection with the corresponding text.



# मानुष शारीर शास्त्र.



हा ग्रंथ,

इंग्रजी ग्रंथांच्या आधारानें

भिकाजी अमृत,

ग्र्याजुएट आफ्‌धी ग्र्यांट मेडिकल् कालेज, जमसेटजी जिजी भाई
नामक इस्पितळाचे सब् आसिस्टंट सर्जन, आणि शारीर
शास्त्र व इंद्रियविज्ञान शास्त्र ह्यांचे मराठी वर्गाचे
शिक्षक ग्र्यां० मे०का०

ह्यांनीं केला




तो

मुंबई येथें

इंदुप्रकाश छापखान्यांत छापिला.

माहे आक्टोबर
सन् १८६३ इसवी.
शालीवाहन शके १७८५.

मेहेरबान जान पीट साहेब बहादूर एम्.डी.

मुंबई खात्याच्या लष्करा पैकीं सर्जन मेजर;

रायल कालेज आफ् फिजीशियन्स नामक

विद्यालयाचे फेलो;

ग्यांट मेडिकल् कालेजाचे प्रिन्सिपाल्, वैद्यशास्त्राचे गुरु,

आणि शारीर शास्त्राचे मार्जीगुरु; जमसेटजी

जिजीभाई नामक इस्पितळाचे सर्जन.

ज्यांनीं

ह्या इलाख्यांत शारीर शास्त्र शिक्षणास मूळ आरंभ करून तें कार्य सिद्धीस नेलें;

त्यांस

त्यांचा नम्र व आज्ञाधारक सेवक ग्रंथकर्ता ह्यानें त्यांनीं अनेक कृत्यांच्या द्वारें जी आपणावर कृपा दर्शविली तिच्या कृतज्ञतेचें; त्यांची वैद्य शास्त्रांत जी अति प्रविणता तिज विषयींच्या आपल्या मनांतील सन्मानबुद्धीचें; आणि एतद्देशीय लोकांत विद्यावृद्धि करण्यांत उत्कंठेच्या व ह्या इलाख्यांत महाराष्ट्र भाषेंत वैद्यशास्त्र शिकविण्याचें काम चालू करण्या विषयीं त्यांच्या श्रमाच्या साल्हादाश्चर्याचें किंचित् दर्शक म्हणून हा ग्रंथ अर्पण केला असे.

ग्रंथकर्ता.

# प्रस्तावना.

इंग्रजींत शारीरावर जे अर्वाचीन ग्रंथ आहेत, त्यांच्या आधारानें हा संक्षिप्त ग्रंथ महाराष्ट्र भाषेंत तयार केला आहे. ग्रांत मेदिकल् कालेजांत मराठी वर्गास जीं ३६ व्याख्यानें दिलीं, त्यांचा सारांश हें भाषांतर आहे. शस्त्रविद्या, वैद्यक, अथवा इंद्रियविज्ञान शास्त्र ह्यांत ज्या भागांचा विशेष उपयोग आहे, त्यांचें वर्णन सविस्तर केलें आहे, आणि बाकीच्या भागांचें वर्णन संक्षिप्त केलें आहे. अस्थिभवनाच्या विषया खेरीज कोणताच विषय अगदीं गाळला नाहीं.

ह्या ग्रंथांत बहुतेक ठिकाणीं वर्णनांत इंग्रजी शब्द ठेवले आहेत, व त्यांच्या पर्यायाचे मराठी शब्द जितके सापडले तितके दिले आहेत; अस्थि, संधिबंधन, स्नायु, धमनी, शीर, शोषक वाहिनी, ज्ञानेंद्रिय, अंतरवयव इत्यादि संस्कृत शब्द इंग्रजी शब्दां बद्दल दाक्तर मेक्लेनन साहेबांच्या मराठी ग्रंथांनून घेतले आहेत, परंतु अधिक रूढींत असणारे शब्द जेथें सापडले, तेथें तेही दिले आहेत. असे शब्द कोठें कोठें त्या ग्रंथांतल्या शब्दां बद्दल ही दिले आहेत.

बहुतेक भागांच्या वर्णनांत मराठी शब्दां बद्दल इंग्रजी शब्द देण्याचा उपयोग स्पष्ट आहे; उदाहरण, जंघेचें आंतलें अस्थि ज्याला इंग्रजींत तिबिया असें म्हणतात, त्यास त्याच्या स्थानावरून संस्कृतांत अंतर्जंघास्थि म्हटलें आहे, परंतु वर्णनांत तिबिया हा इंग्रजी शब्द ठेविला आहे, कारण जंघेच्या किती एक धमन्या, शिरा, मज्जातंतु, आणि स्नायु, ह्यांस त्या अस्थीच्या इंग्रजी नांवांवरून नांवें दिलेलीं आहेत, म्हणून तीं सहज लक्षांत राहण्याजोगीं व आठवण्या जोगीं आहेत,

ग्रंथामध्यें जे इंग्रजी, ल्याटिन वगैरे शब्द आले आहेत, त्यांपैकीं मुख्य मुख्य उपयोगाचे जे शब्द आहेत, त्यांचा अर्थ समजण्याकरितां ग्रंथाच्या शेवटीं अर्थासहित त्यांचा कोश केला आहे.

ह्या ग्रंथांत पुष्कळ न्यूनता आहे, ती ग्रंथ कर्त्यास पूर्तेपणीं माहीत आहे. प्रत्येक भागाचें वर्णन प्रथमतः इंग्रजींत लिहून ग्रांत मेदिकल् कालेजांतले

शारीर शास्त्राचे गुरु ह्यांस दाखवून नंतर हें भाषांतर केलें आहे, त्यामुळें ह्यांत मोठीशी चूक राहण्याचा संभव नाहीं.

सरकाराच्या इच्छे वरून सरकारचे मराठी त्रान्सूलेतर ह्यांच्या आफिसांत हें भाषांतर तपासण्या करितां पाठविलें होतें, तेथें तें रा० रा० विष्णु परशराम शास्त्री त्रान्स्लेशन एक्झिबिशनर ह्यांनीं तपासलें.

ह्या ग्रंथांतील बहुतेक आकृतींखालीं टीपा लिहिल्या आहेत, आणि जी आकृति ज्या भागाची आहे, त्याच्या वर्णना लगत ती आणवेल तितकी आणली आहे.

# मानुष शारिराची अनुक्रमणिका

---

# सूचना.

कोणताही विषय शिकविण्यास आरंभ करण्यापूर्वी शिकणारांस त्याचाप्रकार व स्वरूप स्पष्टकरून सांगण्याचा सांप्रदाय आहे. तेव्हां तुह्मी महाराष्ट्र भाषेंत शारीरपढणार, सबब तुमच्या अभ्यासाची मर्यादा व त्याचें स्वरूप तुह्मांस विदित करणें जरूर आहे.

शारीर हा विषय तुह्मांस शिकणें आहे. ह्या विषयाचें महत्व कितीहि वाढवून सांगितलें तरी थोडेंच. ही विद्या वैद्यकाचा मूळ पाया होय. हिजपासून परमेश्वराची साधन व परिणाम ह्यांमधील जुळणी दिसून येते, निरनिराळे इंद्रियांची स्वाभाविक स्थिति समजते, आणि रोग व आरोग्य ह्यांतील भेद करणें सुलभ होतें. शरीराच्या निरनिराळ्या भागांची व इंद्रियांची रचना, स्थान, घटना, व आरोग्यस्थितीमध्यें नानाप्रकारचीं कृत्यें करण्याची त्यांची योग्यता हें दाखविणें हें ह्या विद्येचें काम आहे, असें ह्मटलें असतां बरेंच स्पष्टीकरण होईल असें वाटतें. रोगाची माहिती होण्यास शरीराच्या सर्व भागांच्या स्वाभाविक स्थितीविषयीं माहिती असणें अवश्य आहे; आणि ती माहिती शारीरापासूनच होणार, तेव्हां ह्या विद्येची माहिती नसतां आपणास वैद्यक, शस्त्रविद्या, अथवा सुप्रसवकारी विद्या ह्यांचें पूर्ण ज्ञान आहे असें कोणाच्यानें ह्मणवणार नाहीं. तुमचा अभ्यास वाढला ह्मणजे वैद्यास, व विशेषें करून शस्त्रवैद्यास, रोग दूर करण्याविषयीं ही विद्या किती उपयुक्त आहे, हें उत्तरोत्तर तुह्मांस समजून येईल.

आतां आपण जो अभ्यासक्रम चालविणार तो येणेंप्रमाणें :—

१ **अस्थि**, २ **संधिबंधनें**, ३ **स्नायु**, ४ **रक्तवाहिन्या** (धमन्या व शिरा), **उदक वाहिन्या**, ५ **मज्जातंतु**, ६ **ज्ञानेंद्रियें**— त्वगिंद्रिय, चक्षुरिंद्रिय, श्रोत्रेंद्रिय, रसनेंद्रिय, घ्राणेंद्रिय — ७ **अंतरावयव**, ८ **शस्त्रविद्यासंबंधी शारीराचा विचार**.

शिकविण्याचा क्रम चालवितानां, जे भाग वैद्यकांत अथवा शस्त्रविद्येंत फार उपयोगी आहेत, त्यांकडे अधिक लक्ष दिलें जाईल; सर्व भागांच्या बारीक

रचने विषयीं सरासरी विचार केलाजाईल; व अस्थिभवन विषय विशेष महत्वाचा नसल्यामुळें सोडलाजाईल.

शरीराचें वर्णन कर्ते वेळीं, वर, खालीं, पुढें, मागें, आंत, बाहेर, इत्यादि शब्दांचा उपयोग करतात, त्यांचा नीट बोध होण्याकरित। मनुष्य उभा आहे असें मनांत आणावें; दोन्ही हात कुशीवरून खालीं लोंबत आहेत, आंगठे बाहेर वळलेले, आणि पाय जुळलेले आहेत, असें कल्पावें. आतां, वर सांगितलेल्या शब्दांपैकीं वर, खालीं, पुढें, मागें, हे शब्द शरीराच्या वर दिलेल्या स्थितीच्या संबधानें घ्यावे. परंतु, आंत आणि बाहेर ह्या शब्दांचा उपयोग समजण्याकरितां शरीराच्या मध्यभागांतून जाणारी एक रेषा आहे असें समजावें, आणि कोणत्याही भागाचें वर्णन करतांना तिच्या जवळच्यास आंतील, व अंतरावर असणाऱ्यास बाहेरील, ह्मणावें.



# मानुषशारीर.

## भाग पहिला.

### अस्थीविषयीं सामान्य विचार.

अस्थि शरीराच्या सर्व भागांहून कठीण आहेत, व त्यांच्या आंगीं कांहीं चिवटपणा व स्थितिस्थापकता असते. हीं ताज्या स्थितींत बाहेरून तांबूस पांढऱ्यारंगाचीं व आंतून तांबड्या रंगाचीं असतात. अस्थींमध्यें प्राणिज आणि पार्थिव असे दोन घटकांश असतात. म्यूरियातिक अथवा नैत्रिक असिदाच्या मंद द्रावणामध्यें अस्थि भिजत घातलें असतां त्यांतील पार्थिवांश निराळा होतो, अथवा अस्थीस उष्णतेची फार आंच देऊन प्राणिजांश नाहींसा केला असतांही पार्थिवांश निराळा होतो. अस्थींमध्यें प्राणिज $\frac{1}{3}$ अंश व पार्थिव $\frac{2}{3}$ अंश, ह्याप्रमाणें असतात.

**अस्थींची घटना.** प्राणिज अंश .. जलतीन व रक्तवाहिन्या ३३.३०.

| | | |
|---|---|---|
| पार्थिव अंश | फासफेत आफ लैम ...... | ५१.०४ |
| | कार्बोनेत आफ लैम ...... | ११.३० |
| | फ्लूओरैद आफ क्याल सियम .. | २.०० |
| | फासफेत आफ म्याग्निशिया .. | १.१६ |
| | सोडा व क्लोरैद आफ सोदियम (मीठ) | १.२० |
| | | १००.०० |

बाल्यावस्थेंत अस्थींमध्यें बहुतकरून अर्धा प्राणिजांश असतो. वृद्धावस्थेंत पार्थिवांश जास्ती असतो.

अस्थींच्या परिच्छेदिलेल्या भागांची परीक्षा केली असतां, त्यांचा बाह्य भाग हस्तिदंतासारखा घट्ट व अंतर्भाग स्पंजासारखा विरळ आहे असें दिसतें. अस्थि पेरियास्तियम नामक एक्या फैब्रसत्वचेच्या पडद्यानें आच्छादिलेलीं आहेत.

अस्थींचे लांब, अखूड, चापट व अनियमित असे चार वर्ग केले आहेत. अस्थींस रक्तवाहिन्या, शोषकवाहिन्या, व मज्जातंतु ह्यांचा पुरावा आहे.

## अस्थिपंजर. स्केलितन.

अनेक अस्थींच्या जुळणी पासून अस्थिपंजर हा शरीराचा एक दृढ भाग झाला आहे. त्यास नानाप्रकारच्या गति देणारे स्नायु जागोजाग बद्ध झाले आहेत. सर्व अवयवांस आश्रय त्याचाच आहे. सर्व भागांचें जीवित्व राहण्याकरितां आणि मनोविचारानें व त्या खेरीजहीं चलनवलनादि व्यापार चालण्या करितां मज्जातंतु व रक्तवाहिन्या इहीं करून ते सर्व भाग व्याप्त केले आहेत. आणि त्या सर्वांच्या रक्षणार्थ त्वचेचें वेष्टन आहे. नाजूक अवयव व इंद्रियें ह्यांस बाहेरील अपघातापासून इजा होऊं नये ह्मणून त्यांची स्थापना ह्या पंजराच्या अत्यंत दृढभागांत चांगलें रक्षण होण्याजोग्या स्थितींत केली आहे. मस्तकांत **मेंदु** व कण्याच्या नळांत **स्पैनलकार्द** ह्यांत सर्व शरीराचे मज्जातंतु संपतात. मस्तका खालीं **छातीमध्यें हृदय व फुप्फुस** आहेत व मोठाल्या रक्तवाहिन्यांचा आरंभ होतो. नंतर **उदरामध्यें पक्काशय, आंतडीं, काळीज, प्लीहा, मूत्रपिंड, मूत्राशय** आणि स्त्रियांच्या शरीरामध्यें **गर्भाशय** असे आहेत. धडाच्या वरच्या बाजूस हात आणि खालच्या बाजूस पाय जोडिले आहेत.

## कणा. "स्पैन."

**कणा** हा अस्थिपंजराच्या सर्व भागांच्या अगोदर असून फार महत्वाचा आहे, ह्मणून ह्याचें वर्णन अधीं केलें पाहिजे.

**कणा** हा दोहों शेवटांकडे बारीक आहे; व तो एकसारखा सरळ नाहीं हा **शिरपृष्ठास्थी** पासून **गुदास्थी पर्यंत** निरनिराळ्या तुकड्यांनीं ह्मणजे मणक्यांनीं झाला आहे. हा मानेंत पुढें आला आहे. छातींत मागें झुकलेला आहे. पुनः पोटांत पुढें आला आहे. मग खालच्या पोटांत मागें सरून गुदा जवळ पुढें येऊन संपला आहे. वर मस्तकास, खालीं, खालच्या व वरच्या पोटास आणि बाजूस फासळ्यांस कण्याचा आधार आहे. हा चोवीस **मणके जुळून**

## कणा: बाजूचें अंग.


१ अत्लस
२ आक्सिस.
३
४
५
६
७
मानेचे मणके
१
२
३
४
५
६
७
८
९
१०
११
१२
पाठीचे मणके
१
२
३
४
५
कमरेचे मणके
सेक्रम
कॉक्सिक्स.

झाला आहे. खेरीज दुसरे **मणके** मिळून **सेक्रम** आणि **काक्सिक्स** अशीं दोन आस्थि झालीं आहेत. ते दोन **खोटेमणके** धरून एकंदर सव्वीस **मणके** आहेत. त्याचें पुढचें आंग सपाट आहे, परंतु बाजूचें व मागलें आंग पक्षतुल्य व कंटकतुल्य भागांमुळें खरबरीत व विषम आहे. त्यास पुष्कळ छिद्रें आहेत, त्यांतून मज्जातंतु व रक्तवाहिन्या बाहेर येतात व आंत जातात. त्यास पुष्कळ स्नायुबद्ध आहेत. **कण्याची** दृढता उत्तरोत्तर खालीं वाढत जाते. **मणके** लवचिक पदार्थानें एकमेकांशीं जडलेले आहेत, आणि प्रत्येक **मणक्याची** गति थोडी परंतु सर्व **कण्याची** गति बरीच आहे. **कण्याचे** तीन विभाग आहेत; **मानेचा, पाठीचा** व **कमरेचा**. कण्यांत एक लांब नळ आहे.

## मणके. " वर्तिब्री. "

साधाणर वर्णन.

**मणक्यास आंग** व **कमान** असे दोन भाग आहेत. ह्या दोहोंतून **४ कर्णतुल्य, २ पक्षतुल्य** आणि एक **कंटकतुल्य** असे **सात** भाग निघतात. त्याचें **आंग** व **कमान** मिळून **चक्र** होतें. ह्या शिवाय मणक्यांस **खांचा, देंठ** व **पडदे** आहेत. **चक्रें** एकमेकांशीं मिळून **स्पैनलकार्ड** जाण्यास व तिचें संरक्षण होण्यास एक नळ होतो.

**मणक्याच्या** आंगाची पुढची बाजू गोलबाह्य आहे, व तिजवर अडवी खांच आहे; मागल्या आंगास गोलांतरता आहे; तिच्या योगानें कण्याचा नळ होतो; वरच्या व खालच्या आंगास मणके चापट आहेत, आणि शेजारच्या मणक्यांशीं लवचिक पदार्थानें व कूर्चेनें जुळतात. **पडदे** दोन **देंठांनीं** मणक्याच्या मागल्या आंगापासून निघतात. देंठाच्या वरल्या व खालच्या भागांस खळगे आहेत, त्यांस **मणक्यांमधील खांचा** ह्मणतात. **कंटकतुल्य भाग** पडद्यांच्या जुळणी पासून निराळा आहे. पडद्या पासून मणक्याच्या दोन्हीं बाजूंस **पक्षतुल्यभाग** निघतात. **कर्णतुल्यभाग** चार आहेत दोन वर व दोन खालीं. हे शेजारच्या मणक्यांशीं जुळण्यासतव योजिले आहेत.

कण्याच्या प्रत्येक प्रदेशांत हे पुढील मणके आहेत.

**कणा** } **मणके** {
- खरे {
  - ७ मानेचे — सरवैकल.
  - १२ पाठीचे — दार्सल.
  - ५ कमरेचे — लंबर.
- खोटे {
  - १ त्रिकास्थि — सेक्रम.
  - १ गुदास्थि — काक्सिक्स.

## मानेचे मणके. सर्वैकल वर्तिब्री.

मानेच्या मणक्याचें **आंग** इतर प्रदेशांतील मणक्याच्या आंगापेक्षां लहान, मागल्या बाजूपेक्षां पुढें जाड, एक्याबाजू पासून दुसऱ्या बाजू पर्यंत रुंद वर गोलांतर, खालीं गोलबाह्य असें आहे. **पडदे** अरुंद व लांब. **कण्याचें. छिद्र** मोठें व त्रिकोणाकार. **मणक्यामधील खांचा** खालच्या पेक्षां वरच्या किंचित् खोल; खालच्या फार रुंद; **कंटकतुल्यभाग** अखूड व शेवटास दुभागलेले असून चवथ्यापासून उत्तरोत्तर लांब होत गेलेले; **पक्षतुल्यभाग** अखूड व दुभागलेले असून त्यांच्या वरल्या आंगास मानेच्या रक्तवाहिन्या व मज्जातंतु ह्यांस आधार देण्याकरितां खोल खांचणी आहे, व बुडख्याजवळ छिद्र आहे, त्यांतून वर्तिब्रलधमनी जाते. **कर्णतुल्यभाग** तिर्कस आहेत त्यांपैकीं वरच्याचा झोंक वर व मागें आणि खालच्यांचा खालीं व पुढें असा आहे.

ह्या भागांत **पहिला, दुसरा** व, **सातवा** हे मणके असाधारण होत.

"**अत्लस**" **शिरोधरास्थि** आंगरहित हाडाचेंचक्र आहे. तें **कमानी, कर्णतुल्य,** व **पक्षतुल्य** ह्या भागांनीं रचित आहे. पुढल्या कमानीच्या पुढल्या भागास एक ग्रंथि आहे तिला **लांगसकोलै** नामक स्नायु बद्ध आहे, तिच्या मागल्या भागावर गुळगुळीत संधिभाग आहे, त्या ठिकाणीं दुसऱ्या मणक्याचा **दंताकृतिभाग** जुळलेला आहे, मागली **कमान** पुढली पेक्षां लांब व पातळ असून वरून खालीं चापट होत गेली आहे. तिच्या मध्य भागीं कंटकतुल्य भागाचें मूळ बीज आहे. **कर्णतुल्यभागांजवळ** प्रत्येक

मानेचा मणका. वरचें अंग.



पाठीचा मणका बाजूचे अंग



कमरेचा मणका



१ अंग

२ पक्ष तुल्य भाग

३ दंड.

४ वरचे कर्णतुल्य भाग

५ खालचे कर्ण तुल्य भाग.

६ पडद

७ कंटक तुल्य भाग

८ पक्ष तुल्य भागाचे छिद्र

९ फासळीच्या डोक्यासाठी संधिभाग

१० फासळीच्या पृष्ठीसाठी संधिभाग

बाजूस मणक्यांमधील खांचेबद्दल उथळ खांच आहे, आणि ती पहिले मज्जा तंतूस व वर्तिब्रल धमनीस आधार भूत आहे. मणक्यांमधील खांचा कर्ण-तुल्य भागां मागें आहेत, हा एक त्यांचा विशेष धर्म. पक्षतुल्यभाग मोठे व लांब आहेत, व वर्तिब्रल धमनीसाठीं त्यांस एक छिद्र आहे. वरचे कर्ण तुल्यभाग दृढ ठिकाणीं असून अंडाकार व खोलगट आहेत; वरच्या जोडी पासून डोकें मागें पुढें फिरतें. खालचे कर्णतुल्यभाग वर्तुळाकार व चापट आहेत, व त्या पासून चक्रावर्तगति उत्पन्न होते. ह्या मणक्याच्या आंतल्या बाजूस दोन ग्रंथि आहेत त्यांस ट्रान्सवर्स ह्मणजे अडवें संधिबंधन बद्ध आहे.

"अक्सिस" कीलकास्थि. ह्या मणक्याच्या आंगावर ओदोंतिद हा दांता सारखा भाग आहे त्यावर डोकें आंसावर फिरल्याप्रमाणें फिरतें. ह्या भागावर दोन संधिभाग आहेत. पुढला अतूलसाच्या कमानीशीं व मागला अडव्या संधिबंधनाशीं लागला आहे. ह्या ठिकाणाखालीं हा भाग बारीक झाला आहे, त्यास मान ह्मटलें आहे.

"वर्तिब्राप्रामिनेन्स—" ठळकमणका. हा पाठीच्या वरल्या मणक्यासारखा आहे. ह्याचा कंटकतुल्यभाग फार लांब आहे, व त्यावर एक ग्रंथि आहे, तिला मानेचें संधिबंधन बद्ध आहे. पक्षतुल्यभागांस दुभागण्याचें बीज आहे, परंतु त्यावर खांचणी नाहीं व ते दुभागलेलेही नाहींत.

## पाठीचेमणके. दार्सलवर्तिब्री.

ह्यांचें आंग पुढून मागें तसेंच एके बाजूपासून दुसऱ्या बाजूपर्यंत लांब, मागें जाड आहे आणि त्याच्या प्रत्येक बाजूस फांसळीशीं जुळण्याचा अर्धा संधिभाग आहे. देंठ बळकट, पडदे रुंद आणि जाड, कण्याचेंछिद्र लहान व वाटोळें, मणक्याची खालची खांच मोठी व वरची फार लहान. कंटकतुल्यभाग तिरकस व मागें झुकलेला, पक्षतुल्य भाग मोठा बळकट व मागें ओझरता त्याच्या पुढल्या व वरच्या बाजूस फांसळीशीं जुळण्याचा संधिभाग आहे. कर्णतुल्य भाग उभे आहेत, वरचा जोड मागें व खालचा पुढें ह्याप्रमाणें झुकलेले आहेत.

ह्या मणक्यांपैकीं **पहिला**, **नववा**, **दाहवा**, **अकरावा**, आणि **बारावा** हे असाधारण आहेत.

**पहिला** मानेच्या शेवटील मणक्यासारखा आहे, व त्यावर पहिल्या फासळीचा एक व दुसरीचा अर्धा असा **दीडसंधिभाग** आहे. **नवव्याच्या** प्रत्येक बाजूस **अर्धासंधिभाग** आहे. **दाहाव्याच्या** प्रत्येक बाजूस **पूर्णसंधिभाग** आहे. **अकरावा** व **बारावा** ह्यांच्या प्रत्येक बाजूस **पुर्णसंधिभाग** आहेत. बाराव्यांत **पक्षतुल्यभाग** बीजरूपानें आहेत व खालचे **कर्णतुल्यभाग** गोल बाह्य व बाहेर झुकलेले आहेत.

## कमरेचेमणके. लंबरवर्तिब्री.

हे सर्वांहून मोठे आहेत. ह्यांचें **आंग** मोठें व बळकट आणि मागल्यापेक्षां पुढें जाड आहे. **पडदे** अखूड, जाड, व रुंद; **कंटकतुल्यभाग** जाड आणि रुंद; वरचे **कर्णतुल्यभाग** खोलगट आणि मागें व आंत झुकलेले; खालचे गोलबाह्य, पुढें व बाहेरील आंगास झुकलेले आहेत. **कण्याचेंछिद्र** मोठें व अंडाकार आहे. खालच्या **खांचा** फार थोर आहेत. **पक्षतुल्यभाग** किंचित् मागें झुकलेले आणि दवल्यासारखे आहेत.

शेवटल्या मणक्याचें **आंग** मागल्यापेक्षां पुढल्याबाजूस जाड; व **पक्षतुल्यभाग** मोठे, अखूड, व जाड आहेत.

## त्रिकास्थि. सेक्रम.

हें त्रिकोणाकार अस्थि कण्याच्या खालच्या टोंकास आहे, व तें पांच खोट्या मणक्यांनीं घटित आहे. ह्याला पुढचें व मागचें **आंग**, दोहों बाजूंचीं **भागें**, **बूड**, व **शेंडा** असे आहेत.

**पुढचें आंग** गोलांतर आहे व त्यावर चार आडव्यारेषा आहेत, ह्यावरून ह्या अस्थीचे मूळ पांच विभाग होते असें दिसतें. ह्याप्रत्येक रेषेच्या दोन शेवटांस दोन छिद्रें आहेत, त्यांस पुढील **सेक्रलफोऱ्यामिना** ह्मणतात. हीं छिद्रें वरून खालीं लहान होत गेलीं आहेत, व ह्यांतून पुढील सेक्रलमज्जातंतु जातात. पहिल्या विभागाचा पुढला प्रदेश पुढें आला आहे, त्यास

## सेक्रम पुढचें अंग.




काक्सिक्स.




| | | | |
|---|---|---|---|
| १ | सेक्रमचा पहिला मणका. | ६ | पुढील सक्रल छिद्रें |
| २ | " दुसरा " | ७ | सेक्रमचें शृंग. |
| ३ | " तिसरा. " | ८ | काक्सिक्सचे ४ मणके. |
| ४ | " चवथा " | ९ | काक्सिक्सचें शृंग. |
| ५ | " पांचवा. " | | |

सेक्रोवर्तिब्रलआंगल अथवा प्रामंतरी— ह्मणजे सेक्रम आणि वर्तिनीं ह्यांच। कोण अथवा उंचवटा ह्मणतात.

मागलें आंग गोलबाह्य आहे. त्यावर चार कंटकतुल्यभाग असल्यामुळें तें खरबरीत आहे. पांचवा कंटकतुल्यभाग अपूर्ण स्थितींत असल्यामुळें ह्या अस्थीच्या नळाचा खालचा प्रदेश उघडा पडतो. मधल्याशिखेच्या बाहेर व तिशीं समांतर ( सदर्हु शिखा कंटकतुल्य भागांनीं झालीआहे ) अशीएक पांच ग्रंथींची माळ आहे. तींत खऱ्या मणक्यांच्या कर्णतुल्य भागांचीं मूळबीजें दर्शविलीं आहेत. ह्यांच्या पलीकडे एक उथळ खांचणी आहे तींत सेक्रमच्यापुढील आंगाकडून आलेलीं चार छिद्रें मिळतात, त्यांस ह्याठिकाणीं मागील सेक्रलफोऱ्यामिना ह्मणतात. ह्याखांचेच्या बाहेर ओळीनेंच पांचग्रंथि आहेत त्या मणक्यांच्या पक्षतुल्य भागाच्या मूळबीजा प्रमाणें आहेत. ह्याग्रंथीचा शेवटला जोड सेक्रमच्या नळाच्या शेवटास आहे, व काक्सिक्स बरोबर जुळण्याकरितां त्यापासून एक शृंग निघालें आहे. सेक्रमचीं मागलीं छिद्रें पुढल्यापरीस लहान आहेत, व त्यांतून मागले सेक्रलमज्जातंतुजातात. सेक्रमच्या बाजूच्या कांठावर मोठा संधिभाग आहे, त्या योगानें हें अस्थि इलियम बरोबर जुळतें; खालच्या बाजूस बारीक कांठ आहे त्याला लहान व मोठें इस्कियातिक संधि बंधन बद्ध आहे. वरल्या कांठास प्रत्येक बाजूस संधिभाग आहे, तो अंडाकार आहे, व तो कमरेच्या शेवटल्या मणक्याशीं जुळतो. ह्याच्यामागें सेक्रमच्या नळाचें त्रिकोणाकार छिद्र आहे, व ह्या छिद्राच्या बाहेर कमरेच्या मणक्याच्या कर्णतुल्य भागाप्रमाणें एक भाग आहे. सेक्रमच्या खालच्या शेंड्यावर अंडाकार संधिभाग आहे त्यानें हें अस्थि काक्सिक्स बरोबर जुळतें. व प्रत्येक बाजूस खांच आहे ती काक्सिक्सच्या तसल्याच भागाशीं मिळून एक छिद्र होतें त्यांतून पांचवा सेक्रलमज्जातंतु जातो.

सेक्रमचा बांक स्त्रियांच्या शरीरांमध्यें जास्ती आहे; व कण्याबरोबर जुळून झालेला कोणही अधिक मोठा असतो.

सेक्रमचा चार अस्थींशीं संधि आहे. तो असा कीं, वर शेवटचा मणका, खालीं काक्सिक्स आणि प्रत्येक बाजूस आसइन्नामिनेत अस्थि.

## गुदास्थि- माकडहाड, कॉक्सिक्स.

हें अस्थिकोकिळाच्या चोंचीं सारखें आहे ह्मणून त्यास हें नांव दिलें आहे. तें चार विभागांनीं घटित आहे. वरचा विभाग फार पसरून दोन पक्षतुल्य भाग झाले आहेत, व सेक्रम बरोबर जुळण्याकरितां अंडाकार संधि भाग झाला आहे. ह्या अस्थीचीं दोन शृंगें सेक्रमच्या शृंगा बरोबर जुळतात. बाकीचे तीन विभाग वरून खालीं लहान होतगेले आहेत. हें अस्थि सेक्रम बरोबर जुळतें.

## मस्तक — स्कल.

### करटी — क्रेनियम. मुख— फेस्.

मस्तकाचे दोन विभाग केले आहेत; करटी आणि मुख. करटीचीं ८ अस्थि आहेत व मुखाचीं १४ आहेत, एकंदर २२.

| | | | |
|---|---|---|---|
| करटीचींअस्थि. | आक्सिपितल् बोन | शिरःपृष्ठास्थि | १ |
| | परैतल् | सीमंतास्थि | २ |
| | फ्रांतल् | ललाटास्थि | १ |
| | तेंपरल् | कर्णास्थि | २ |
| | स्फीनैद् | शीर्षतलास्थि | १ |
| | एथमैद् | सछिद्रास्थि | १ |
| | | | ८ |

| | | | |
|---|---|---|---|
| मुखाचींअस्थि. | सुपीरियरम्याक्सिलरीबोन. | ऊर्ध्वदंताधारास्थि. | २ |
| | मेलर | गंडास्थि | २ |
| | नेजल् | नासिकास्थि | २ |
| | ल्याक्रिमल् | बाष्पास्थि | २ |
| | प्यालेत् | ताल्वस्थि | २ |
| | इनफीरियरतराबिनेत | जालास्थि | २ |
| | वोमर | फालास्थि | १ |
| | इनफीरियरम्याक्सिलरी | हन्वस्थि | १ |
| | | | १४ |

# कवटीचीं अस्थि.

## शिरःपृष्ठास्थि . . . . . . आक्सिपिटलबोन.

हें अस्थि कवटीच्या तळाच्या मागच्या बाजूस आहे. मागें रुंद व पुढें अरुंद आहे. ह्याला दोन आंगें, चार कांठ आणि चार कोण आहेत. शिवाय मोठें छिद्र, दोन संधिभाग आणि पुढचा जाड भाग अशीं आहेत.

बाहेरील आंग गोलबाह्य आहे, व त्याच्या मध्यावर एक टेंगुळ आहे त्यास बाहेरलें आक्सिपिटलप्रोत्यूबरन्स ह्मणतात. ह्या टेंगळापासून वरीलकोणापर्यंत भाग गुळगुळीत आहे. टेंगळाच्या प्रत्येक बाजूपासून निघणाऱ्या आणि टेंगळाच्या व मोठ्या छिद्राच्या मध्यें असणाऱ्या अशा दोन वक्र रेषा आहेत, त्यास वरली व खालली वक्र रेषा अशीं नांवें आहेत. ह्या रेषांस व त्यांजमधील खरबरीत भागास स्नायु बद्ध आहेत. टेंगळापासून मोठ्या छिद्रापर्यंत जाणारि शिखा ह्या रेषांवरून आडवी जाते. मोठ्या छिद्रांतून, स्पैनलकार्द, वर्तिब्रल धमनी आणि स्पैनल आक्सेसरी मज्जातंतु हे जातात. मोठ्या छिद्राच्या प्रत्येक बाजूस, दोन कांदिल ह्मणून उंचवटे आहेत, ते पहिल्या मणक्याशीं जुळतात. प्रत्येक उंचवट्याच्या आंतल्या कांठास मानेच्या पहिल्या मणक्याचीं संधिबंधनें बद्ध आहेत. प्रत्येकबाजूस उंचवट्याच्या पुढल्याबाजूच्या बाहेरील आंगास एक खळगा आहे, त्याच्या मध्यावर एक छिद्र आहे, त्यांतून जिभेचा मज्जातंतु जातो, व मागेंही दोन खांचा आहेत, त्यांत मागली कांदलेदछिद्रें आहेत. उंचवट्याच्या बाहेरल्या आंगास खरबरीत भाग आहेत, ते मणक्यांच्या पक्षतुल्य भागांच्या ओळींत असल्यामुळें त्यांच्या प्रतिमाच होत.

आंतल्या आंगास दोन उंच रेषा आहेत. त्यांपैकीं एक उभी व दुसरी आडवी आहे. ह्या एकमेकींस मध्यभागीं विभागितात, त्यामुळें आंतल्या आंगास चार खांचा झाल्या आहेत. त्यांच्या वरच्या जोडांत, सेरिब्रमचे मागचे गड्डे बसतात. तसेच खालच्या जोडांत सेरिबेलमचे बाजूचे गड्डे बसतात. उभ्यारेषेचा वरचा भाग व आडवीचे दोन्ही भाग ह्यांस खांचण्या आहेत, त्यांत सैनसेस ह्मणजे मोठाल्या शिरा बसतात. उभ्यारेषेच्या खालच्या भागास मेंदूचा पडदा बद्ध आहे.

ह्या अस्थाच्या पुढचा जाड भाग, ब्यासिलर प्रोसेस हा त्रिकोणाकार आहे. ह्याच्या वरच्या आंगावर खांचणी असून ते, गुळगुळीत आहे. खालीं व बाजूस खरबरीत आहे आणि ह्याठिकाणीं हें अस्थि, तेंपरल अस्थीच्या कठिण भागाशीं जुळतें. खांचणीच्या बाजूवर रेषेसारखे दोन खळगे आहेत, ते शिरा राहण्या करितां झालेल्या मोठ्या खळग्याचे भाग होत.

वरचे कांठ दात्यांनीं युक्त आहेत, व एकमेकांशीं शेवटास मिळतात. खालचे जुगुलर नांवाच्या उंचवट्यानें विभागिले आहेत. तो उंचवटा एका खांचेच्या वरच्या आंगास आहे; आणि ती खांच तेंपरल अस्थीच्या संयोगानें छिद्राकार होते, त्याछिद्रास फोरेमनल्यासरम ह्मणतात.

वरचा कोण फार बारीक आहे, व तो परैतल अस्थींच्या संयोगानें झालेल्या कोणांत जाऊन बसतो.

पुढचा कोण पुढील जाडभागानें झाला आहे.

बाजूचे दोन कोण परैतल अस्थीच्या मागल्या आंगच्या खालच्या कोणाशीं लागून आहेत.

ह्याचा संधि ६ अस्थीं बरोबर आहे. वर व पुढें दोन परैतल्; दोहों बाजूस दोन तेंपरल्; पुढें स्फीनैद आणि खालीं अतूलस.

## सीमंतास्थि. परैतल्बोनः

हीं दोन अस्थि चौकोन, बाहेर गोलबाह्य, आंत गोलांतर, अशीं करटीच्या शेंड्यावर आहेत; त्यांस दोन आंगें, चार कांठ आणि चार कोण आहेत.

बाहेरील आंगावर पुढच्या कांठापासून मागच्या कांठापर्यंत जाणारी एक वक्र रेषा आहे, तिच्यामध्यभागीं एक उंचवटा आहे. त्यारेषेचे वरचें आंग खरबरीत आहे, व त्यास डोक्याचा स्नायु बद्ध आहे. ह्या रेषे खालचा भाग फार गुळगुळीत आहे, व त्यास तेंपरल स्नायूचे कांहीं तंतु बद्ध आहेत. ह्या अस्थीच्या वरच्या कांठास व मागच्या शेवटापासून एक तृतीयांश भागावर एक लहान छिद्र आहे त्यांतून एक लहान शीर जाते.

आंतल्या आंगास बारीक खोबण्या आहेत. त्यांतून मधल्या मेनिजियल-

धमनीच्या शाखा जातात. ह्याशिवाय दुसरे खळगे आहेत, त्यांत मेंदूचीं वेटोळीं बसतात. वरच्या कांठास उथळ खांचणी आहे, ती दुसऱ्याबाजूच्या अस्थीच्या खांचणी बरोबर मिळून पूर्ण होते, तींत वरचे लांजित्यूदिनालसैनस राहण्यास आधार होतो.

पुढच्या आंगच्या खालचा कोण बारीक व लांब आहे. आणि स्फिनैद् अस्थीच्या मोठ्या पक्षाबरोबर जुळतो. ह्याच्या आंतल्या आंगास एक खांचणी आहे, तींत मधली मेनिंजीयल धमनी बसते.

ह्या अस्थीचा संधि पांच अस्थी बरोबर आहे. समोरचें परैतल्, अक्सिपितल्, फ्रांतल्, तेंपरल् आणि स्फीनैद्.

**ललाटास्थि — फ्रांतल्बोन.**

हें अस्थि एकच आहे व तें करटीच्या पुढल्या व मुखाच्या वरच्या आंगास आहे. ह्याचे दोन भाग केले आहेत; एक करटीच्या शेंड्याकडे जातो, हा उभा आहे व सगळ्या अस्थीच्या तीन चतुर्थांश इतका आहे. दुसरा सपाट आहे ह्याचें अक्षिकोशास छत होतें. ह्या अस्थीस दोन आंगें आहेत, त्यांपैकीं बाहेरील गोलबाह्य व आंतील गोलांतर आहे. हें अस्थि स्वाभाविक ठिकाणीं आहे तसें ठेवणें झाल्यास अक्षिकोशाचे भाग खालीं झुकवावे व पुढलें गोलबाह्य गुळगुळीत आंग पुढें झुकवावें ह्मणजे झालें.

बाहेरील आंग गुळगुळीत आहे, त्यावर कपाळाचीं दोन टेंगळें आहेत. त्यांखालीं एक खळगा आहे, त्याच्या खालच्या मर्यादेस एक वक्र रेषाकार शिखा आहे, आणि सर्वांच्या खालीं अक्षिकोशाचे कांठ आहेत, ते बाहेरल्या आंगास वळून बाहेरचा कोण होतो, व आंतल्या आंगास वळून आंतील कोण होतो. ह्या कांठाच्या कमानीच्या आंतल्या एकतृतीयांश अंतरावर एक छिद्र असतें, व कधीं फक्तखांचच असते; तींतून सुप्राआर्बेतल मज्जातंतु आणि धमनी जातात. दोहों शिखांच्यामध्यें नाकाचा उंचवटा आहे, त्याचाखालचा भाग खरबरीत आहे, व त्यास नेजल आणि सुपीरियरम्याक्सिलरी अस्थि जुळल्या आहेत, व ह्याच जाग्यापासून एक पातळ व चापट भाग निघतो, त्यास नाकाचा कंटकतुल्यभाग ह्मटलें आहे. तो पुढें नेजल् आणि मागें एथमैद् ह्या अस्थींशीं जुळतो.

नळ असतो. हा नळ दोहों शेवटांपेक्षां मध्यें अरुंद असून, कर्णेंद्रियाकडे जाण्यासाठीं आंत व पुढें झुकलेला आहे, शेंडा मधल्या फोरेमन ल्यासरमचा भाग आहे, व त्यावर एथें करातिद नळ संपतो. हा नळ पीत्रसभागाच्या खालच्या आंगास जुगुलर खांचेच्या पुढें व आंतल्या बाजूस सुरू होतो नंतर प्रथम नीट वर चढून लागलीच अडवा होऊन, शेंड्याकडले बाजूस पुढें व आंत झुकून संपतो.

पुढचें अथवा वरचें **आंग** पुढें झुकलें आहे, व करटीच्या मधल्या खळग्याचा भाग आहे. ह्या खळग्यास **मिद्लफासा** ह्मणातात. हें आंग शेंड्याजवळ चापट आहे, तेथें पांचव्या मज्जातंतूचा **ग्यांग्लियन** बसतो. ह्या ठिकाणाच्या बाहेर लहान **पित्रोजल** मज्जातंतूसाठीं, छिद्र आहे, ह्याच्या बाहेर मोठ्या **पित्रोजल** मज्जातंतूसाठीं एक खांचणी आहे; ती **हायतसफेलोपिये** नामक छिद्रास मिळते, हिच्याबाहेर **सेमिसर्क्युलरकनालचा** उंचवटा आहे.

मागल्या आंगचा झोंक मागें आहे, व तें करटीच्या मागल्या खळग्याचा भाग आहे. ह्याखळग्यास पोर्स्तीरियर फासा ह्मणतात. ह्याभागावर कर्णेंदियाच्या नळाचें आंतलें छिद्र आहे, तें मोठें आहे. ह्या छिद्राचा नळ तिरकस बाहेर व पुढें झुकतो, व त्यांतून आदितरी आणि फेशिएल मज्जातंतु जातात. ह्या छिद्राच्या बाहेर **विस्तिब्युलास** जाणाऱ्या नळाचेंछिद्र आहे.

खालच्या **आंगावर** खांच खळगे आहेत, आणि आंतून बाहेर व मागें पाहात गेलें असतां, हे पुढील भाग दिसतात. लेवेतरपलेते व तेंसरतिंपनि स्नायु बद्ध होण्यासाठीं **खरबरीतभाग, करातिद** नळाचें **छिद्र**, **जुगुलरखांच, वेज्जैनल्** व **स्तैलैद्** भाग, आणि **स्तैलोम्यास्तैद्** छिद्र. जुगुलरखांच आक्सिपितल अस्थीच्या खांचेशीं मिळून मागला **फोरेमनल्यासरम** होतो, तो अस्थीच्या लहानतुकड्यानें दुभागला आहे. पुढल्याविभागांतून **ग्लासोफेरिंजियल, वेगस** आणि **स्पैनलआक्सेसरी** हे मज्जातंतु जातात, व मागल्यांतून जुगुलर शीर जोते.

वरच्या **कांठावर** पित्रौसल सैनसाची म्हणजे शिरेची खांचणी आहे. हा भाग स्क्वमस भागाशीं लागून कोण होतो, त्यावर युस्तेकियन नळीचें तोंड आहे. हा नळी कर्णेंद्रियांतून गलमागींत येते. मागला **कांठ** आक्सिपि-

तल अस्थीच्या ब्याजिलर प्रोसेस नामक जाड भागाशीं जुळून, मागला फोरे-मनल्यासरम होतो.

तेंपरल हें परैतल, मेलर, इनफीरियरम्याक्सिलरी, स्फानैद आणि आक्सिपितल ह्या अस्थींशीं जुळतें.

शीर्षतलास्थि — स्फीनैदबोन.

हें आस्थि एकच आहे, व तें करटीच्यातळाशीं अडवें बसलेलें असून, करटी, अक्षिकोश, नाकाचा खळगा, तेंपरल आणि जिजोम्यातिक खळगे हे सर्व पूर्ण करण्यास साह्य होतें. ह्या अस्थीचा आकार पंख उघडलेल्या पाकोळीसारखा आहे. तें करटीच्या सर्व अस्थींशीं व मुखाच्या बहुतेकांशीं जुळतें. आणि त्यासर्वांत तें खेंचून बसलें आहे. हें आंग व दुसरे भाग ईहींकरून घटित आहे. आंगास सहा बाजू आहेत.

वरच्या आंगावर पित्युतरी फासा ह्मणून खोल खळगा आहे, तो करटीच्या तळाचा भाग होतो. त्याच्या प्रत्येक बाजूस उथळ व वांकडी खांचणी आहे, तींत क्यावर्नस, सैनस ह्मणून मोठी शीर व करातिद धमनी ह्या बसतात. पुढच्या बाजूस आडवा खळगा आहे, तो आप्तिक मज्जातंतूचें संयोगस्थान होय. ह्या संयोगानें झालेल्या भागास आप्तिक काभिशूर ह्मणतात, व तो आलिवरी प्रोसेस नामक उंचवट्यावर बसतो. ह्याच्या प्रत्येक बाजूस पुढले क्लैनैद प्रोसेस ह्मणजे पलंगाच्या खुरासारखे भाग आहेत, ते लहान पंखांच्या मागल्या शेवटांनीं घटित आहेत. आंगाच्या मागं एक चतुष्कोण पडदा आहे, त्याच्या दोन कोणांस मागील क्लैनैद प्रोसेस ह्मणतात.

तेरिगैद भागाच्या मधील जागा खालचें आंग होय. तें आंग रास्त्रम नामक कंटकतुल्य भागानें विभागिलें आहे. रास्त्रम वोमराशीं जुळतो. तेरिगैद भागाच्या बुडाजवळ खांच आहे, तिचे प्यालेत अस्थीच्या संयोगानें छिद्र झालें आहे, त्यास तेरिगोप्यालेतैन नळ ह्मटलें आहे.

पुढील आंगास दोन खळगा आहेत, त्या एक्या पडद्यानें दुभागल्या आहेत. हींच स्फिनैदल सैनसें होत. हा पडदा खालीं रास्त्रमाशीं व पुढें एथ-

मैदाच्या पडद्याशीं जुळतो. सैनसें पुढें जाळ्या सारख्या हलक्या अस्थींनीं आच्छादिलीं आहेत.

मागलें आंग, आक्सिपितलाच्या पुढल्या जाड भागाशीं जुळतें.

बाजूचीं दोन आंगें मोठ्या पंखां बरोबर मिळालीं आहेत.

मोठे पंख, लहान पंख आणि तेरिगैद प्रोसेस हे ह्या अस्थींचे थोर भाग आहेत. एथमैदलस्पैन, क्लिनैदप्रोसेस, हाम्युलरप्रोसेस ह्मणजे गळा सारखा भाग, आणि स्पैनस प्रोसेस हे लहान भाग आहेत.

मोठे पंख वरतीं, बाहेर व पुढें झुकले आहेत, व ह्यांस तीन आंगें आहेत. एक पुढलें चतुष्कोण आहे, व तें अक्षिकोशाच्या बाहेरच्या आंगाचा भाग आहे. वरचें गोलांतर व खांचखळग्यांनीं युक्त आहे, तें करटीच्या मधल्या खांचेचा भाग होतें. एक बाहेर झुकलेलें आहे, त्याच्या योगानें करटीच्या बाजूचा भाग होतो. ह्या आंगावर एक शिखा आहे. तिच्या योगानें ह्याचे दोन भाग झाले आहेत. वरच्यानें तेंपरल खांच, व खालच्यानें जिगोम्यातिक खांच ह्यांचे भाग झाले आहेत. पंखावर छिद्रें आहेत त्यांपैकीं रोतंदम छिद्रांतून वरचा म्याक्सिलरी मज्जातंतु जातो. ओवेली छिद्रांतून खालचा म्याक्सिलरी मज्जातंतु जातो. स्पैनोजम छिद्रांतून मधली मेनिंजियल धमनी जाते.

धाकटेपंख त्रिकोणाकार, स्फीनैदाच्या आंगाबरोबर व सपाट आहेत, वरच्या आंगावर मेंदूचे गड्डे बसले आहेत. खालचें आंग अक्षिकोश व स्फिनैदलफिशर ह्मणजे चीर ह्यांवर झुकलें आहे. ह्या दोन पक्षांच्या संयोगस्थानापासून एक कंटकतुल्यभाग निघतो, तो एथमैदाच्या छिद्रयुक्त पडद्याशीं जुळतो. मागलीं शेवटें ठोसर आहेत, त्यांस पुढले क्लिनैदप्रोसेस ह्मणतात. बुडाजवळ ह्या पंखावर दोन छिद्रें आहेत, त्यांस आप्तिक फोरामिना ह्मणतात व त्यांतून आप्तिक मज्जातंतु जातात.

तेरिगैद भाग दोन पडद्यांनीं युक्त आहेत, व त्या योगानें सदरहू नांवाची खांचणी होते, तींत आंतला तेरिगैदस्नायु बद्ध आहे, आंतला पडदा बारीक आहे, व शेवटास गळा सारखा झाला आहे. ह्या खांचणीच्या त-

ळाजवळ दुसरी नावे सारखी खांच आहे, तिला **फासानाविक्युलेरीस्** ह्मणतात.

स्फिनैदल चिरेंतून ३ रा ४ था ५ व्याची **आफथाल्मिक शाखा** आणि ६ वा हे मज्जातंतु आणि आफथाल्मिक शीर हे भाग जातात.

ह्याचासंधि १२ अस्थीं बरोबर आहे. **आक्सिपितल**, २ **फ्रांतल**, **एथमैद**, २ **परतैल**, **वोमर**, २ प्यालेत, २ मेलर, व २ तेंपरल.

## सछिद्रास्थि. एथमैदबोन.

**एथमैद** अस्थि चतुष्कोण, खळ्यांनीं युक्त, दोहों अक्षिकोशांच्या मध्यें नाकाच्या बुडाजवळ आहे, आणि वरच्या आंगास पुष्कळ छिद्रें आहेत त्यामुळें **एथमैद** ह्मणजे चाळणीसारखें हें नांव त्यास दिलें आहे. ह्यास एक उभा व एक आडवा असे दोन पडदे व दोहों बाजूंस दोन गढे आहेत, मधला उभापडदा **वोमर** व नाकाची **कूर्चा** ह्यां बरोबर जुळतो, व नाकाचा पडदा पूर्ण करतो. वरच्या आंगास जाड, बळकट आणि त्रिकोणाकार **क्रिस्ताग्याले** नामक भाग करटीच्या खळग्यांत उभा आहे, त्यास दूरामेतर बद्ध आहे. ह्याच्या बाजूस व सभोंवतीं छिद्रांनीं युक्त असा आडवा पडदा आहे त्यास **क्रिब्रिफार्मल्यामिला** ह्मणतात. हा पडदा घ्राणेंद्रियाच्या आलफ्याक्टरी मज्जातंतूच्या गड्यास आधारभूत होतो, व त्याच्या बारीक तंतूंस छिद्रांतून नाकांत जाण्यास वाटा होतात, आणि त्यांवर आफथाल्मिक मज्जातंतूची नाकांतली शाखा जाण्याकरितां एक लहान चीर आहे.

बाजूच्या **गड्यांस** आंतलें आणि बाहेरलें अशीं दोन **आंगें** आहेत; आंतलें आंग खरबरीत व गोलवाह्य, हें नाकाच्या खांचेची वरची मर्यादा होतें; ह्या आंगाच्या मागल्या कांठावर सपाट चीर आहे ती वरचें **मिएतस** ह्मणजे नाकांतील वरचें विवर समजावें. ह्या चिरेचे कांठ आंत वळले आहेत, त्यांस वरचें **तरबिनेत** अस्थि ह्मटलें आहे. ह्याच्या खालीं तसेंच बाहेर वळलेलें अस्थि आहे, त्यास मधलें **तरबिनेत** अस्थि ह्मणतात.

बाहेरलें **आंग** चौकोण व गुळगुळीत आहे, व त्यानें अक्षिकोशाच्या आंतल्या आंगची भित होते. ह्या भागास कधींकधीं **आसप्लेनम** ह्मणतात.

बाजूचे गढे खळ्यांनीं युक्त आहेत, त्यांस मागल्या व पुढल्या खळ्या आहेत

पुढल्या, इनफंदिब्युलम् ह्या नळांतून मधल्या मियेतस मध्यें संपतात. गड्याच्या वरच्या आंगास दोन खंचण्या आहेत, त्यांची फ्रांतल अस्थीच्या संयोगानें दोन छिद्रें होतात, त्यांनां पुढलीं व मागलीं एथमैदल छिद्रें ह्मणतात. ह्याचा संधि १३ अस्थींबरोबर आहे. दोन करटीचीं फ्रांतल व स्फोनैद; बाकी मुखाचीं,२ नेजल,२ सुपीरियर म्याक्सिलरी, २ ल्याक्रिमल, २ प्यालेत, २ इनूफोरियर तरबिनेत आणि वोमर.

# मुखाचीं आस्थि.

## नासिकास्थि. नेजलबोन.

हीं चतुष्कोण आस्थि दोन आहेत. ह्यांच्या योगानें नाकाचा बुडखा व दांडा हे होतात. ह्याचें वरचें आंग गोलबाह्य व आंतलें गोलांतर आहे, त्यास आफथाल्मिक मज्जा तंतूच्या नाकांतल्या शाखेसाठीं एक खांचणी आहे. वरचा कांठ अरुंद व जाड आणि खालचा रुंद व पातळ आणि उंच नीच आहे. ह्याचा संधि चार अस्थींशीं आहे. फ्रांतल, एथमैद, नेजल आणि सुपीरियरम्याक्सिलरी.

## उर्ध्वदंताधारास्थि. सुपीरियरम्याक्सिलरीबोन.

हीं आस्थि दोन आहेत. हीं हन्वस्थि निराळें करून मुखाच्या सर्व अस्थींपेक्षां थोर आहेत. ह्यांच्या संयोगानें वरचें दाभाड होतें, व हीं नासिक अक्षिकोश, गल्ल आणि तालू ह्या भागांच्या रचनेंत अंशभूत होतात. प्रत्येक बाजूच्या अस्थीस आंग व चार भाग आहेत.

आंग त्रिकोणाकार आहे, व त्यांत मोठें विवर आहे, त्यास आंत्रम् आफ् हैमोर ह्मणतात, आंगास चार बाजू आहेत. बाहेरील बाजू मुखाची आंतील नासिकाची मागील जिगोम्यातिक खांचेची; आणि वरील अक्षिकोशाची.

बाहेरील बाजू उंच नीच गोलांतर आहे. तिच्या मध्यभागीं एक खोल खांचणी आहे. तीस, लेवेतरआंगुलैओरिस आणि कंप्रेसरनेजै हे स्नायुबद्ध आहेत. त्या खांचणीस कनैनफासा ह्मटलें आहे. हिच्यावर इनूफ्रा आर्बितल नामक छिद्र आहे, त्यांतून सुपीरियरम्याक्सिलरीमज्जातंतु आणि इन्फ्राआर्बितल धमनी ह्या जातात. ह्याच्या वर अक्षिकोशाचा खालचा

कांठ आहे, तो बाहेर मेलर अस्थीच्या खरबरीत संधिभागाशीं आणि आंत नेजलप्रोसेस नामक जाड चढत्या भागाशीं मिळाला आहे. मुखाच्या मध्य रेषेंत ह्या बाजूस नाकाच्या खांचेचा गोलांतर कांठ मर्यादा भूत होतो, व तो कांठ पुढें झुकून संगतीच्या अस्थीच्या संयोगानें नाकाचा कंटकतुल्य भाग पूर्ण होतो. ह्या भागाच्या खालीं, आणि वरल्या छेदक दंतांच्यावर एक लहान खळगा आहे, तेथें एक स्नायु बद्ध आहे. ह्या बाजूची खालची मर्यादा ज्यांत वरले दांत राहतात, तो भाग होय. ह्या अस्थीच्या आंगाची मुखाकडील बाजू मेलर अस्थीशीं जुळणाऱ्या भागानें जिगोम्यातिक बाजूपासून निराळी झाली आहे.

आंतल्या ह्मणजे नाकाच्या बाजूवर मोठें आणि उंचनीच असें छिद्र आहे; तें आंत्रनामक विवराशीं मिळतें आणि तें, एथमैद, प्यालेत, ल्याक्रिमल आणि खालचें तरबिनेत ह्या अस्थींनीं बहुतकरून अगदीं बुजलें आहे. आंत्रम् नामक विवर त्रिकोणाकार आहे. ह्या विवराच्या पुढें नाकाचा उंच भाग आहे, त्यावर खरबरीत आडवी शिखा खालच्या तरबिनेत अस्थीशीं जुळण्यासाठीं आहे. ह्या शिखेच्या वरल्या खळग्यानें, मधलें मियेतस होतें व खालच्यानें खालच्या मियेतसाचा भाग होतो. मधल्या मियेतसाच्यावर दुसरी शिखा आहे, तिला वरची तरबिनेत शिखा ह्मटलें आहे.

नाकाचा उंच भाग नेजलप्रोसेस आणि आंत्रम विवर त्यांच्या मध्यें एक उभी खोल खांच आहे, तिची ल्याक्रिमल आणि खालचें तरबिनेत ह्या अस्थींनीं नाकाची वाहिनी झाली आहे, तीस नेजलदक्त ह्मटलें आहे. नाकाच्याबाजूच्या वरच्या कांठास खळ्या आहेत. तो कांठ ल्याक्रिमल व एथमैद अस्थींशीं जुळतो. मागला कांठ खरबरीत प्यालेतअस्थीशीं जुळतो. पुढला नाकाचा मोकळा कांठ होतो, आणि खालला आंत झुकतो, त्यास तालूचा भाग अथवा प्यालेतप्रोसेस ह्मटलें आहे.

मागल्या ह्मणजे जिगोम्यातिकबाजूस बाहेर मेलर अस्थीशीं जुळणाऱ्या भागाची आणि आंत अंडाकार संधिभागानें प्यालेत अस्थीशीं जुळणाऱ्या खरबरीत वर्तुळाकार कांठाची मर्यादा होते. अंडाकारसंधिभागाच्या आंतल्या अंगास एक गुळगुळीत खांचणी आहे, ती मागल्याप्यालेतैन नळाचा

भाग होते. ह्याबाजूचा वरचाकांठ गुळगुळीत व वर्तुळाकार आहे, तो **स्फीनोम्याक्सिलरी** चिरेची खालची मर्यादा होतो, आणि त्यावर एक खोबणी आहे, ती इन्फ्राआर्बितल नळाचा आरंभ आहे.

वरची ह्मणजे अक्षिकोशाची **बाजू** त्रिकोणाकार, पातळ आहे, आणि ती त्याकोशाची जमीन होते. तिचा आंतला कांठ, **एथमैद**, **प्यालेत** आणि **ल्याक्रिमल** ह्या अस्थींशीं जुळतो.

ह्या अस्थीचे चार **भाग** आहेत. नाकाचा ह्मणजे **नेजल**, गंडास्थीचा **मेलर**, दातांच्या कांठाचा **आल्वियोलर** आणि तालूचा प्यालेत.

तालूचा बळकट व जाड **भाग** नीट आंत झुकला आहे. त्याचें वरचें आंग गोलांतरनासिकाचा खालचा भाग ह्मणजे जमीन होय, आणि खालचेंही आंग गोलांतर तालूचें छत होय. ह्याचा आंतला कांठ वर चढून त्याची शिखा झाली आहे. ती शिखा संगतीच्या अस्थीच्या शिखेशीं जुळून खांचणी होते. तींत **वोमर** अस्थि आणि नाकाची **कूर्चा** हे भाग बसतात. ही शिखापुढें वाढून नाकाचा कंटकतुल्यभाग होतो. त्याच्या वाजूस छिद्र आहे, तें पुढील प्यालेतेन **नळास** मिळतें. हें अस्थि करटीच्या पैकीं **फ्रांतल** व **एथमैद** ह्या दोहोंशीं व मुखाच्या अस्थीं पैकीं **इन्फीरियरम्याक्सिलरी** सोडून बाकीच्या सर्वांशीं जुळतें.

## ताल्वस्थि. प्यालेतबोन.

हीं अस्थि दोन आहेत. हीं नासिकाच्या खाचेच्या मागल्या भागांत आहेत, आणि **तालूचाकठिण भाग**, **नाक** आणि **अक्षिकोशाचाखालचाभाग** ह्यांच्या रचनेंत अंश भूत आहेत. प्रत्येक अस्थीचा आकार L एल् ह्या इंग्रजी वर्णासारखा आहे. ह्याचे **आडवा**, **उभा** आणि **तेरिगैद** असे तीन भाग मानले आहेत, त्यांत पाहिले दोन पडदे आणि तिसरें टोंक असे आहेत.

आडवा क्षितिजसमांतर **पडदा** चौपेलू आहे. ह्यास वरचें आणि खालचें अशीं दोन **आंगें** आहेत. वरचें नाकाच्या खांचेची खालची मर्यादा होतें. **खालचें** तालूच्या कठिण भागाचा अंश होतें. वरचें **आंग** मध्यावर संगतीच्या अस्थीशीं जुळल्यामुळें **वोमर** अस्थीशीं जूळण्याकरितां एक शिखा होते. ह्या

पडद्याच्या बाहेरल्या कांठाजवळ मागलीं प्यालेतैनछिद्रें आहेत. दोन्ही अस्थींच्या मागल्या कांठांचे आंतील शेवट लांबून नाकाचा मागला कंटकतुल्य भाग झाला आहे.

उभा पडदा ही चौपेलू आहे, आणि त्यास दोन आंगें आहेत. आंतल्या ह्मणजे नाकाच्या आंगावर मधल्या व खालच्यातरबिनेत अस्थींशीं जुळण्यासाठीं अर्ध इंचाच्या अंतरावर दोन शिखा आहेत. बाहेरचें आंग स्फीनोम्याक्सिलरीखांच आणि आंत्रम विवर ह्यांची मर्यादा होते. हें आंग वर गुळगुळीत आहे, आणि खालीं त्यावर खांचणी आहे. तिचा सुपीरियर म्याक्सिलरीच्या उंचवट्यानें व स्फीनैदाच्या तेरिगैद भागानें नळ झाला आहे, त्यास मागला प्यालेतैननळ ह्मणतात.

उभ्या पडद्याच्या वरच्या बाजूस मोठी खांचणी आहे, तिनें स्फीनैद अस्थीच्या संयोगानें स्फीनोप्यालेतैन नामक छिद्र होतें, व ह्या छिद्रानें अस्थीच्या उभ्या पडद्याच्या वरच्या भागाचे दोन विभाग झाले आहेत. ते, —स्फीनैदल आणि आर्बिटल ह्मणजे शीर्षतलास्थीचा व अक्षिकोशाचा असे दोन, —स्फीनैदल भागास तीनआंगें आहेत. २ बाजूचीं व १ वरचें. बाहेरल्या बाजूच्यानें स्फीनोम्याक्सिलरीखांचेचा भाग होतो, आंतल्याबाजूच्यानें नासिकाच्याखांचेचा भाग होतो, आणि वरचें स्फीनैद अस्थीच्या आंगाशीं जुळतें.

अक्षिकोशाच्या भागास पांचआंगें आहेत. ३ संयोग पावतात आणि २ मोकळीं आहेत. पुढलें सुपीरियरम्याक्सिलरीशीं, आंतलें एथमैदाशीं, आणि मागलें स्फीनैदाशीं अशीं जुळतात—दोन संधिरहित आंगांपैकीं, एक वरचें अक्षिकोशाची जमीन होतें, आणि दुसरें बाहेरचें स्फीनोम्याक्सिलरीखांचे कडे झुकलें आहे.

ह्याचा संधि ६ अस्थींबरोबर आहे. स्फीनैद व एथमैद ही दोन करटीचीं आणि सुपीरियरम्याक्सिलरी, इन्फीरियरतरबिनेतद, वोमर आणि संगतीचें अस्थि.

जालास्थि. इन्फीरियरतरबिनेतदबोन.

हा छिद्रयुक्त, पातळ आणि हलक्या अस्थीचा थर नासिकाच्या आंतल्या

भिंतीच्या खालच्या शिखेस बद्ध आहे, आणि कांहींसा त्रिकोणाकार व वांकडा आहे. ह्यास दोनआंगें, तीनकांठ आणि तीन कोण आहेत.

बाहेरचें आंग गोलबाह्य मधल्यामियेतसाची जमीन होतें. आंतलें गोलांतर खालच्या मियेतसाचें छत होतें.

पुढचा कांठ सुपीरियरम्याक्सिलरीच्या शिखेशीं जुळतो, व ल्याक्रिमल अस्थीशीं त्याचा संयोग आहे. वरचाकांठ उंचनीच व लांब, प्यालेतच्या शिखेशीं जुळतो. खालचा कांठ वाटोळा, जाड व मोकळा आहे.

मागला कोण चिंचोळा आहे, तो तेरिगैदाच्या आंतल्या पडद्या पर्यंत गेला आहे. पुढला वरच्या म्याक्सिलरीशीं जुळलेला, नासिकाच्या खांचेच्या पुढच्या कांठापर्यंत गेला आहे. वरचा कोण गोल आहे, त्यास तीन संधिभाग आहेत. एक ल्याक्रिमल अस्थीशीं जुळून नाकाचा नळ पूर्ण करतो; दुसरा एथमैदाशीं जुळतो; आणि तिसरा वरच्या म्याक्सिलरीशीं जुळून आंत्रम विवराच्या आंतल्या भिंतीचा भाग होतो.

ह्याचा संधि चार अस्थींशीं आहे. एथमैद, सुपीरियर म्याक्सिलरी, ल्याक्रिमल आणि प्यालेत.

## फालास्थि. वोमरबोन.

हें अस्थि पातळ चौपेलू नांगराच्या फाळासारखें आहे, आणि ह्याच्या योगानें नाकाच्या खांचेच्या पडद्याचा मागला आणि खालचा भाग होतो. वरचा कांठ स्फीनैदाच्या आंगाशीं जुळण्याकरितां रुंद व फुलला आहे, आणि ह्याच कांठाचा पुढला भाग स्फीनैदाच्या रोस्त्रम बरोबर जुळण्याकरितां पोकळ झाला आहे. खालचा कांठ पातळ व उंचनीच सूपीरियरम्याक्सिलरी आणि प्यालेत ह्यांच्या संयोगानें झालेल्या शिखेशीं जुळतो. पुढच्या कांठावर एथमैदाच्या उभ्या पडद्याशीं आणि नाकाच्या कूर्चेशीं जुळण्याकरितां लहान अथवा मोठी खांचणी असते. मागला कांठ तीक्ष्ण आणि मोकळा, मागें नासिकाच्याखांचेचे दोन भाग करतो.

ह्याचा संधि ६ अस्थींशीं आहे; स्फिनैद, एथमैद, २ सुपीरियरम्याक्सिलरी, २ प्यालेत, आणि नाकाच्या पडद्याची कूर्चा.

**घ्राणास्थि. म्याक्सिलबोन.**

हीं अस्थि दोन आहेत. हीं पातळ अंडाकार कांहींशीं नम्बाकारची अक्षिकोशाच्या आंतल्या भिंतीवर आहेत. प्रत्येक अस्थीस दोन अंगें व चार कांठ आहेत.

एका उभ्या शिखेनें बाहेरल्या आंगाचे दोन विभाग झाले आहेत. एक चापट अक्षिकोशाचा भाग होतो; दुसरा गोलांतर आहे, त्यांत ल्याक्रिमलस्याक ह्मणजे अश्रुवाहिनीचा मोठा भाग राहतो.

आंतलेंआंग उंचनीच आहे, तें एथमैद अस्थीच्या पुढल्या खळ्या होण्यास अंशभूत होतें; आणि नासिकाच्या खळग्याची भिंत, व नाकाचा नळ हेही त्याच्या योगानें होतात.

चार काठांस ह्या पुढील चार अस्थि जुळल्या आहेत,—दोन करटीच्या, फ्रांतल व एथमैद; आणि सुपीरियरम्याक्सिलरी, व इन्फीरियरतरबिनेतेद ह्या मुखाच्या.

**गंडास्थि. मेलरबोन.**

हीं अस्थि दोन आहेत. हें चतुष्कोण असून फार बळकट आहे, आणि गालाचा उंचवटा ह्याच्याच योगानें झाला आहे. ह्याला दोन आंगें आणि चार भाग आहेत. ललाटास्थीशीं जुळण्याचा फ्रांतल, अक्षिकोशांचा आर्बितल, म्याक्सिलरी नांवाच्या अस्थीशीं जुळण्याचा म्याक्सिलरी, आणि जिगोम्याशीं जुळणारा जिगोम्यातिक.

बाहेरचें आंग गुळगुळीत व गोलबाह्य आहे, आणि त्यास एक दोन मेलर नामक छिद्रें असतात.

आंतलें आंग गोलांतर आहे, तें तेंपरल खांचेचा भाग होतें, व तेथें गुळगुळीत आणि वरच्या म्याक्सिलरीशीं जुळण्याच्या ठिकाणीं खरबरीत आहे.

फ्रांतल भाग अक्षिकोशाच्या बाहेरचा कांठ पूर्ण करण्याकरितां वर चढतो, आणि फ्रांतल अस्थीच्या बाहेरील कोणाशीं जुळतो.

आक्षिकोशाचाभाग जाड आहे. तो फ्रांतल भागापासून आंत झुकतो आणि स्फीनैदाच्या मोठ्या पक्षावरोबर जुळून कोशाचीबाहेरील भिंत पूर्ण करतो.

म्याक्सिलरी भाग त्यानांवाच्या अस्थीशीं जुळतो.

जिगोम्यातिकभाग इतरांपेक्षां अरुंद आहे, तो जिगोम्याबरोबर जुळतो.

ह्याचा संधि चार अस्थींशीं आहे. ३ करटीचीं; फ्रांतल, सेपरल आणि स्फीनैद; व १ मुखाचें सुपीरियरम्याक्सिलरी.

## हन्वस्थि. इन्फीरियरम्याक्सिलरीबोन.

ह्या अस्थीची आकृति कमानीसारखी आहे. ह्यामध्यें खालचे दांत राहतात. ह्याचा एक आडवा क्षितिजसमांतर व दुसरा उभा असे दोन भाग आहेत. पहिल्या भागास आंग व दुसऱ्यास रेमस असें ह्मणतात.

बाहेरल्या आंगावर मधल्या दोन छेदक दंतांच्या मधून हनवटीपर्यंत एक शिखा जाते. मुलाच्या शरीरांत ह्या अस्थीचे दोन भाग असतात, त्यांचें संधिस्थान ही शिखा होय. ह्याच्या बाहेर एक खळगा आहे, आणि ह्या खळग्याच्या बाहेरील आंगास दुसरा खळगा आहे. ह्याच्या बाहेर तिर्कस छिद्र आहे, त्यास मेंतलफोरेमन ह्मणतात. त्यांतून मेंतल मज्जातंतु, आणि खालच्या दांताची देंतल नामक धमनी हीं जातात. ह्या छिद्राच्या खालच्या बाजूस कारोनैद भागाच्या बुडाकडे वर व बाहेर जाणाऱ्या शिखेचा आरंभ होतो. ह्या शिखेस स्नायु बद्ध आहेत. ह्या आंगच्या मागल्या भागास म्यासेतर स्नायूसाठीं खरबरीत भाग आहे. आणि ह्याच्या आंतल्या आंगास फेशियलमज्जातंतु जाण्याकरितां लहान खांच आहे. ह्या अस्थीचें आंग आणि रेमस मिळण्याच्या जाग्यावर कोण आहे.

शिखेच्या मागें आंतल्या आंगास मध्यावर सिंफिसिस ह्मणून शिखा आहे, तिजजवळ चार ग्रंथि आहेत. त्यांत दोन वर व दोन खालीं, आणि ह्यांच्या खालीं दोन खांचा आहेत. त्या ग्रंथींस स्नायु बद्ध आहेत. सिंफिसिस शिखेच्या बाहेरच्या आंगाकडे जाणारी मैलोहैयेद शिखा आहे, तिला त्याच नांवाचा स्नायु बद्ध आहे. तिच्या शेवटास सुपीरियर कन्स्त्रिक्तर स्नायु बद्ध आहे. शिखेच्या वर एक गोलांतर गुळगुळीत भाग आहे, त्यांत सबलिंग्वल ग्ल्यांद बसते, व खालीं एक खांच आहे तींत, सबम्याक्सिलरी ग्ल्यांद बसते.

वरल्याकांठांत दांत राहण्यासाठीं सोळा खांचा आहेत.

खालचा कांठ वाटोळा आणि गुळगुळीत आहे. त्याच्या मध्यभागीं हनवटी आहे.

रेमसावर दोन भाग आहेत, त्यांच्यामध्यें गोलांतर खांच आहे पुढचा भाग कारोनैद, त्यास तेंपरल स्नायु बद्ध आहे. मागल्या बाजूस, रुझीनैद खांचेशीं जुळण्याकरितां संधिभाग आहे, त्यास कांदैल ह्मणतात, व त्याला बाहेरचा तेरिगैद स्नायु बद्ध आहे. रेमसाच्या आंतल्या आंगास इन्फीरियर देंतल हें तिर्कस छिद्र आहे; त्यांतून त्याच नांवाची धमनी व मज्जातंतु जातात. ह्या छिद्राच्या वरच्या उंचनीच भागास तेंपरल स्नायु बद्ध आहे आणि खालच्यास आंतला तेरिगैदस्नायु बद्ध आहे. कोणाच्या आतल्या आंगास तेरिगोम्याक्सिलरी संधिबंधन बद्ध आहे.

ह्याचा संधि दोन संधिभागांनीं तेंपरल अस्थीबरोबर आहे.

## जिव्हास्थि. हैयैदबोन.

हें अस्थि U यू ह्या इंग्रजी वर्णासारखें आहे. ह्याचा जिभेशीं विशेष संबंध असल्यामुळें ह्यास कधींकधीं जिभेचें अस्थि ह्मणतात हें जिभेच्या बुडाजवळ आहे, व हनवटीच्या आणि कंठाच्या कठीण भागाच्यामध्यें सहज हातास लागतें.

ह्या अस्थीस आंग, २ मोठीं शृंगें आणि २ लहान शृंगें आहेत.

आंग चौपेलू, लहान, व पुढून मागें दबलेलें आहे. पुढची बाजू गोलट्या आहे, तिच्या मध्यावर उभी रेषा आहे, तिला स्नायु बद्ध आहेत.

मोठीं शृंगें मागें झुकलीं आहेत, व त्यांचे शेवट गोल आहेत.

लहान शृंगें आखूड आणि सरासरी गायदुम आहेत, व थोडीं तिर्कस आहेत. हीं, आंग आणि मोठीं शृंगें ह्यांच्या संयोगस्थानापासून निघतात.

## नेमणुकीबाहेरचींअस्थि. आसाव्रिकेन्ना.

हीं जास्ती अस्थि मस्तकामध्यें दोन अस्थींच्यामध्यें बहुधा कोणत्यातरी शिवणीवर असतात, व ह्यांचे कांठ दांत्यांनीं युक्त असतात.

## मस्तकाच्या अस्थींचा एकमेकांशीं संबंध.

मस्तकाचीं आणि मुखाचीं अस्थि शिवणीच्या योगानें एकमेकांशीं जुळलीं आहेत. करटीच्या शिवणी पांच आहेत, त्यांत तीन खऱ्या आहेत, व दोहों मध्यें अस्थींचें एकमेकांवर फक्त आच्छादन आहे, ह्मणून त्या खोट्या

आहेत. कारोनल, लांबदैदल, आणि साजितल ह्या खऱ्या शिवणी होत.

कारोनल शिवणीच्या योगानें फ्रांतल दोहों परैतलांशीं जुळतें. लांबदैदलच्या योगानें आक्सिपितल अस्थि दोहों परैतलांशीं जुळतें. साजितल ही कारोनलच्या मध्यापासून ल्यांबदैदलच्या मध्या पर्यंत पोंहचते; आणि दोहों परैतल अस्थींस एकमेकांशीं जुळविते.

आक्सिपितल आणि तेंपरल ह्यां मधील जोड ल्यांबदैदल शिवणीची पुरवणी होय.

स्क्वेमस शिवणी कमानीसारख्या आहेत, आणि त्या तेंपरल व परैतल ह्यांस एकमेकांशीं जुळवितात.

## मस्तकाचें बाहेरील आंग.

ह्या आंगाचे पांच देश केले आहेत.

वरचादेश अथवा माथा फ्रांतल अस्थीच्या उंचवट्यापासून आक्सिपितल अस्थीच्या टेंगळा पर्यंत, आणि तेंपरलखांचेच्या एक्या शिखेपासून दुसऱ्या शिखेपर्यंत पोंहचतो, आणि तो गुळगुळीत असून, त्यावर शिवणी आहेत.

खालचा देश अथवा बूड हें फार घोटाळ्याचें आहे; आणि ह्याची मर्यादा छेदकदंतांपासून आक्सिपितल अस्थीच्या टेंगळापर्यंत, व एक्या म्यास्तैद भागापासून दुसऱ्यापर्यंत अशी आहे. ह्याचे पुढला, मधला, आणि मागला, असे तीन भाग केले आहेत.

पुढलाभाग तालूची कमान होय. त्याच्या पुढें मध्यभागीं पुढलीं प्यालेतैनछिद्रें आहेत, आणि मागें प्रत्येक बाजूस मागलीं प्यालेतैनाछिद्रें आहेत.

मधल्याभागास तेरिगैद आणि म्यास्तैद भाग जुळीवणारी रेषा प्रत्येक बाजुची मर्यादा होते. मध्यभागीं आक्सिपितल अस्थीचा जाड भाग ह्मणजे ब्यासिलर प्रोसेस आहे. ह्याच्या मागल्या टोंकास पुढलीं कांदलैड छिद्रें आहेत त्यांतून ९ वा मज्जातंतु आतो. प्रत्येक बाजूस तेंपरल अस्थीचा कठीण भाग आहे, त्यावर वेजैनल व स्तैलैड हे भाग दिसतात; ह्याच्या मागें जुगुलर खांच आहे, तिचें, आक्सिपितलाच्या कांठाशीं जुळून मागलें फोरेमनल्यासरम छिद्र झालें आहे. पीत्रसभाग, आक्सिपितलाचा जाड-

## मस्तकाच्या पुढचा देश.



१ फ्रांतल्. २ मेल्र. ३ वरचें म्याक्सिलरी. ४ खालचें म्याक्सिलरी. ५ नेजल्. ६ ल्याक्रिमल. ७ एथमैड (आसपुनस भाग). ८ स्फीनैड (मोठा पक्ष). ९ आप्तिक छिद्र. १० स्फीनैदल् चीर. ११ स्फीनो म्याक्सिलरी चीर. १२ इन्फ्रा आर्बितल छिद्र. १३ नासिकाची पुढचीं छिद्रं. १४ दंत. १५ सिंफिसिस मेंटै. १६ मेंतल् छिद्र. १७ सुप्रा-आर्बितल् खांचणी किंवा छिद्र.

भाग आणि स्फीनैद ह्या अस्थींच्यामध्यें मधलें फोरेमनल्यासरम छिद्र आहे' त्यावरून करातिद धमनी जाते. पीत्रस भागाच्या आणि स्फीनैदाच्या मोठ्या पक्षाच्या लगत कांठावर, मागें व बाहेर जाणारी एक खांचणी आहे; तींत कर्णेंद्रियाच्या नळीचा कूर्चायुक्त भाग बसतो. ह्या देशांत आंतून बाहेर व पुढून मागें, पाहतां ओवेली, स्पैनोजम, करातिकम, आणि स्तैलोम्यास्तेदियम हीं छिद्रें आहेत. पुढें हा भाग नासिकाच्या मागल्या छिद्राशीं लागून आहे. तें छिद्र वोमर अस्थीनें दुभागलें आहे.

खालच्या देशाच्या मागल्या भागांत, म्यास्तैद भाग जुळविणारी रेषा आणि आक्सिपितल अस्थीचें टेंगूळ, ह्यांच्यामध्यें असणारे भाग आहेत. टेंगळापासून मोठ्या छिद्रापर्यंत जाणाऱ्या शिखेनें हा भाग दुभागला जातो, व त्याच शिखेपासून दोन वक्र रेषा बाहेर जातात. ह्या रेषांना व शेजारच्या भागाला स्नायु बद्ध आहेत. मोठ्या छिद्राच्या कांठावर व त्याच्या पुढील भागानजीक, आक्सिपितल अस्थीचे कांदैल ह्मणजे संधिभाग आहेत, त्यायोगानें हें अस्थि पहिल्या मणक्याशीं जुळतें. ह्या संधिभागांच्या मागें प्रत्येक बाजूस एक खांच बहुधा छिद्र असतें, त्यास मागलें कांदलैद छिद्र ह्मणतात. आणि पुढें व बाहेरल्या आंगास एक असतें, त्याला पुढलें कांदलैद छिद्र ह्मणतात.

मस्तकाचा पुढला देश अथवा मुख अंडाकार आहे, आणि तें फ्रांतल अस्थीच्या उंचवटया पासून हनवटी पर्यंत, आणि अक्षिकोशाचा बाहेरला कांठ व रेमस ह्या एका बाजूच्या भागां पासून, दुसऱ्या बाजूच्या त्याच भागांपर्यंत आहे. ह्यांत मुखाचा सर्व भाग येतो. वरून खालीं पाहतां जे भाग दिसतात ते.

कपाळाचे उंचवटे, लहान खळगे, शिखा आणि अक्षिकोशाच्या कांठ आणि ह्याच्या आंतल्या तृतीयांश अंतरावर फ्रांतलमज्जातंतु व सुप्राआर्बितल धमनी हीं जाण्याकरितां सुप्राआर्बितल छिद्र असतें. अक्षिकोशाच्या वरच्या शिखेखालीं कोशाचे खळगे आहेत. कोशाच्यामध्यें नाकाचा उंचवटा व कटकतुल्यभाग आहे. नाकाच्या खांचेच्या बाहेर, कनैनखांच, इन्फ्राआर्बितल छिद्र, गालाचा उंचवटा, आणि त्याखालीं दांतांची कमान, हीं आहेत.

खालचें दाभाड मुखाची खालची मर्यादा आहे; त्यांत खालच्या दांतांची कमान व तिच्या खालच्या आंगास हनवटीचा उंचवटा आहे. ह्याच्या प्रत्येक बाजूस मेंतलछिद्र आहे. अक्षिकोशाच्या कांठाच्या आंतल्या तृतीयांश अंतरापासून खालच्या दाभाडाच्या आंगाच्या आंतल्या तृतीयांश अंतरापर्यंत लंबरेषा काढली, तर ती पांचव्या मज्जातंतूच्या मुखाच्या शाखांस वाट देणारीं तीन छिद्रें सुप्राआर्बितल, इन्फ्राआर्बितल आणि मेंतल ह्यांना छेदील.

मस्तकाच्या बाजूच्या देशाचे तेंपरल, जिगोम्यातिक आणि म्यास्तैद असे तीन भाग केले आहेत.

तेंपरल भाग अथवा खांच हिची वरची व मागची मर्यादा तेंपरल शिखा, पुढची फ्रांतल अस्थीचा बाहेरील कोण व मेलर आस्थि आणि खालची मर्यादा जिगोमा आहे. ही खांच फ्रांतल, स्फीनैद ह्याचे मोठे पक्ष, परैलत, तेंपरल ह्याचा स्केमस भाग, मेलर आणि जिगोमा ह्या अस्थींनीं घटित आहे, आणि तींत तेंपरल स्नायु व खोल तेंपरल धमनी व मज्जातंतु हे आहेत.

म्यास्तैद भाग खरबरीत असतो, तेथें त्यास स्नायु बद्ध होतात. त्याच्या मागें म्यास्तैदछिद्र, आणि खालीं म्यास्तैदभाग आहेत. त्याच्या पुढें कर्णेंद्रियाचेंबाहेरीलछिद्र, व त्याच्या पुढें ग्लीनैदखांच आहे, तिला वर जिगोम्याच्या मुळीची आणि पुढें त्याच्या ग्रंथीची मर्यादा होते.

जिगोम्यातिकखांच उंच नीच आहे. ती जिगोम्याच्या खालीं आहे. तिला पुढें वरची म्याक्सिलरीअस्थि, आंत तेरिगैद भागाचा बाहेरला पडदा, वर स्फीनैदाचे मोठेपक्ष, तेंपरल ह्याचा स्केमसभाग व तेंपरलखांच आणि बाहेर जिगोम्याचीकमान, व खालच्या दाभाडाचें रेमस, ह्या मर्यादा आहेत. बाहेरला तेरिगैद, तेंपरल व आंतला तेरिगैद, हे स्नायु, आणि खालचा म्याक्सिलरीमज्जातंतु व आंतलीम्याक्सिलरी धमनी हे भाग ह्या खांचेंत राहतात. खांचेच्या आंतल्या व वरल्या भागास स्फीनोम्याक्सिलरी आणि तेरिगोम्याक्सिलरी चिरा आहेत. पहिली क्षितिजाशीं समांतर, स्फीनैद ह्याचे मोठे पक्ष व वरची म्याक्सिलरी अस्थि ह्यांच्यामध्यें

# मस्तकाचें बाजूचें अंग.



१ फ्रान्टल् अस्थि. २ परैटल् ३ आक्सिपिटल् ४ टेंपरल् अस्थीचा स्क्वामस भाग. ५ म्या-
स्टॅइड भाग, ह्याखालीं त्याचा म्यास्टॅइड उंचवटा होतो. ६ टेंपरल् ह्याच्या घटित करण्यात अंशभूत
होणारा स्फीनॉइडच्या मोठ्या पंखाचा भाग. ७ कारोनल् शिवण. ८ ल्याम्डॉइडल् शिवण,
होतें, ९. हें लहान वर्मियन् अस्थि आहे. १० टेंपरल् ह्याच्या मर्यादकरणारी टेंपरल् शिरा
११ झिगोमाची कमान. हिच्या खालीं झिगोम्याटिक खाच आहे १२ आडिटरि कर्णछिद्र
१३ टेंपरल अस्थीचा स्टिलॉइड भाग. १४ मेलर अस्थि १५ वरचें म्याक्झिलरी १६ नेझल्
अस्थि. १७ खालचें म्याक्झिलरी अस्थि, अंक अस्थीच्या कोनावर मांडला आहे १८ ह्या
अस्थीची कांडैल. १९ कारोनॉइड भाग, कांडैल व कारोनॉइड भाग हे अस्थीच्या उभ्या विभा-
गाचे अंश आहेत. २० वरच्या व खालच्या दाभाडांचें दांत.

आहे. दुसरी उभी पहिलीशीं काटकोण करून तेरिगैद भाग व वरच्या म्याक्सिलरी अस्थीचा उंचवटा ह्यांनीं झाली आहे. ह्याच्या संयोगस्थानीं स्फीनोम्याक्सिलरी खांच आहे, तींत रोतंदम, स्फीनोप्यालेतैन, तेरिगो-प्यालेतैन, पोस्तीरियरप्यालेतैन, आणि विदियन हीं पांच छिद्रें मिळतात. ह्या खांचेंत आंतली म्याक्सिलरी धमनी आणि मेकलचा ग्यांग्लियन हे भाग आहेत.

मस्तकाच्या आंतल्या आंगाचे दोनभाग आहेत, ते घुमट आणि बूड हे होत. घुमटाच्या मध्यभागीं लांजित्युदिनल सैनसाची खांचगी आहे.

बुडावर पुढला, मधला, आणि मागला असे तीन खळगे आहेत.

पुढला खळगा अक्षि कोशांचें छत झाला आहे, हा तेथें गोलबाह्य आणि मध्यें गोलांतर आहे, व ह्याची मागली मर्यादा लहान पक्ष होत. ह्या खळग्यांत मेंदूचे पुढचे गड्डे बसतात. मध्यें क्रिस्ताग्याली, त्यापुढें सीकमछिद्र, आणि प्रत्येक बाजूस छिद्रयुक्त पडदा आहे, ह्याच्या छिद्रांतून आलफ्याक्तरी व आफथालमिक ह्यांच्या नाकांतल्या मज्जातंतूच्या शाखा जातात. ह्या छिद्रांच्या बाहेर प्रत्येक बाजूस पुढलें व मागलें एथमैदलछिद्र आहे. ह्या मागें प्रोसेसस आलिवेरिस, ह्याच्या बाजूस आप्तिकछिद्रें पुढलें क्लैनेद भाग आणि करातिद धमनीच्या खांचण्या आहेत. हा खळगा स्फीनैद, एथमैद आणि फ्रांतल ह्या अस्थींनीं घटित आहे.

मधलाखळगा पुढच्याहून खोल आहे, तो पुढें स्फीनैद ह्याच्या लहान पक्षांनीं व मागें तेंपरल ह्याच्या पीत्रस भागांनीं मर्यादिला आहे, आणि स्फीनैद ह्याच्या आंगावरच्या खळग्यानें दुभागला आहे. हा खळगा स्फीनैद आणि तेंपरल ह्याचे स्क्वेमस व पीत्रस भाग ह्यांनीं घटित आहे, मध्यें स्फीनैद, ह्याच्या वरच्या बाजूस पिच्युतरी खळगा, ज्याला सेलातर्सिका ह्मणजे तुर्कलोकांच्या खोगरासारखा भाग ह्मणतात, तो आहे. त्याच्या प्रत्येक बाजूस आंतल्या करातिद धमनीच्या व क्यावर्नससैनसाच्या खांचण्या आहेत. त्याच्याबाहेरच्या आंगास पुढून धरून मागल्या भागाकडे मधल्या खळग्यांत हीं पुढील चार छिद्रें आहेत; स्फीनैदलचीर; रोतंदम, ओवेली, स्पैनोसम आणि ल्यासरम, मिदियम, हीं छिद्रें. पीत्रस भागाच्या पुढच्या

आंगावर, खांचणी आहे ती **फेलोपियेचे** नळाशीं मिळणाऱ्या चिरेंत जाऊन सुटते, आणि शेंड्यावर पांचवा मज्जातंतु जाण्याची **खांच** आहे, व ह्यामागें **कसेरियनग्यांग्लियन** राहण्याची लहान खांच आहे. मधल्या खळग्याच्या सर्व भागांत मेंदूचे मधले गड्डे बसतात.

**मागला खळगा** पहिल्या दोहोंपेक्षां मोठा आहे, तो **आक्सिपितल**, तेंपरल ह्याचे **पीत्रस** व **म्यास्तैद** भाग, आणि **स्फीनैद** व **परैतल** ह्यांचे लहान भाग ह्यांनीं घटित आहे. **पित्रसाचे** मागलें आंग ही ह्याची पुढची मर्यादा होते. आणि ह्यांत **पान्स**, **मेदल्ला**, आणि **सेरीबेलम** हे भाग बसतात. मध्यें **आक्सिपितलाचें** मोठें छिद्र ह्मणजे **फोरेमनम्याग्नम** आहे त्याच्या बाजूस, दुसऱ्या मणक्याचें संधिबंधन बद्ध होण्या साठीं खरबरीत भाग व पुढचीं कांदलैद छिद्रें, ह्यांची मर्यादा आहे. पुढून मागें पाहातां छिद्रें दिसतात, तीं कर्णेंद्रियाचें आंतील छिद्र, मागलें **ल्यासरेतेदफोरेमन**; मोठ्या छिद्राच्या मागें लांब शिखा आहे, तिला फाल्कससेरिबेलै ह्मणजे सेरिबेलमाचा पडदा बद्ध आहे, शिखेच्यावर **त्रांन्सवर्स** लातरल **सैनसांची** खांचणी आहे.

## अक्षिकोश. आर्बित.

अक्षिकोश हे मुखाच्या वरल्या आंगास चौपैलू पोंकळ सुळके आहेत. आणि **नेत्रगोलक** व **अश्रुपिंड** ह्यांचीं स्थानें होत. प्रत्येक कोशाचा आंस बाहेर झुकला आहे, तेव्हां दोहों बाजूंचे आंस **आप्तिक** छिद्रांतून वाढविले, तर ते **सेलातर्सिका** ह्या खांचेवर परस्परांस दुभागतील.

**फ्रांतलाचे** अक्षिकोशाचे पडदे, व **स्फीनैदाचे** लहान पक्ष, ही कोशांची वरची मर्यादा; **मेलरचा** लहान भाग व वरच्या **म्याक्सिलरीचे** आणि **प्यालेताचे** अक्षिकोशाचे पडदे, ही खालची मर्यादा, **ल्याक्रिमल** एथमैदाचा **आसप्लेनम** नामक बाहेरचा पडदा, आणि **स्फीनैदाच्या** आंगाचा थोडा भाग, ही आंतील मर्यादा; आणि **मेलर** ह्याचा कोशाचा पडदा व **स्फीनैदाचे** मोठे पक्ष, ही कोशाची बाहेरची मर्यादा होय. ह्या खांचेंतील चिरावगैरे;--**स्फीनैदल** आणि **स्फीनोम्याक्सिलरी** चिरा; **आप्तिक**, पुढलें एथमैदल, व मागलें **एथमैदल** हीं छिद्रें; **इन्फ्राआर्बितल** आणि **नेजल** नळ आणि **सप्राआर्बितल** खांच.

## नासिकाचाखळगा. नेजल्फासा.

नासिकाचे खळगे दोन आहेत, ते मुखाच्या मध्यभागीं असून, पुढून मागें पसरले आहेत. **नेजल, एथमैद,** व **स्फीनैद,** हीं ह्या खळग्याची वरची मर्यादा; वरचें **म्याक्सिलरी** व **प्यालेत** ह्यांचे तालूचे भाग हीं खालची मर्यादा; वरचें **म्याक्सिलरी, ल्याक्रिमल,** खालचें **तरबिनेतेद** व **एथमैदाचें** मधलें आणि वरचें **तरबिनेतेद, प्यालेत** आणि **स्फीनैद** ह्याच्या **तेरिगैद** भागाचा आंतला पडदा, ही बाहेरची मर्यादा होय. **वोमर** आणि **एथमैदाचा** उभा पडदा ह्यांनीं दोन खळगे निराळे झाले आहेत.

तीन **तरबिनेतेद** अस्थींच्या योगानें ह्या खळग्याचे तीन नळ झाले आहेत, त्यांस **मियेतस** ह्मणतात. वरचा नळ वरच्या व मधल्या **तरबिनेतेद** अस्थींच्या मध्यें; मधला मधल्या व खालच्या **तरबिनेतेद** ह्यांच्या मध्यें; आणि खालचा खालच्या **तरबिनेतेद** अस्थींच्या खालीं आहे. वरच्या नळांत एथमैदाचीं मागलीं छिद्रें व स्फीनैदल सैनसें मिळतात. मधल्यांत एथमैदाचीं पुढलीं छिद्रें, आंत्रमचा नळ आणि फ्रांतलसैनसें मिळतात; आणि खालचा सर्वांहून थोर त्यांत नाकाचा नळ व पुढलीं प्यालेतैन छिद्रें मिळतात.

## पिंजर. (थोऱ्यावस.) आणि ऊर्ध्वशाखास्थि.

**स्तर्नम** आणि फांसळ्या हीं पिंजराचीं अस्थि होत, आणि क्ल्याविक्ल्, स्क्याप्युला, ह्यूमरस, रेदियस, अल्ना, कार्पस, मेताकार्पस आणि फेल्यांजिस, ह्यांच्या अस्थि हीं सर्व ऊर्ध्वशाखास्थि होत.

## उरोस्थि. स्तर्नम्.

हें अस्थि पिंजराच्या मध्यावर आहे, व ह्याचा झोंक तिर्कस असून वरचें टोंक कण्यापासून थोड्या इंचाच्या अंतरावर आणि खालचें पुढें झुकलेलें. कण्यापासून बऱ्याच अंतरावर अशीं आहेत. हें अस्थि चापट असून ह्याजवर पांच आडव्या रेषा आहेत. त्यावरून मूळचे ह्याचे सहा तुकडे असतात, असें दर्शविलें जातें. हें अस्थिपुढें कांहींसें गोलबाह्य, मागें गोलांतर, खालीं बारीक, असें आहे. ह्याचे वरचा, मधला, आणि खालचा, असे तीन विभाग केले आहेत,

**वरचाविभाग** सरासरी चौपैलू असून वरच्या आंगास रुंद व जाड

आहे, आणि ह्या ठिकाणीं त्याचा कांठ गोलांतर आहे, आणि खालच्या आंगास मधल्या विभागाशीं जुळण्याच्या जाग्यावर अरुंद आहे. वरच्या प्रत्येक कोणावर क्ल्याविकल ह्या बरोबर जुळण्याकरितां एक खांच आणि प्रत्येक बाजूवर पहिल्या फांसळीची एक व दुसरीची अर्धी कूर्चा जुळण्याकरितां दोन लहान खांचा आहेत.

**मधलाविभाग** वरच्यापेक्षां बराच लांब आहे, व मध्यें रुंद आणि दोहों टोंकांस कांहींसा अरुंद आहे. ह्याच्या प्रत्येक बाजूस संधीच्या सहासहा खांचा आहेत. त्यांत दुसऱ्या फांसळीचा खालचा अर्धा भाग, पुढच्या चोहोंचे सगळे, आणि सातवीचा वरचा अर्धा भाग असे बसतात.

**खालचाविभाग** तरवारीसारखा व सर्वांहून लहान आहे. हा निरनिराळ्या आकृतीचा असतो, व ह्याच्या प्रत्येक बाजूस सातव्या फांसळीच्या कूर्चेच्या खालच्या अर्ध्या भागाच्या संधीची खांच आहे. तिसऱ्यास एन्सिफार्म कूर्चा ह्मणतात.

ह्याचा संधि १६ अस्थींबरोबर आहे. २ क्याविकल व १४ फांसळ्या.

## फांसळ्या. रिब्स्.

फांसळ्या प्रत्येक बाजूस १२ आहेत, त्यांत ७ स्तनमाशीं जुळल्या आहेत, त्यांस खऱ्या; व पांच न जुळणाऱ्या आहेत., त्यांस खोट्या फांसळ्या ह्मणतात. आणि शेवटल्या दोन सर्वांहून अखूड त्यांस फ्लोटिंग ह्मणजे तरत्या फांसळ्या ह्मणतात. फांसळ्या पहिली पासून आठवी पर्यंत लांब होत गेल्या आहेत. नंतर आठवीपासून बारावीपर्यंत उत्तरोत्तर अखूड होत गेल्या आहेत. त्यांची रुंदी पहिली पासून शेवटची पर्यंत कमी होत गेली आहे. शेवटल्या दोन निराळ्या करून बाकी सर्व मागल्यांपेक्षां पुढल्या टोंकांस रुंद आहेत. पहिली फांसळी क्षितिजाशीं समांतर आहे. बाकीच्या थोड्या बहुत तिर्कस आहेत, त्यामुळें त्यांचीं पुढलीं टोकें मागल्यांपेक्षां खालीं आहेत. प्रत्येक फांसळीला आंतलें व बाहेरलें आंग, वरचा व खालचा कांठ आणि दोन टोकें आहेत; आणि पिंजराच्या कमानीशीं मिळण्याकरितां ती वाकडी होऊन मुरगाळली आहे, तेव्हां ती खालच्या कांठावर ठेविली असतां, तिचें कण्याकडचें टोक वर येतें, आणि दुसरें जमीनीवर सपाट बसतें.

# पिंजर अथवा छाती.




* तीन तुकड्यांनीं घटित स्तर्नम. अ. १ला तुकडा. ब. २ रा तुकडा. क. ३ रा तुकडा, अथवा एन्सि फार्म कूर्चा. १ पासून १२ पर्यंत फासळ्या; व खऱ्या, खोट्या, आणि तरत्या, हे त्यांचे तीन वर्ग. १३ फासळ्यांच्या कूर्चा. १४ पाठीचा १ला मणका. १५ पाठीचा शेवटला मणका.

**बाहेरीलअंग** गोलबाह्य आणि आंतील, चापट आहे. तें पूरा बरोबर मिळतें, वरचा कांठ गोल आणि खालचा बारीक आहे, त्याच्या मागल्या आंगास **इन्तरकास्तल** रक्तवाहिन्या व स्नायु ह्यांसाठीं खांचणी आहे. कण्याकडच्या टोंकाजवळ फांसळीचा भाग एकाएकीं जास्ती वांकला आहे, आणि बांकाजवळ बाहेरच्या आंगावर एक खरबरीत तिर्कस शिखा आहे, ती फांसळीचा **कोण** होय. कोणाच्यामागें खरबरीत उंचवटा आहे, तीच फांसळीची ग्रंथि. ह्या ग्रंथीच्या खालीं बुडाजवळ गुळगुळीत संधिभाग आहे, तो फांसळ्या आणि शेजारच्या मणक्यांचे पक्षतुल्य भाग, ह्यांचा संयोग करितो. मणक्याकडचें टोंक पसरलें आहे, त्यास फांसळीचें **डोकें** ह्मणतात. ह्या भागाच्या व ग्रंथीच्या बाहेर व खालीं मान आहे. डोक्याच्या टोंकाजवळ अंडाकार संधिभाग आहे, त्याचे एका शिखेच्या योगानें दोन भाग झाले आहेत, त्यांस मणक्याचे लगतचे कांठ जुळतात.

१ ली, २ री, १० वी, ११ वी, आणि १२ वी, ह्या फांसळ्या असाधारण आहेत. **पहिली** फांसळी क्षितिजाशीं समांतर, चापट, रुंद, व सर्वांहून अखूड, पिंजराच्या वरच्या आंगास आहे. तिचीं अंगें इतर फांसळ्यांप्रमाणें पुढें व मागें न झुकतां, वर आणि खालीं झुकलीं आहेत. वरच्या आंगच्या पुढच्या एक तृतीयांश अंतरावर आंतल्या कांठाजवळ एक ग्रंथि आहे, तिला पुढला स्कलीनस स्नायु बद्ध आहे. ह्याग्रंथीच्यापुढें व मागें एक उथळ खांचणी आहे, त्यांत पुढलींत सबक्लेवियन शीर व मागलींत सबक्लेवियन धमनी हे भाग परस्पर बसतात. मागल्या टोंकावर गुळगुळीत संधिभाग आहे, त्यास पाठीच्या पहिल्या मणक्याचा पक्षतुल्यभाग जुळतो. ह्या फांसळीला कोण नाहीं व हिच्या डोक्यावर एकच संधिभाग आहे.

**दुसरी** बहुतकरून पहिली सारखीच आहे, व तिच्या बाहेरल्या आंगास खरबरीत भाग आहे.

**दाहवीच्या** डोक्यावर एकच संधिभाग आहे.

**आकरावी** व **बारावी** ह्या फांसळ्यांच्या डोक्यांवर एकच संधिभाग आहे, व ह्यांस मान व ग्रंथि नाहींत; आणि प्रत्येकीचें पुढचें टोंक बारीक व मोकळें आहे. अकरावीला कोणाची खूण आहे; परंतु बारावीला नाहीं.

## फांसळ्यांच्याकूर्चा. कार्तिलेज.

ह्यांच्या योगानें फांसळ्या पिंजराच्या पुढच्या भागापर्यंत पोंहचतात, आणि पिंजराचा लवचिकपणाही मुख्यत्वेंकरून ह्यांच्या योगानेंच सिद्ध होतो. कूर्चा फांसळ्यांकडच्या टोंकांजवळ रुंद आहेत, परंतु दुसऱ्या टोंकांकडे चिंचोळ्या ह्मणजे गायदूम होत गेल्या आहेत; त्यांची रुंदी पहिली पासून शेवटली पर्यंत कमी होत गेली आहे. लांबी पहिली पासून सातवी पर्यंत जास्ती होत गेली आहे. पुनःसातवीपासून शेवटच्या कूर्चेपर्यंत कमी होत गेली आहे. पहिल्या दोन फांसळ्यांच्या कूर्चा क्षितिजाशीं समांतर आहेत; बाकीच्या उत्तरोत्तर वर झुकल्या आहेत. वरच्या सात कूर्चा स्तर्नमाशीं जुळतात; त्यांच्या खालच्या तीन आहेत त्या लगतच्या वरच्या कूर्चांशीं जुळतात; आणि खालच्या दोन फार अखूड, बारीक टोंकाच्या व मोकळ्या असतात.

## जत्रु. क्ल्याविकल्.

हें अस्थि लांब इतालिक *S* एस ह्या वर्णाच्या आकाराचें आहे. आणि पिंजराच्या वरच्याबाजूस स्तर्नम ह्याच्या वरच्या विभागापासून खांद्याच्या टोंकापर्यंत लांब आहे, व एथें स्क्याप्युलाशीं जुळतें.

ह्या अस्थीचें स्थान किंचित् तिर्कस आहे; स्तर्नमाकडचें टोंक, स्क्याप्युला कडच्या टोंकापेक्षां कांहींसें खालीं, व पुढें झुकलें आहे; आणि अस्थीचे बांक असे आहेत, कीं स्तर्नमाकडच्या टोंकास गोलबाह्यता पुढें येते, आणि स्क्याप्युला कडच्या टोंकास गोलांतरता पुढें येते. ह्या अस्थीचा स्तर्नमा कडचा अर्धभाग गोल अथवा सरासरी चौपैलू आहे, आणि त्याच्या शेवटास रुंद संधिभाग आहे. स्क्याप्युला कडचा अर्धभाग, वरून खालीं चापट, व टोंकाकडे रुंद आहे, आणि संधिभाग थोड्या अंशास लागला आहे. नळीच्या वरचें आंग गुळगुळीत गोलबाह्य आणि कांहीं भागावर सहज हातास लागण्यासारखें आहे. खालचें आंग सबक्लेवियस स्नायु बद्ध होण्यासाठीं खोल झालें आहे, खालच्या आंगावर स्तर्नमाकडच्या बाजूस संधिबंधन बद्ध होण्यासाठीं खरबरीत उंचवटा आहे, आणि ह्याच कारणास्तव दुसऱ्या टोंकाकडे एक ग्रंथि व शिखा आहे. खालच्या आंगास पुष्टीच्या

## स्क्यापुला. पृष्ठभाग.




| | |
|---|---|
| १ डोकें. (ग्लीनैद खांच.) | ५ कंटक. |
| २ बूड. | ६ अक्रोमियन भाग. |
| ३ वरचा कोण. | ७ कारेकैद भाग. |
| ४ खालचा कोण. | ८ सुप्रा स्क्यापुलर खांचणी. |

रक्तवाहिन्या साठीं छिद्र आहे. पुढच्या कांठाचा **स्तर्नमा** कडचा **अर्धभाग** रुंद व गोलबाह्य आणि **स्क्याप्युला** कडचा **अर्धभाग** अरुंद व गोलांतर आहे. पहिल्यास **पेक्तोरेलिसमेजर** व दुसऱ्यास **देल्तैद** स्नायुबद्ध आहे.

मागल्या कांठाचा आंतील $\frac{2}{3}$ रुंद व खोल गोलांतर आहे, त्यास **स्तर्नोहैयैद** स्नायु बद्ध आहे; बाहेरील $\frac{1}{3}$ अरुंद गोलबाह्य व उंचनीच आहे, त्याला **त्रपीजियस** स्नायु बद्ध आहे. ह्याचा संधि **स्तर्नम,** पहिल्या फासळीची कूर्चा, आणि स्क्याप्युला, ह्यांबरोबर आहे.

## अंसफलक. स्क्याप्युला.

हें चापट त्रिकोणाकार अस्थि पिंजराच्या मागें आहे, व ह्यानें दुसऱ्या फांसळी पासून सातव्या फांसळीपर्यंत जागा व्यापली आहे. ह्याला पुढलें व मागलें आंग; वरचा, खालचा व मागला कांठ; पुढचा, वरचा व खाल-चा कोण आणि भाग आहेत.

**पुढचें आंग** ह्मणजे **सबस्क्याप्युलरफासा** हें गोलांतर आणि उंचनीच आहे, आणि ह्यावरून वर व बाहेर जाणाऱ्या कित्येक शिखा आहेत. वरच्या कोणाजवळचा त्रिकोणाकार भाग सोडून ह्या आंगाचा बाकी सर्व भाग **सबस्क्याप्युलेरिस** स्नायूनें भरला आहे.

**मागलें आंग** ह्मणजे पृष्ठभाग गोलबाह्य आहे. त्याचे कंटकतुल्य भागानें लहानमोठे दोन खळगे झाले आहेत. त्यांत वरचा **सुप्रास्पैनस** आणि खालचा **इन्फ्रास्पैनस** खळगा होय.

**वरचा कांठ** पातळ, गोलांतर आणि दुसऱ्यापेक्षां अखूड आहे. त्याच्या एकाटोंकास वरचा कोण व दुसऱ्या टोंकास **कारेकैद** भाग आहे. त्याच्या भुजास्थीकडच्या टोंकाजवळ **सुप्रास्क्याप्युलरखांच** आहे, ती कांहीं अंशीं **कारेकैद** भागानें झाली आहे, आणि तींतून **सुप्रास्क्याप्युलर** मज्जातंतु जातो.

खालचा ह्मणजे काखेचा **कांठ** जाड आहे, व त्यावर पुष्कळ खांच खळगे आहेत; वर **ग्लीनैद** खाचे जवळ आणि खालीं खालच्या **कोणा** जवळ हा कांठ संपतो. ह्या खांचेलगत खालच्या आंगास एक खरबरीत शिखा आहे, तिला **त्रैसेप्स** स्नायूचें लांब डोकें बद्ध आहे. ह्याकांठाच्या

मागल्या आंगावर वरतीं खळगा आहे, त्याला **तीरिसमैनर** आणि पुढच्या आंगावर खालीं खोल खांचणी आहे, तिला **तीरिजमेजर हा स्नायु बद्ध** आहे. ह्या कांठाच्या मागल्या आंगाच्या खालच्या तृतीयांशास **ही हाच स्नायु** बद्ध आहे.

**मागला कांठ** तिहींमध्यें सर्वांहून लांब, पाठीच्या कण्याकडे झुकला आहे, हा जाडीपणा विषयीं मध्यम आहे, व गोलबाह्य असून ह्यास कित्येक **स्नायु-बद्ध** आहेत.

**पुढचाकोण** अस्थीच्या सर्व भागांहून जाड, हाच ह्या अस्थीचें **डोकें** होतें; ह्या खालीं आकुंचित भाग आहे, त्यास **मान** ह्मणतात. **डोक्यावर** अंडाकार **ग्लीनैदखांच** हा संधिभाग आहे, तिचें बारीक टोंक वर झुकलें आहे, आणि शेंड्या जवळ खरबरीत खांच आहे, तिला **बैसेप्स स्नायूचें** लांब तेंदन बद्ध आहे.

**वरचा कोण** पातळ आणि टोंकाचा आहे.

**खालचाकोण तीरिजमेजर** व **लातिसिमसदार्सैचें तेंदन** फिरण्याचा बर्सा हे बद्ध होण्याकरितां जाड व गुळगुळीत आहे. ह्याकोणाच्या मागें व वर, काखेच्या कांठाच्या मागल्या आंगावर, रुंद खरबरीत भाग आहे. त्यास **तीरिजमेजर** स्नायु बद्ध आहे.

ह्या अस्थीचा **कंटकतुल्यभाग** ह्याच्या पृष्ठभागावर आडवा आला आहे, ह्याची आकृति त्रिकोण आहे, आणि **त्रपीजियस** स्नायूचें पंख्या सारखें **तेंदन** फिरण्याकरितां, ह्याच्या मागल्या कांठाजवळ जो त्रिकोणाकार गुळगुळीत भाग आहे, तेथें ह्याचा आरंभ होतो; व खांद्याच्या टोंकाजवळ अक्रोमियन भाग आहे, हाच ह्याचा शेवट होय. आरंभापासून थोडक्या अंतरावर जेथें कंटकतुल्यभाग लागतो तेथें एक ठळक ग्रंथि आहे, तीच **त्रपीजियस** स्नायूच्या बद्ध स्थानाच्या शेवटाची मर्यादा आहे. कंटकतुल्यभागाचा वरचा कांठ खरबरीत व त्वचेवरून सहज स्पर्शास येतो, व त्याचे दोन ठळक कांठ आहेत, त्यांत वरच्याला **त्रपीजियस** व खालच्याला **देलतैद** स्नायु बद्ध आहे. कंटकतुल्यभागाच्या आंगांनीं **सुप्रा** व **इन्फ्रास्पैनसफासा** नामक **खांचा पूर्ण होतात.**

## डाचें भुजास्थि. पुढचें अंग.




१ डोकें.
२ मान.
३ मोठा उंचवटा.
४ लहान उंचवटा.
५ बैसिपितल खांचणी.
६ नळी.
७ देल्टोइद स्नायुसाठीं खरबरीत स्थान.
८ आंतील कांदेल.
९ बाहेरील कांदेल.
१० कप्पी सारखा संधिभाग.
११ रेडियस साठीं संधिभाग.

**आक्रोमियनभाग** कांहींसा त्रिकोणाकार आहे, व वरून खालीं चापट झाला आहे, तो ग्लीनैद खांचेवर आलेला आहे. वरचें आंग खरबरीत आहे, तें त्वचेवरून सहज स्पर्शास येतें. खालचें आंग गुळगुळीत व खांद्याशीं लगत आहे; आणि टोंकाजवळ क्ल्याविकलासाठीं संधिभाग आहे.

**कारैकैद** हा जाड, गोल आणि वांकडा अस्थीचाभाग स्क्याप्युलाच्या **माने** जवळ सुरू होतो, आणि **ग्लीनैद** खांचेवर कमानी सारखा येतो; तो सुमारें दोन इंचलांब व फार जाड आहे, व त्यास पुष्कळ स्नायु व संधिबंधनें बद्ध आहेत.

ह्याचा संधि **क्ल्याविकल** आणि **ह्यूमरस** ह्यांशीं आहे.

## भुजास्थि. ह्यूमरस.

हें अस्थि लांब आहे, ह्मणून ह्याचे **नळी** आणि दोन **शेंवटें** असे विभाग केले आहेत.

**वरच्याशेवटास** गोल डोकें आहे. त्याखालीं, सभोंवतीं आकुंचित झालेला भाग, त्यास **मान** असें ह्मटलें आहे. तो आणि **मोठें** व **लहान टेंगूळ** असे भाग आहेत. मोठें टेंगूळ, लहान टेंगळापासून **बैसिपितल** खांचेनें वेगळें झालें आहे. त्या खांचेंत **बैसेप्स** स्नायूचें लांब तेंदन बसतें. डोक्याच्या खालीं ह्या खांचेचे कांठ वर उचलले आहेत; त्यांस मागिल व पुढील **शिखा** अशीं नांवें आहेत. त्यांपैकीं मागलीस, **ल्यातिसिमसदार्सै**, व **तीरीजमेजर**, ह्या स्नायूंचीं **तेंदनें** लागलीं आहेत, आणि पुढलीस **पेक्टोरेलिसमेजरचें तेंदन** लागलें आहे. टेंगळांच्या खालीं आकुंचित झालेला अस्थीचा भाग अपघातानें भंग पावतो, ह्मणून त्यास शस्त्रविद्येच्या संबंधानें मान ह्मणतात; येणें करून हिचा त्या अस्थीच्या खऱ्यामा नेपासून भेद झाला आहे.

ह्या अस्थीची **नळी** वर त्रिकोणाकार, आणि खालीं पुढून मागें चापट होत गेली आहे. नळीस **आंतला, बाहेरला**, व **पुढला**, असे तीन **कांठ** व **आंतलें, बाहेरलें**, व **मागलें**, अशीं **तीनआंगें** आहेत. बाहेरल्या आंगास मध्यावर खरबरीत त्रिकोणाकार उंचवटा आहे. त्याला **देलतैद** व त्याच्या प्रत्येक बाजूस गुळगुळीत खोलगा आहे, त्यास **ब्रेकियेलिसअंतैकस** ह्या

स्नायूचीं दोन डोकीं लागलीं आहेत. मध्याच्या आंतल्या बाजूस **कारेको-ब्रेकियेलिस** स्नायु बद्ध होण्यासाठीं एक खांचणी आहे. नळीच्या आंतल्या अंगास पोषक छिद्र आहे. मागल्या आंगास **ट्रैसेप्स** स्नायूचें आंतलें व बाहेरलें डोकें बद्ध आहे.

**खालचें शेंवट** पुढून मागें चापट आहे, त्यावर लांब संधिभाग आहे. तो एका शिखेनें दुभागला आहे, त्यापैकीं बाहेरला भाग गोल उंचवट्यासारखा आहे, तो **रेदियस** बरोबर जुळतो. आंतला, गोलांतर कप्पीसारखा आहे, तो **अल्ना** बरोबर जुळतो. संधिभागापलीकडे प्रत्येक बाजूस **कांदैल** ह्मणजे उंचवटा आहे, त्यांपैकीं आंतला अधिक लांब आहे. दोन कांदैलांपासून वर चढणाऱ्या दोन शिखा आहेत, त्यांपैकीं बाहेरची फार ठळक आहे. ह्या उंचवट्यांस व शिखांस स्नायु बद्ध आहेत. कप्पीसारख्या संधिभागापुढें एक खळी आहे. तींत **अल्नाचा कारोनैद** भाग हात अखडतांनां बसतो, आणि मागें दुसरी खळी आहे, तींत हात लांबवितांनां **अल्नाचा ओलिक्रे-नन** भाग बसतो. ह्या खळ्यांच्या लगत वर संधिबंधनें बद्ध आहेत.

ह्याचा संधि **स्क्याप्युलाची ग्लीनैदखांच, अल्ना** आणि **रेदियस** ह्यांशीं आहे.

## कूर्परास्थि. अल्ना.

अल्ना ह्या लांब अस्थीचे **नळी** आणि **शेंवटें** असे विभाग केले आहेत. **वरचें शेंवट** मोठें त्याच्याच योगानें मुख्यत्वेंकरून कोपराचा संधि झाला आहे; खालचें शेंवट लहान आहे. तें एका फैब्रोकार्तिलेजानें मणगटाच्या संधीपासून निराळें झालें आहे.

वरच्या शेंवटावर ह्यूमरसाबरोबर जुळण्याकरितां मोठी गोलांतर अर्धचंद्राकार खांच आहे. ती **मोठीसिगमैदखांच** होय. आणि बाहेरच्या आं-गास, रेदियस बरोबर जुळण्याकरितां **लहानसिगमैदखांच** आहे. मोठया सिगमैद खांचेच्यामागें **ओलिक्रेनन** भाग, व पुढें टोंकाचा व खरबरीत त्रिकोणाकार बुडाचा भाग **कारोनैदप्रोसेस,** तिजवर चढून आला आहे लहान सिगमैद खांचेमागें व ओलिक्रेननापासून खालीं झुकलेला, असा एक त्रिकोकार उंचनीच भाग आहे तो, अंकोनियस स्नायू करितां योजि

## डावा प्रकोष्ठ आणि हस्त ह्यांचीं अस्थी.



ला आहे, आणि ओलिक्रेनन ह्याच्या मागल्या आंगास एक गुळगुळीत त्रिकोणाकार, व त्वचेवरून सहज स्पर्शास येणारा भाग आहे. ह्याच्या वरल्या आंगास ट्रैसेप्स स्नायु बद्ध होण्यासाठीं चौपैलू भाग आहे.

नळीचा आकार त्रिकोण आहे, व तिला पुढलें, मागलें, व आंतलें अशीं तीन आंगें व तीन कांठ आहेत.

**पुढीलआंगाचा** तीन चतुर्थांश भाग, **फ्लेक्सरप्रोफंदसदिजितोरम**, ह्या स्नायूनें आच्छादिला आहे, आणि ह्याखालीं एक शिखा व **प्रोनेतरक्वाद्रेतस** स्नायू करितां खांच हे भाग आहेत. मध्याच्या कांहींसें वर पोषक धमनीचें छिद्र आहे. **मागल्याआंगास** वर **अंकोनियस** स्नायू करितां उंचसखल, त्रिकोणाकार, दबलेला भाग आहे; त्याच्या खालच्या मर्यादेस एक तिरकस शिखा आहे; तिच्या खालीं स्नायु बद्ध होण्यासाठीं पुष्कळ खांचण्या आहेत; **आंतलेंआंग** बहुतकरून सारें **फ्लेक्सरप्रोफंदसदिजितोरम** ह्या स्नायूनें. आच्छादित आहे. पुढचा कांठ गोल, त्याच्या खालच्या चतुर्थांश भागावर **प्रोनेतरक्वाद्रेतस** ह्या स्नायूचा आरंभ होतो. मागला कांठ अधिक ठळक आहे, त्यास **फ्लेक्सर** व **एक्स्तेन्सरकार्पैअल्नेरिस** हे स्नायु बद्ध आहेत; हा कांठ वरच्या शेवटाकडे त्वचेवरून सहज स्पर्शास येणारा जो त्रिकोणाकार भाग ओलिक्रेनन तोच होतो. बाहेरील कांठ अस्थि जुळविण्याच्या त्वचेस आश्रय देण्याकरितां बारीक झाला आहे.

खालच्या शेवटास लहान गोल डोकें आहे, त्याच्या आंतल्या आणि मागल्या आंगापासून **स्तैलैदप्रोसेस** हा भाग निघतो. ह्यावर त्रिकोणाकार **फैब्रोकार्तिलेज** बद्ध होण्यास खांचणी व मणगटाच्या आंतल्या आंगचें संधिबंधन बद्ध होण्यास टोंक आहे. स्तैलेद भागाच्या समोरल्या भागावर रेदियस अस्थीशीं जुळण्याचा गुळगुळीत संधिभाग आहे.

ह्याचा संधि **ह्यूमरस** आणि **रेदियस** ह्या दोन अस्थींशीं आहे. हें अस्थि कार्पसमधल्या क्युनिऐफार्म ह्या अस्थीपासून संधिमधील त्रिकोणाकार **फैब्रोकार्तिलेज** ह्यानें निराळें झालें आहे.

## मणिबंधाधारास्थि. रेदियस.

हें हातास चक्रावर्त गति उत्पन्न करणारें अस्थि नळी आणि दोन शेव-

टें ह्यांहीं करून युक्त आहे. ह्याचा प्रकार अल्नाच्या विरुद्ध आहे, ह्याचें वरचें शेवट लहान तें कोंपराचा संधि होण्यास फक्त सहायकारी आहे, परंतु खालचें शेवट मोठें आहे, व मुख्यत्वेंकरून त्यानेंच मणगटाचा संधि होतो.

वरच्या शेवटावर गोल डोकें आहे. तें दबून उथळ प्याल्यासारखी खांच झाली आहे. डोक्यासभोंवतीं गुळगुळीत संधिभाग आहे. तो अल्नाच्या लहान सिगमैद खांचेंत बसण्याकरितां आंतल्या आंगास रुंद झाला आहे, व बाकीच्या ठिकाणीं आर्बिक्युलर संधिबंधनांत खेळण्याकरितां अरुंद आहे. डोक्याखालीं आकुंचित मान नांवाचा भाग आहे. व मानेच्या आंतल्या आंगास ठळक उंचवटा आहे. उंचवटा कांहीं भागीं खरबरीत आहे, तेथें त्याला बैसेप्स ह्या स्नायूचें तेंदन बद्ध आहे. आणि बाकीच्या ठिकाणीं गुळगुळीत आहे तेथें, अस्थि व तेंदन ह्यांमध्यें बरसा आहे.

नळी त्रिकोणाकार आहे. तीन आंगें आहेत. पुढचें आंग वर गोलांतर व खालीं चापट आहे, आणि दोन्ही ठिकाणीं स्नायु राहातात. वरच्या तृतीयांश अंतरावर पोषक धमनीचें छिद्र आहे. मागलें आंग वर गोल व खालीं खांचण्यांनीं युक्त आहे. ह्यास स्नायु बद्ध आहेत. बाहेरलें आंग गोलबाह्य आहे, त्यावर उंचवट्यापासून स्तैलैद भागापर्यंत जाणारी तिरकस शिखा आहे. आंतल्या कांठावर बारीक शिखा आहे, तिला अस्थि जुळविणारी त्वचा लागली आहे. रेदियसला पुढला, मागला, व आंतला, असे तीन कांठ आहेत; त्यांपैकीं आंतला फार तीक्ष्ण आहे. त्यास अस्थींमधील त्वचा बद्ध आहे.

खालचें शेवट रुंद व त्रिकोणाकार आहे. त्यावर दोन संधि भाग आहेत. एक लहान व गोलांतर, अल्नाच्या डोक्याशीं जुळण्यासाठीं ह्या अस्थीच्या बाजूवर आहे; दुसरा शेवटावर आहे, त्याचे एका शिखेच्या योगानें दोन भाग झाले आहेत; एक बाहेरचा त्रिकोणाकार स्केफैदशीं आणि आंतला चौपैलू सेमिल्यूनर ह्या मणगटाच्या अस्थीशीं जुळतो. शेवटाच्या बाहेरल्या बाजूस बळकट व गायदूम असा एक स्तैलैद नामक भाग आहे. त्याच्या बुडास सुपैनेटर लांगस स्नायु व शेवटास मणगटाच्या संधीचें बाहेरील

संधिबंधन लागलें आहे. संधिभागाच्या आंतल्या कांठास अल्नाच्या संधीमधील फैब्रोकार्तिलेजाचें बूड बद्ध आहे. स्तैलैद भागाच्या मागें व पुढें खांचण्या व एक शिखा असे भाग आहेत. त्यांतून स्नायूंचीं तेंदनें जातात.

ह्याचा संधि, ह्यूमरस, अल्ना, स्केफैद, व सेमिल्यूनर ह्या चार अस्थींशीं आहे.

## मणिबंधास्थि. कार्पस ( मणगट )

मणगटाचीं अस्थि ८ आहेत, व तीं दोन ओळी मध्यें बसविलीं आहेत. पहिल्या ओळींत रेदियसच्या बाजूकडून आरंभ केला म्हणजे, **स्केफैद, सेमिल्यूनर, क्यूनिऐफार्म**, व **पिसिफार्म** आहेत. दुसऱ्या ओळींत तसेंच मोजलें असतां **त्रपीजियम्, त्रापिजैद, आसम्याग्नम**, आणि **अन्सिफार्म** हीं आहेत.

**स्केफैद**चा आकार कांहींसा नावेसारखा आहे, म्हणून त्यास हें नांव दिलें आहे; एक शेवट रुंद, दुसरें नावेच्या नाळी सारखें अरुंद आहे. एकबाजू गोलांतर व दुसरी गोलबाह्य आहे. तथापि एका बाजूस चापट व गोलांतर अशा काजूच्या बोंडाशीं ह्या अस्थीचें अधिक साम्य आहे. बारकाईनें पाहिलें असतां, त्याला गोलांतर व गोलबाह्य आंग, गोलांतर व गोलबाह्य कांठ रुंद शेवट आणि अरुंद व बारीक टोंक तोच उंचवटा असे भाग दिसतात. ह्याचा संधि पांच अस्थींशीं आहे; **रेदियस, आसम्याग्नम, सेमिल्यूनर, त्रपीजियम, त्रापिजैद**.

**सेमिल्यूनर** ह्या अस्थीची गोलांतरता व कच्चा आकार अर्धचंद्राकार आहे, आणि हिला चार संधियुक्त आंगें व दोन शेवटें आहेत. चार संधियुक्त आंगांपैकीं एक गोलांतर व एक गोलबाह्य, आणि दोन बाजूचीं आहेत. एक शेंडा पाठीकडचा चौपैलू, चापट, खांडेपडलेला, आणि दुसरा तळव्याकडचा गोलबाह्य, वाटोळा व पाठीकडच्या पेक्षां मोठा आहे.

ह्याचा संधि, **रेदियस, आसम्याग्नम, स्केफैद, क्युनिऐफार्म** व **अन्सिफार्म** ह्या पांच अस्थींशीं आहे.

**क्यूनिऐफार्म**, हें पाचरे सारखें आहे, व ह्याच्या पुढील आंगावर, पिसिफार्म अस्थीकरितां एकच वाटोळा संधिभाग आहे, तेणें करून ह्याची पुर्ती ओळख होते. ह्या अस्थीस तीन आंगें, बूड, व शेवट असे आहेत.

ह्याचा संधि, **सेमिल्यूनर**, **पिसिफार्म** आणि **त्रिकोणाकार फैब्रोकार्टिलेज** ह्यांशीं आहे.

**पिसिफार्म** हें त्याच्या लहान आकारावरून, व त्याजवर एकच साध भाग आहे, त्यावरून ओळखलें जातें.

ह्याचा संधि फक्त **क्यूनिऐफार्म** अस्थीशीं आहे.

## दुसरी ओळ.

**त्रपिजियमा**चा आकार फार उंच खोल आहे. ह्याच्या तळव्याकडच्या कांठावर **फ्लेक्सरकार्पै रेडियेलिसच्या** तेंदनाकरितां खोल खांचणी आहे, तिजवरून हें ओळखलें जातें. ह्याला दोन संधींचीं आंगें व तीन खरबरीत कांठ आहेत; एक संधीचें आंग अंडाकार आहे, आणि एकाबाजूस गोलांतर, व दुसऱ्या बाजूस गोलबाह्य आहे; तें आंगठ्याच्या अस्थीशीं जुळतें. दुसऱ्या आंगाचे तीन भाग झाले आहेत. एका कांठावर वर सांगितलेली खांचणी आहे, व तिजवर चढून आलेली ग्रंथि आहे, तीस अन्युलर संधिबंधन लागलें आहे. दुसरे दोन कांठ खरबरीत आहेत, ते, मणगटाच्या बाहेरल्या आंगास आहेत.

ह्याचा संधि चार अस्थींशीं आहे. गोलांतर व गोलबाह्य आंग पहिल्या म्हणजे आंगठ्याच्या मेताकार्पलाशीं, दुसरें, आंगावरील तीन भागांनीं, **स्केफैद**, **त्रापिजैद**, व **दुसरें मेताकार्पल** अस्थि ह्यांशीं.

**ड्यापिजैद** लहान, चौपैलू, मध्यें मुरगाळल्या सारखें दिसतें. ह्याला चार संधींचीं आंगें आणि दोन शेवटें आहेत. एक आंग एकाबाजूस गोलांतर, व दुसऱ्या बाजूस गोलबाह्य, दुसरें गोलांतर आणि बाकीचीं दोन चापट, त्यावर सांगावयासारखें कांहीं नाहीं. पाठीकडचें शेवट रुंद व मोठें आणि तळव्याकडचें लहान व खरबरीत आहे.

ह्याचा संधि चार अस्थींशीं आहे. **दुसरें मेताकार्पल**, **आसम्याग्नम**, **त्रपीजियम**, आणि **स्केफैद**.

**आसम्याग्नम** मणगटाच्या सर्व अस्थीं पेक्षां मोठें आहे, व ह्यास आंग व डोकें हीं आहेत डोकें एकाबाजूस चापट, परंतु बाकी सर्व ठिकाणीं गोल आहे. आंग विषम चौपैलू, चार बाजू व एक शेवट ह्यांनीं घटित आहे.

**पाठीकडची** बाजू **चौकोण व चापट**, आणि **तळव्याकडची बाजू गोल व** ठळक आहे, बाकीच्या दोहों वर संधिभाग आहे, त्याचे तीन विभाग आहेत.

ह्याचा संधि, डोक्यानें **स्केफैद व सेमिल्यूनर** ह्यांशीं; आंगानें **त्रापिजैद, अन्सिफार्म,** व **दुसरें, तिसरें,** आणि **चवथें मेताकार्पल** अशा सात अस्थींशीं आहे.

**अन्सिफार्म** हें त्रिकोणाकार अस्थि आहे. ह्याच्या तळव्याच्या बाजूस एक अकड्यासारखा वक्र भाग आहे, त्यावरून हें प्रसिद्ध आहे. ह्याला पांच आंगें आहेत. त्यांपैकीं तीन संधियुक्त व दोन मोकळीं. तिहींपैकीं एक एका शिखेनें दुभागलें आहे, दुसरीं दोन एका चपट्या कोणावर जुळतात. मोकळ्यां पैकीं पाठीकडचें खरबरीत व त्रिकोणाकार, व तळव्याकडचें ही त्रिकोणाकार, त्यापासून अन्सिफार्म म्हणजे अकड्यासारखा भाग निघतो.

ह्याचा संधि, **चवथें व पांचवें मेताकार्पल, आसम्याग्रम, क्यूनिऐफार्म** आणि सेमिल्यूनर अशा पांच अस्थीं बरोबर आहे.

## तळवा. करांगुल्याधारास्थि. मेताकार्पस.

हीं नळी, डोकें, आणि बूड ह्यांनीं युक्त अशीं पांच लांब अस्थि आहेत. डोकें शेंड्यास वाटोळें व संधि बंधनें बद्ध होण्यासाठीं बाजूस चापट आहे; नळी कांहींशी त्रिकोणाकार आहे, व तिजवर अस्थीं मधील स्नायु बद्ध होण्याच्या खुणा आहेत. बूड विषम चौपैलू व स्नायु आणि संधिबंधनें बद्ध होण्याकरितां खरबरीत आहे, व त्यावर संधि भाग आहेत.

**अंगुष्ठाचे** मेताकार्पल् अस्थि इतरां पेक्षां रुंद व अखूड आहे. तें पाठीकडे रुंद व चापट, व तळव्याकडे गोलांतर आहे. कार्पसकडच्या शेवटावर **त्रपीजियम**शीं जुळण्याचा एकच संधिभाग आहे. हें दुसऱ्या अस्थीशीं जुळत नाहीं. **दुसरें** अथवा तर्जनीचें मेताकार्पल अस्थि सर्वांत लांब असून, ह्याचें बूड सर्वांत मोठें आहे, व त्यावर **त्रपीजियम,** त्र्यापिजैद, **आसम्याग्रम,** व **तिसरें मेताकार्पल** अस्थि ह्यांशीं जुळण्याचे चार संधिभाग आहेत. **तिसरें** अथवा मध्यमेचें मेताकार्पल अस्थि दुसऱ्यापेक्षां किंचित लहान आहे. ह्याच्या बुडावर शंकाकार उंचवटा आहे. ह्याचा संधि **आसम्याग्रम** व **दुसरें** आणि **चवथें मेताकार्पल** अस्थि ह्यांशीं आहे. **चवथ्या**

मेताकार्पल अस्थीस कांहीं विशेष प्रकार लागू नाहीं, ह्याचा संधि आसम्याग्रम, अन्सिफार्म, आणि तिसरें व पांचवें मेताकार्पल अस्थि ह्यांशीं आहे. पांचवें मेताकार्पल अस्थि तिसऱ्यापेक्षां अखूड व लहान आहे, व ह्याचें बूड लहान व चौकोनाकार आहे, आणि त्यावर अन्सिफार्म व आसम्याग्रम ह्यांशीं जुळण्याचे दोन संधिभाग आहेत.

## करांगुल्यस्थि. फेल्यांजीज.

हीं बोटांच्या पेऱ्यांचीं अस्थि चवदा आहेत. अंगठ्यास दोन व बाकी सर्वांस तीनतीन आहेत. हीं लांब जातीचीं आहेत, म्हणून ह्यांचे नळी व शेवटें असे भाग केले आहेत.

नळी पुढून मागें दबलेली, मागल्या आंगास गोलबाह्य आणि पुढें चापट असून, हिचे कांठ चढलेले आहेत. पहिल्या ओळींत मेताकार्पसाकडचा शेंडा म्हणजे बूड, हा साधा गोलांतर संधिभाग आहे. व बाकीच्या दोन ओळींत तो दुहेरी गोलांतर असून, एका लहानशा शिखेनें दुभागला आहे. पहिल्या व दुसऱ्या ओळींत पेऱ्याकडच्या शेवटावर मध्यें गोलांतर, व बाजूस गोलबाह्य, असा कप्पीसारखा संधिभाग आहे. पेऱ्याच्या शेवटाच्या अस्थीचा नखाकडचा शेंडा रुंद, खरबरीत, व फुलून अर्धचंद्राकार. शिखेप्रमाणें झाला आहे.

ह्याचा संधि. पहिली ओळ, मेताकार्पल अस्थींशीं व दुसऱ्या ओळीशीं; दुसरी ओळ पहिलीशीं व तिसरीशीं; आणि तिसरी दुसरीशीं अशा जुळतात.

---

## खालचेंपोट आणि अधःशाखा ह्यांचीं अस्थि.

**पेल्विस** म्हणजे खालचें पोट ह्याचीं, २ **आसाइनामिनेता**, १ **सेक्रम** आणि १ **काक्सिक्स** अशीं चार अस्थि आहेत. अधःशाखेस **फीमर**, **पतेला**, **तिबिया**, **फिब्युला** व **तार्सस**, **मेतातार्सस**, आणि **फेल्यांजीस** ह्यांच्या अस्थि इतके भाग आहेत.

### अनामकास्थि. आसइनामिनेता.

हें विषम व चापट अस्थि बाल्यावस्थेंत असित्याब्युलम ह्या खांचे जवळ ळणाऱ्या तीन अस्थींनीं युक्त आहे, म्हणून तारुण्यावस्थेंत, **इलियम**, **इस्कियम**, आणि **प्यूबिस** असे त्याचे तीन विभाग केले आहेत. **इलियम** हें वर रुंद व फुललेलें आहे. ह्याच्या योगानें कमरेचा उंचवटा होतो. आणि हें सेक्रम बरोबर जुळतें. **इस्कियम** हें खालचें व बळकट आहे, आणि. बसतांनां शरीर ह्याजवर टेकतें. आसप्यूबिस ह्याच्या योगानें खालच्या पोटाचा पुढला भाग झाला आहे. व त्याच अस्थी पासून प्रजोत्पत्तीच्या इंद्रियास आधार मिळतो.

### नितंबास्थि. इलियम.

**इलियम** ह्याला आंतलें व बाहेरलें आंग, वरचा कांठ किंवा शिखा, पुढला आणि मागला कांठ, असे विभाग आहेत.

आंतल्या आंगास वर शिखा, खालीं **लिनिया इलियो पेक्तिनिया** नामक रेषा, पुढें आणि मागें कांठ, अशा मर्यादा आहेत. पुढील दोन तृतीयांश भाग गुळगुंळीत व गोलांतर आहे, त्यास **इलियाक खळगा** म्हणतात, व त्यांत **इलियाक** स्नायु बसतो. मागला तृतीयांश भाग खरबरीत आहे; आणि त्याचा वरला व खालचा असे दोन भाग झाले आहेत. वरल्यास **सेक्रो इलियाक बंधन** व खालच्यास **सेक्रम** असे जुळतात.

बाहेरचें आंग विषम आहे, म्हणजे कांहीं जागीं गोलबाह्य व कांहीं जागीं गोलांतर आहे; ह्याची वरची मर्यादा शिखा, आहे खालची असित्या-

ब्युलमचा वरचा कांठ आहे, ह्या आंगावर आडव्या येणाऱ्या **वरची, मधली,** व **खालची** अशा तीन **वक्ररेषा** आहेत; वरल्या वक्ररेषेच्या व शिखेच्या मध्यें **ग्लुतियस म्याक्सिमस** वरलीच्या व मधलीच्या मध्यें **ग्लुतियस मीडियस,** मधलीच्या व खालचीच्या मध्यें **ग्लुतियस मीनिमस,** आणि असित्याब्युलम-च्या कांठास **रेक्टसाचें** एक डोकें असे स्नायु बद्ध आहेत. व मागल्या षष्ठांश भागास ग्लुतियस म्याक्सिमस स्नायु बद्ध आहे.

इलियमाचा वरचा कांठ म्हणजे **शिखा** वांकडी, कमानदार, इतालिक एस *f* ह्या वर्णासारखी असून, पुढच्या शेवटास आंत व मागल्या शेवटास बाहेर वळली आहे. ती खरबरीत व रुंद आहे. आणि तिचे कांठ व त्यामधील जागा ह्यांस स्नायुबद्ध आहेत.

पुढच्या कांठावर दोन उंचवटे आहेत. त्यांस पुढचा वरला **कंटक-तुल्यभाग** व पुढचा खालचा **कंटकतुल्यभाग** म्हणतात. व त्या दोहों भागांच्या मध्यें **खांच** आहे, तिजपासून सार्तोरियस स्नायूचा आरंभ होतो. हा कांठ खालच्या आंगास असित्याब्यूलम ह्याच्या कांठांत संपतो. मागल्या कांठावर ही दोन उंचवटे आहेत. त्यास मागला वरचा व मागला खालचा **कंटकतुल्यभाग** असें म्हणतात, आणि त्या दोहोंच्या मध्यें खांच आहे. खाली हा कांठ रुंद आणि कमानदार असून, **मोठ्यासेक्रोइस्कियातिक** खांचेचा भाग होतो.

## आसनास्थि. इस्कियम.

ह्याचा जाड व भरीव भाग म्हणजे **आंग,** आणि पातळ व चढता भाग ज्यास **रेमस** असें नांव आहे तो, असे दोन भाग आहेत. ह्याला आंतलें व बाहेरलें अशीं दोन **आंगें** आणि मागला, वरला, व खालचा असे तीन **कांठ** आहेत. बाहेरलें आंग खरबरीत, उंचनीच, आणि वर रुंद व गुळगुळीत आहे. हा शेवटला भाग असित्याब्युलम **खांच** पूर्ण करितो. त्या खांचेच्या खालच्या कांठाच्या खालीं बाहेरचा आबत्यूरेतर स्नायु राहण्याकरितां एक खांच आहे. आंतलें आंग गुळगुळीत आहे, त्यावर आंतल्या आबत्यूरेतर स्नायूचें आच्छादन आहे. मागल्या कांठाच्या मध्यावर सांगण्याजोगा एक उंचवटा किंवा **कंटकतुल्यभाग** आहे. कंटकतुल्य भागाच्या वर

## उजवें आस इन्नामिनेतम्. बाहेरील अंग.




१ इलियम (पृष्ठ)
२ इस्कियम.
३ प्यूबिस. (अंग.)
४ इलियमची शिरवा.
५ पु. य. कंटक तुल्य भाग.
६ मा. व. कंटक तुल्य भाग.
७ इस्कियमचा कंट. तु. भाग.
८ उंचवटा.
९ रेमस.
१० प्यूबिसचा कंटक.
११ रेमस.
१२ मोठी सा. रवाच.
१३ लहान सा. रवाच.
१४ असिटॅबुलम.
१५ अब्यूरेतर छिद्र.

**मोठी** व खालीं लहान **सेक्रोइस्कियातिकखांच** आहे. पहिली लहान सेक्रो-इस्कियातिक संधिबंधनानें व दुसरी मोठ्या सेक्रोइस्कियातिक संधिबंधनानें छिद्राकार झाली आहे. खालचा कांठ जाड व रुंद त्यास **त्युबरासितो** म्हणजे उंचवटा म्हणतात. त्याच्या आंगावर स्नायु बद्ध होण्याकरितां तीन ठसे आहेत. ह्यांपैकीं पुढल्यास **सेमिमेंब्रिनोसस** बद्ध आहे, व मागले दोन परस्परांपासून एका शिखेनें निराळे झाले आहेत, वरल्यास **सेमितेंदिनोसस** व खालच्यास **बैसेप्स** हे स्नायु बद्ध आहेत.

**इस्कियमाचा** वरचा कांठ पातळ आहे. तो **आबत्युरेतर** छिद्राचा घेर होतो.

इस्कियमाची रेमस प्यूबिसाच्या रेमसेशीं सलग्न आहे. ती वरल्या आणि आंतल्या आंगास झुकली आहे, तिचा आंतल्या बाजूचा कांठ कांहीं-सा बाहेर वळला आहे, आणि बाहेरच्यानें आबत्यूरेतर छिद्राच्या आंतल्या कांठाचा अंश होतो. रेमसला बाहेरचें व आंतलें अशीं दोन आंगें आहेत.

## जघनास्थि. आसप्यूबिस.

ह्या अस्थीचे दोन भाग आहेत. त्यांत एक क्षितिजाशीं समांतर आहे, त्यास **आंग** व दुसरा उतरता भाग आहे, त्यास **रेमस** म्हणतात. ह्या खेरीज आंतलें व बाहेरलें आंग, वरचा व खालचा कांठ, आणि सिंफिसिस म्हणजे दोहों बाजूंच्या अस्थींचें संयोगस्थान असे भाग आहेत.

बाहेरचें आंग स्नायु बद्ध होण्याकरितां खरबरीत आहे, आणि तें बाहेरच्या टोंकाजवळ असित्याब्युलमाचा भाग पूर्ण करितें, तेथें ठळक आहे. आंतलें आंग गुळगुळीत आहे, तें खालच्या पोटाची खांच पूर्ण करितें. वरल्या कांठावर खरबरीत **क्रेस्त** म्हणजे शिखा आहे, तिचा आंतला शेवट तोच कोण, आणि बाहेरला तोच कंटकतुल्य भाग जाणावा. कंटक-तुल्य भागापासून बाहेर जाणारी रेषा **इलियोपेक्तिनियल** होय. ही खालच्या पोटाच्या कांठाची मर्यादा होते. रेषेपुढें मांडीच्या रक्तवाहिन्या जाण्याकरितां खांच आहे. तिच्याबाहेर प्यूबिस आणि इलियम ह्यांच्या संयोगाची खूण **पेक्तिनियल** उंचवटा आहे, व ह्याच्या बाहेरल्या आंगास सोअस व इलायकस स्नायूसाठीं मोठी खांचणी आहे. खालचा कांठ रुंद आहे,

त्यावर आबत्यूरेतर रक्तवाहिन्या व मज्जातंतु जाण्यासाठीं खांचणी आहे; आणि रेमस कडच्या बाजूस आबत्यूरेतर छिद्राची मर्यादा होण्याकरितां तो बारीक झाला आहे. ह्या अस्थीच्या आंगाचा आंतला शेवट तीच **सिंफिसिस** होय, आणि ती समोरच्या अस्थीच्या त्याच भागाशीं जुळते.

प्युबिसाची **रेमस** तिरकस खालीं उतरते, आणि इस्कियमाच्या रेमसेशीं सलग्न होते. रेमसेचा आंतला कांठ समोरच्या अस्थीच्या योगानें प्यूबिसाची कमान पूर्ण करतो.

**असित्याब्युलम** ही खोल प्याल्यासारखी खळगी, इलियम, इस्कियम, आणि प्यूबिस ह्यांच्या संयोगानें झाली आहे. वर खोल कांठ आहे; खालीं खोल खांच आहे, तिजवर ताज्या स्थितींत एक संधिबंधन कमानी प्रमाणें लागलें असतें. प्याल्यासारख्या खळगीच्या बुडाजवळ खांचेच्या संबंधानें असणारा खोल खळगा आहे, त्यांत संधिबंधन गुंतलें असतें.

आबत्यूरेतर ज्यास थैरैदछिद्र असेंही म्हणतात तें, इस्कियम व प्यूबिस ह्यांच्या मधील मोठी अंडाकार रिकामी जागा होय, आणि तिज सभोंवतीं खरबरीत कांठाची मर्यादा असून, ह्या कांठास संधिबंधनाची त्वचा लागली आहे. प्यूबिसाच्या खालच्या आंगास खांचणी असल्यामुळें, छिद्राच्या वरच्या बाजूस जास्ती खोली आली आहे.

ह्याचा संयोग **सेक्रम**, समोरचें **आसइन्नामिनेतम** व **फीमर** ह्यांशीं होतो.

## खालचेंपोट. पेलूविस.

खालच्या पोटाच्या अस्थींचा विचार केला असतां, खोटी **पेल्विस** व खरी **पेलूविस** असे दोन विभाग होतात. प्रत्येक बाजूस आसइलियै ह्यांनीं मर्यादिलेला पसरलेला भाग, खऱ्या पेल्विसापासून **इलियोपेक्तिनियल** रेषेनें निराळा झाला आहे, तीच खोटी **पेल्विस**; आणि त्याच रेषेच्या खालचा जेवढा भाग तेवढा सर्व खऱ्या पेल्विसाचा भाग जाणावा. रेषा खऱ्या पेल्विसाच्या कांठाची मर्यादा होय, आणि तिच्या आंतली गर्भी **इन्लेत** म्हणजे आंतील द्वार जाणावें. आंतील द्वाराचा आकार हृत्कमलासारखा आहे, व तें सिंफिसिसाकडे पुढें बोथलेलें आहे, व तें बाजूवर पसरले-

लें असून, त्याच्यामागून सेक्रमाचा उंचवटा पुढें वाढून आला आहे. खऱ्या पेल्विसाच्या शेवटास, औतलेत म्हणजे बाहेरचें द्वार म्हणतात. इस्कियम व प्यूबिस ह्यांच्या रेमै जुळून पेल्विसाची पुढील मर्यादा होते, व तीस प्यूबिसची कमान म्हणतात. इस्कियमाचा उंचवटा, व मोठ्या व लहान सेक्रो-इस्कियातिक खांचांनीं झालेल्या दोन विषम चिरा ही बाजूची मर्यादा, आणि सेक्रम व काक्सिक्स ही मागली मर्यादा होय.

पेल्विस धडाला तिरकस लागली आहे. आसप्यूबिसचें आंतलें आंग वर झुकलें आहे, तें पोटांतील अवयवांस आश्रय देतें. सेक्रमाचें बूड सिंफिसिसावर चार इंच आहे. आंतील द्वाराच्या आंसांतून मध्यरेषा काढली तर, तिचीं दोन टोंकें नाभि व काक्सिक्साचा मध्य, ह्या दोन भागांवर पडतील; व रेषा मागें व खालीं झुकेल. बाहेरील द्वाराचा आंस सेक्रमाच्या वरल्या भागापासून, त्या द्वाराच्या मध्य बिंदूतून पुढें व खालीं झुकतो. पेल्विसाच्या खांचेचा आंस बांकाचा आहे, व त्याचीं टोंकें आंतील व बाहेरील द्वारांच्या मध्य बिंदूवर पडतात. ह्या आंसांची माहिती शस्त्रविद्येंत, व सुप्रसवकारिविद्येंत महत्वाची आहे.

स्त्री व पुरुष ह्यांच्या पेल्विसांमध्यें भेदः—

पुरुषांमध्यें अस्थि अधिकजाड, बळकट, व घट्ट आणि खांच अधिक खोल आणि अरुंद असते. स्त्रियांमध्यें अस्थि अधिक हलकीं व नाजूक असतात. इलियकखांचा मोठ्या व तीं अस्थि पसरलेलीं असतात; आंतीलद्वार, बाहेरीलद्वार, आणि खांच हे भाग मोठे व उथळ असतात; असित्याब्युला व इस्कियमाचे उंचवटे एकमेकांपासून फार अंतरावर असतात; अबूत्यूरेतर छिद्रें लहान व त्रिकोणाकार असून, प्यूबिसाच्या कमानीची गर्भी अधिक मोठी, व तिचे कांठ बाहेर वळलेले असतात; आणि सेक्रम अधिक रुंद असून त्याचा बांक कमी असतो.

## ऊर्वस्थि. फीमर.

हें अस्थि पंजराच्या सर्व अस्थींपेक्षां लांब, अधःशाखेच्या वरच्या भागांत मांडीच्या ठिकाणीं आहे. ह्याचा झोंक तिर्कस आहे, डोकें गोल आहे, तें असित्याब्यूलम खांचेंत बसतें, आणि हें खालच्या आंगास आंत समोरच्या

अस्थीकडे झुकत जाऊन, गुडघ्या जवळ केवळ मिळावयास आलें आहे. स्त्रियांमध्यें पेल्विसाची रुंदी अधिक असल्यामुळें ह्या अस्थीचा तिर्कसपणा ही अधिक आहे. ह्याचे नळी व दोन शेवट असे विभाग केले आहेत.

**वरच्याशेंड्यास** गोल **डोकें** आहे, तें वर व आंत झुकलें आहे. त्यावर तिरीस नामक संधिबंधनाकरितां, अंडाकार दबलेला भाग आहे. डोक्यास **मानेचा** आधार आहे. तिचा तिर्कसपणा व लांबी ही वय व व्यक्ति ह्यांच्या भेदेंकरून भिन्न असतात. तरूण पुरुषांत ती लांब व तिर्कस असते, आणि स्त्रियांच्या व वृद्धांच्या शरीरांत ती अखूड व क्षितिजाशीं समांतर अशी असते. मानेच्या बाहेरल्या आंगास **थोरलात्रोक्यांतर** म्हणून मोठा भाग आहे, त्याच्या पुढल्या आंगावर ग्लूतियस मिनिमस ह्या स्नायूच्या तेंदनाकरितां एक अंडाकार गुळगुळीत ठसा आहे; व वरतीं ग्लूतियस मीदियस स्नायूकरितां एक द्वित्त ठसा आहे. मागल्या आंगावर क्वाद्रेतस स्नायूसाठीं उभी शिखा आहे. तिला **लिनियाक्वाद्रेते** म्हणतात. आंतल्याबाजूस **त्रोक्यांतेरिक** खांच आहे, तींत स्नायूंचीं कित्येक तेंदनें बद्ध होतात. थोरल्या-त्रोक्यांतरापासून खालीं जाणारी एक तिरपी शिखा आहे, ती पुढल्या आंगास असल्यामुळें तिला त्रोक्यांतर मधली पुढची रेषा म्हटलें आहे. अस्थीच्या मागल्या आंगास दुसरी रेषा आहे, तिला मागली त्रोक्यांतेरिक रेषा म्हटलें आहे. ती एका ठळक ग्रंथीजवळ संपते. ती ग्रंथि **धाकटात्रोक्यांतर** होय. तो आंतल्या आंगास आहे, व त्यास सोअस व इलायकस हे दोन स्नायु लागले आहेत.

**नळी** पुढें गोलबाह्य व गोल, मागें कांहींशी गोलांतर आहे. तिजवर **लिनियाआस्परा** ह्या नांवाची ठळक **शिखा** आहे. तिच्या वरच्या भागापासून तीन शाखा जातात, त्या,— आंतली धाकट्या त्रोक्यांतराच्या पुढच्या आंगानें चढते, व त्रोक्यांतरा मधल्या पुढल्या रेषेशीं जुळून जाते. बाहेरली रुंद व बळकट आहे, ती थोरल्या त्रोक्यांतरच्या बुडापर्यंत, आणि मधली लहान त्रोक्यांतरपर्यंत अशा चढतात. अस्थीच्या खालच्या शेवटाकडे लिनिया आस्पराच्या दोनशिखा होऊन, दोहों बाजूंच्या दोन उंचवट्यांस जातात, त्यांच्यामध्यें **पाप्लितियल** हा त्रिकोणाकार

## उजवें ऊर्वस्थि. पुढचें अंग




१ डोकें.

२ मान.

३ मोठा त्रोक्यांतर.

४ लहान त्रोक्यांतर.

## उजवें पतेला.



५ त्रोक्यांतर मधली पुढची रेषा.

६ नळी.

७ आंतील कांदैल.

८ बाहेरील कांदैल.

देश होतो त्यांत पाप्लितियल धमनी बसते. आंतली उंचवट्याची शिखा बाहेरलीपेक्षां कमी ठळक आहे. तिजवर फेमरल धमनी करितां रुंद व उथळ खांचणी आहे. व शेवटाच्या जाग्यावर ग्रंथि आहे.

फीमरचें खालचेंशेवट रुंद व पसरलेलें असून पुढें एका गुळगुळीत खांचेनें दुभागलें आहे, व मागें एका मोठ्या खळग्याच्या योगानें विभागून, त्याचे दोन उंचवटे झाले आहेत. बाहेरचा उंचवटा अधिक रुंद व ठळक, आणि आंतला अधिक अरुंद व लांब आहे. त्यांच्या लांबीमधील फेर, फिमराच्या तिर्कसपणामुळें झाला आहे. बाहेरच्या उंचवट्याच्या बाहेरील बाजूवर ठळक टेंगूळ आहे, व त्याच्या खालीं खळगा आहे, त्यांत पाप्लितियस स्नायूचें तेंदन राहतें. ह्या खळग्याच्या वरल्या शिखेस ग्यास्त्रोक्नीमियसाचें बाहेरलें डोकें बद्ध आहे.

आंतला उंचबटा आंतल्या बाजूस चढून येऊन, त्याचेंएक टेंगूळ झालें आहे, त्यास आंतल्या बाजूचें संधिबंधन बद्ध आहे. ह्या टेंगळाच्या वरतीं व आंतल्या उंचवट्याच्या शिखेच्या शेवटावर आदक्तर म्याग्नसाच्या तेंदना करितां एक ग्रंथि आहे, आणि तिच्या खालीं ग्यास्त्रोक्नीमियसच्या आंतल्या डोक्यासाठीं खांच आहे. मागलें क्रूशियल संधिबंधन लागण्या साठीं आंतल्या उंचवट्याची बाहेरली बाजू खरबरीत व गोलांतर आहे.

ह्याचासंधि आसइन्नामिनेतम्, पतेला आणि तिबिया ह्या तीन अस्थींशीं आहे.

## वाटी. पतेला.

हें सेसमैद अस्थि क्वाद्रैसेप्सएक्सतेन्सर ह्या स्नायूच्या तेंदनांत उत्पन्न होऊन, पूर्ण दशेस येतें; ह्याचा आकार ह्त्कमला सारखा आहे. ह्याचें रुंद शेवट वर व अरुंद शेवट खालीं झुकलें आहे. बाहेरील आंग गोलबाह्य; आंतल्याचे फीमरच्या दोन संधिभागांशीं जुळण्याकरितां, एकाशिखेनें दोन गुळगुळीत भाग झाले आहेत, त्यांत बाहेरचा मोठा आहे.

ह्याचा सांधि, फीमरच्या दोन उंचवट्यां बरोबर आहे.

# अंतर्जंघास्थि. तिबिया.

हें अस्थि पायाच्या दोहों पैकीं आंतलें व मोठें आहे. हें त्रिकोणाकार असून, ह्याचे, **नळी**, वरचा आणि खालचा **शेवट** असे विभाग केले आहेत.

नळीस तीन **आंगें** आहेत; **आंतलें** त्वचेवरून सहज स्पर्शास येण्या जोगें व उथळ आहे; **बाहेरलें** गोलांतर त्यावर अस्थींच्या मधील त्वचा बद्ध होण्यासाठीं एक बारीक शिखा आहे; आणि **मागलें**, स्नायु बद्ध होण्यासाठीं खोलगट झालें आहे. ह्या आंगाच्या वरल्या शेवटा जवळ पाप्लितियस स्नायूचा फाशिया लागण्या साठीं तिर्पी शिखा आहे, आणि तिच्या खालीं लगत पुष्टीच्या धमनीचें छिद्र आहे. नळीचे **कांठ** तीन आहेत. **पुढचा** कांठ बारीक, बहुत करून सर्व ठिकाणीं त्वचे वरून सहज स्पर्शास येण्याजोगा, ठळक, नागमोड, आणि कधीकधीं वांकडा असतो. ह्यास शिखा अथवा कंटकतुल्य भाग म्हणतात. **आंतला** कांठ गोल व जाड आहे. **बाहेरचा** बारीक, त्याच्या खालीं विभागून दोन रेषा होतात, त्या फिब्यूलाशीं जुळणाऱ्या संधिभागाकडे जातांनां एकमेकांपासून उत्तरोत्तर दूर होत जातात.

**वरचाशेंडा** म्हणजे डोकें मोठें आहे, व तें फार पसरल्यामुळें त्याचे प्रत्येक बाजूस एक एक टेंगूळ झालें आहे. फीमराच्या उंचवट्याशीं जुळण्यासाठीं टेंगळें वरल्या आंगास गुळगुळीत आहेत, त्यांवरचा आंतला संधिभाग, फीमरच्या आंतल्या उंचवट्याशीं जुळण्याकारितां अंडाकार व लांबोळा आहे; बाहेरचा रुंद व बहुतकरून वर्तुळाकार आहे. दोहों संधिभागांच्यामध्यें **कंटकतुल्य भाग** आहे. कंटकतुल्य भागाच्या मागें व पुढें क्रूशियल संधिबंधनां करितां **खांचा** आहेत. अस्थीच्या पुढल्या आंगास दोहों टेंगळांच्या मध्यभागीं पतेला संधिबंधनाकारितां एक उंच व ठळक ग्रंथि आहे, तिच्या लगत वर बरसा बसण्याकारितां एक गुळगुळीत संधिभाग आहे. बाहेरच्या टेंगळाच्या बाहेरील आंगावर फिब्युलाच्या डोक्यांशीं जुळण्याचा संधिभाग आहे.

**खालचेंशेवट** कांहींसें चौपेलू आहे तें आंतल्या बाजूसलांबून त्याचामोठा भागझाला आहे, त्यांस आंतला ( घोटा ) **म्यालियोलस** म्हणतात. ह्या भा

## जंघेचीं अस्थि. पुढचें अंग.



गाच्यामागें रुंद व उथळ खांचणी आहे, तींत तिबियेलिस पोस्तैकस व फ्लेक्सर लांगस दिजितोरम ह्या स्नायूंचीं तेंदनें बसतात. आणि हिच्या बाहेरल्या आंगास फ्लेक्सर लांगसपालिसिसच्या तेंदनाकरितां दुसरी उथळ खांचणी आहे. बाहेरच्या बाजूस आंग गोलांतर व त्रिकोणाकार आहे; हें वर अस्थींमधील संधिबंधनाकरितां खरबरीत झालेलें, आणि खालीं फिब्युलाशीं जुळण्याकरितां गुळगुळीत झालेलें आहे. शेवठावर अस्त्रागलस अस्थींशीं जुळण्याचा त्रिकोणाकार गुळगुळीत संधिभाग आहे.

ह्याचा संधि **फीमर, फिब्युला** आणि **अस्त्रागलस** ह्यांशीं आहे.

## बहिर्जंघास्थि. फिब्युला.

हें पायाच्या दोहों अस्थीं पैकीं बाहेरचें असून लांब, लहान, व त्रिकोणाकार आहे. आणि इतर लांब जातीच्या अस्थी प्रमाणें **नळी** व **शेंवटें** ह्यांनींयुक्त आहे.

फिब्युलाची **नळी** त्रिकोणाकार आहे, व तिला बाहेरलें, आंतलें, आणि मागलें अशीं तीन आंगें आणि तीन कांठ आहेत. **बाहेरलें आंग** सर्वांत रुंद अस्थीच्या पुढल्या बाजूस वर सुरू होऊन तिजभोंवतीं गुंडाळून, मागल्याबाजूस जाऊन खालीं संपतें. **आंतलेंआंग** वरच्या संधिभागाच्या बाजूवर सुरू होतें, आणि खालीं अरुंद व शिखायुक्त होऊन, म्यालियोलसच्या पुढच्या कांठाशीं मिळतें. त्याच्या मध्यावर अस्थींमधील त्वचेसाठीं शिखा आहे. **मागलें आंग** बाहेरच्या प्रमाणें गुंडाळलेलें आहे. तें अस्थीच्या मागल्या आंगास वर सुरू होऊन, खालीं आंतल्या बाजूस संपतें. ह्या आंगाच्या मध्यावर पुष्टीच्या धमनीसाठीं छिद्र आहे.

**आंतला कांठ** वर अस्थींच्या मधील त्वचेसाठीं जी शिखा आहे, तिजबरोबर सुरू होतो; मग दुभागून खालीं त्याच्या दोन रेषा होतात, त्या बाहेरल्या म्यालियोलस वरच्या त्वचे वरून सहज स्पर्शास येणाऱ्या त्रिकोणाकार भागाच्या मर्यादा होतात. **बाहेरला कांठ** डोक्याच्या स्तैलैद भागाच्या बुडाजवळ सुरू होऊन, अस्थी भोंवती गुंडाळून बाहेरल्या आंगाचा मार्ग धरतो,

**मागलाकांठ** बारीक व ठळक आहे, व तो अस्थींच्या मधील त्वचेस आश्रय देणाऱ्या शिखेशीं खालीं सलग्न होतो.

**वरचाशेंडा** अथवा **डोकें** जाड व मोठें आहे. त्यावर गोलांतर दबलेला भाग आहे, त्याच्या योगानें हें अस्थि तिबियाच्या बाहेरल्या टेंगळाशीं जुळतें. ह्या भागाबाहेर गुडघ्याच्या बाहेरील संधिबंधनासाठीं एक खरबरीत जाड उंचवटा आहे, त्याचा, बैसेप्सचें तंदन बद्ध होण्यासाठीं मागल्या आंगास स्तैलेदभाग होतो.

**खालचें शेपट** बाहेरून आंत चापट होऊन, खालीं तिबियाच्या संधिभागापेक्षां लांबलें आहे. त्यालाच बाहेरचें म्यालियोलस म्हटलें आहे. बाहेरच्या बाजूस खरबरीत त्रिकोणाकार व त्वचेवरून सहज स्पर्शास येणारा भाग आहे. आंतल्या आंगावर अस्त्रागलस ह्याशीं जुळण्याकारितां एक गुळगुळीत, त्रिकोणाकार संधिभाग आहे, व अस्थींच्या मधील संधिबंधनाकारितां खरबरीत खोलगा आहे. **पुढचाकांठ** पातळ व बारीक आहे, **मागला** रुंद, **पेरोनीये** स्नायूंच्या तंदनाकारितां खांचण्यांनीं युक्त आहे.

ह्याचा संधि **तिबिया** व **अस्त्रागलस** ह्यांशीं होतो.

# पायाचींअस्थि. तार्सस.

हीं अस्थि ७ आहेत, व हीं दोन लांब लांब ओळींत बसविलीं आहेत. पहिल्या ओळींत **आस्त्रागलस**, **स्केफैद**, व तीन **क्युनिऐ फार्म** आणि दुसरींत **आसक्यालसिस** व **क्युबैद** हीं आहेत.

## जंघाधेघास्थि. अस्त्रागलस.

हें गोल डोकें, वरच्या अथवा गोलबाह्य आंगावरचा रुंद संधिभाग, व खालच्या अथवा गोलांतर आंगावरच्या एका खोल खांचणीनें विभागलेले दोन संधिभाग, ह्यांच्या योगानें ओळखलें जातें. ह्याला वरचें, खालचें, बाहेरचें, व आंतलें अशीं आंगें, आणि मागचें व पुढचें अशीं ठोकें आहेत.

**वरच्या आंगावर** तिबियाशीं जुळणारा मोठा गोलबाह्य चौपैलू गुळगुळीत संधिभाग आहे. **खालच्याआंगास** पुढें गोलबाह्य व मागें रुंद व गोलांतर असे आसक्यालसिस ह्याशीं जुळणारे, दोन संधिभाग व अस्थींमधील

त्वचा राहाण्यासाठीं, एक खोल खांचणी हे भाग आहेत. **आंतलें आंग चापट** व उंचनीच आहे, त्यावर आंतल्या म्यालियोलसचा गायदूम संधिभाग आहे. **बाहेरच्यावर** बाहेरल्या म्यालियोलसचा मोठा त्रिकोणाकार संधिभाग आहे. **पुढच्या शेवटावर** गोल डोकें आहे, तें **स्केफैद** ह्याशीं जुळतें. त्यामागें, सभोंवतीं आकुंचन झालेला मानेसारखा भाग आहे. व **मागलें शेवट अरुंद** आहे, त्यावर फ्लेक्सरलांगसपालिसिसच्या तेंदना साठीं खोल खांचणी आहे.

ह्याचा **संधि** तिबिया, फिब्युला, आसक्यालसिस, व **स्केफैद** अशा चार अस्थींशीं आहे.

## स्केफैद.

हें अस्थि त्याच्या नौकेसारख्या आकारावरून ओळखलें जातें. मागल्या बाजूस गोलांतर असून, अस्त्रागलस ह्याशीं जुळतें. पुढच्या बाजूस तीन संधिभागांनीं युक्त आहे, व क्यूनिऐफार्म अस्थींशीं जुळतें. ह्याचा कांठ पायाच्या तळव्याकडे झुकून ग्रंथि झाली आहे, तिला तिबियेलिसपोस्तैकस ह्याचें तेंदन बद्ध होतें, व बाहेरच्या आंगावर क्यूबैद ह्याशीं जुळण्याचा संधिभाग कधींकधीं असतो.

ह्याचा **संधि** तीन **क्यूनिऐफार्म, अस्त्रागलस,** व कधीं कधीं **क्युबैद,** ह्यांशीं असतो.

## अन्यत्रिग्रंथितुल्यास्थि. तीनक्यूनिऐफार्म अस्थि.

ह्या अस्थींनीं तार्सस ह्याचा पुढचा व आंतला भाग होतो. ह्यांच्या नांवावरून ह्यांचा आकार पांचरे सारखा आहे असें स्पष्ट होतें. हीं तीन आहेत, व हीं मोजतांना आंतून बाहेर मोजलीं आहेत.

**पहिलें** अथवा आंतलें सर्वांत मोठें आहे, व ह्याचें बूड खालीं तळव्याकडे झुकलें आहे. **दुसरें** अथवा मधलें सर्वांत लहान आहे, **तिसरें** अथवा बाहेरचें मध्यम आहे, व हें आणि दुसरें ह्यांचीं बुडें वर पाठीकडे झुकलीं आहेत, हीं तीन अस्थि मागें **स्केफैद** ह्याशीं व पुढें **पहिल्या, दुसऱ्या,** व **तिसऱ्या मेतातार्सल** अस्थींशीं जुळतात. आणि खेरीज **पहिलें** व **तिसरें** हीं **दुसरें मेतातार्सल** ह्याशीं जुळतात. पहिल्याचें आंतील आंग त्वचे वर-

न सहज स्पर्शास येतें, व तिसऱ्याचें बाहेरलें आंग गुळगुळीत व चापट आहे, तें संधिभागानें क्यूबैद ह्याशीं जुळतें.

ह्यांचासंधि— आंतलें क्युनिऐफार्म हें स्केफैद, मधलें क्यूनिऐफार्म, व पहिलें व दुसरें मेतातार्सल, ह्या चार अस्थींशीं; मधलें हें स्केफैद, आंतलें क्युनिऐफार्म, बाहेरलें क्युनिऐफार्म, व स्केफैद, ह्या चहूंशीं; आणि बाहेरचें क्युनिऐफार्म हें स्केफैद, मधलेंक्यूनिऐफार्म, क्यूबैद, आणि दुसरें, तिसरें, व चवथें मेतातार्सल ह्या सहा अस्थींशीं; अशीं जुळतात.

तार्सस ह्याची दुसरी ओळ आसक्याल्सिस व क्यूबैद ह्यांनीं घटित आहे.

## पार्ष्ण्यस्थि — आसक्यालसिस.

हें अस्थि तार्सस ह्याच्या खालच्या व मागल्या भागांत असून, सर्वांहून मोठें आहे.

**वरच्या आंगावर** अस्त्रागलस ह्याशीं जुळण्याचे दोन संधिभाग आहेत. ते अस्थींमधील संधिबंधनासाठीं जी खांच आहे, तिणें निराळे झाले आहेत. ह्याच्या मागें टांच घटित करणारा जो ह्या अस्थीचा भाग त्याचें वरचें आंग आहे. **खालच्या आंगावर** दोन ग्रंथि आहेत, त्या एका खळग्यानें निराळ्या झाल्या आहेत,व ह्याच्या पुढें क्यालकेनियोस्केफैद ह्या संधिबंधनाकरितां एक उंचवटा आहे. **पुढचें आंग** कांहींसें गोलांतर आहे, तें क्यूबैद ह्याशीं जुळतें. **मागलें आंग** गोलबाह्य आहे, तें खालीं तेंदोआक्लिस ह्यासाठीं खरबरीत व उंच झालें आहे. ह्या आंगाचा वरचा भाग इतका उंच नाहीं, व गुळगुळीत आहे, तो तेंदोआक्लिस ह्यापासून एका सिनोविचल बर्सानें सोडविला आहे. **बाहेरलें आंग** बहुतकरून चापट व पुढल्यापेक्षां मागें रूंद आहे, ह्यावर पुढल्या बाजूस उथळ खांचण्या आहेत, त्यांतून पेरोनिऐस्नायूंचीं तेंदनें जातात. बाकीच्या ठिकाणीं हें आंग त्वचेवरून सहज स्पर्शास येण्याजोगें आहे. **आंतलें आंग** खोल, गोलांतर आहे, त्यावरून तळव्याच्या रक्तवाहिन्या, मज्जातंतु, व फ्लेक्सर म्हणजे अखडणाऱ्या स्नायूंचीं तेंदनें जातात. ह्या आंगाच्या वरल्या पुढल्या भागावर एक ठळक उंचवटा आहे, त्याच्या खालीं फ्लेक्सरलांगसपालिसिस ह्याच्या तेंदना करितां खांचणी आहे, ह्या उंचवट्याच्या योगानें आंगाची गोलांतरता वाढून

एयोर्ताच्या कमानीच्या उतरत्या भागाच्या संबंधाचें कोष्टक.

पुढें

फ्लूरा.

डाव्या फफ्फुसाची मुळी.

| उजवीडके. | एयोर्ताची कमान उतरता भाग. | डावीकडे. |
|---|---|---|
| इसाफगस. | | फ्लूरा. |
| थोऱ्यासिकदक्त. | | |

मागें

पाठीच्या तिसऱ्या मणक्याच्या आंगांची डावीबाजू.

**शाखा.** एयोर्ताच्या शाखांपैकीं, दोन कारोनरी धमन्या कमानीच्या पहिल्या भागाच्या आरंभा पासून निघतात, त्यांस उजवी व डावी असें म्हणतात. इन्नामिनेत, डावी कमान करातिद, व डावी सबक्लेवियन, ह्या दुसऱ्या भागापासून निघतात.

**उजवी कारोनरी** धमनी पुढें जाऊन उजवें आरिकल, व वेंत्रिकल, ह्यांच्या मधील खांचणीच्या आंगानें वेढा घालून, मागल्या उभ्या खांचणींत जाते; मग हृदाच्या शेंड्या पर्यंत उतरून डाव्या करोनरीशीं अग्रसंयोग पावते. उजवें आरिकल, व वेंत्रिकल, आणि दोन्ही वेंत्रिकलांचीं मागलीं आंगें, ह्या भागांस ती वांटली जाऊन, शेंड्यापाशीं एक मोठी शाखा निघते. डावी कारोनरी दोहों वेंत्रिकलांच्या पुढच्या खांचणींतून पुढें जाते, व तिच्या दोन शाखा होतात. एक मागली, डावें आरिकल, व वेंत्रिकल, ह्यांच्या मधील खांचणीमधून जाऊन, डाव्या वेंत्रिकलाच्या बुडास वेढा घालते, व उजव्या कारोनरीशीं अग्र संयोग पावते. दुसरी पुढची, पुढल्या आंगानें वेंत्रिकलांच्या मधल्या खांचणीमधून शेंड्यापर्यंत जाऊन, उजव्या कारोनरीशीं जुळते.

**आर्तीरिया इन्नामिनेता.**

ही एयोर्ताच्या कमानीची पहिली व सर्वांत मोठी शाखा सुमारे दीड इंच लांब आहे. ही कमानीच्या आरंभापासून स्तर्नम, व क्लयाविकल, ह्यांच्या ज-

ज्या संधी पर्यंत तिरपी चढून आल्यावर, उजवी कामन करातिद, व उजवी सब्क्लेवियन, हे हिचे विभाग होतात.

**संबंध.** पुढें डावी इन्नामिनेत शीर, स्तर्नम, थैमस ग्ल्यांदचा उरलेला भाग, आणि स्तर्नो हैयैद् व स्तर्नो थैरैद ह्या स्नायूंचा आरंभ; मागें त्रकीया; उजवीकडे उजवी इन्नामिनेत शीर, उजवा न्यूमोग्याख्रिक मज्जातंतु व प्लूरा; डावीकडे, डावी कामन करातिद धमनी, आणि थैमस ग्ल्यांद ह्याचा बाकी राहिलेला भाग; असे आहेत.

इन्नामिनेत धमनीपासून कधींकधीं एक लहान शाखा निघते, ती त्रकीया वरून थैरैद ग्ल्यांद ह्याला जाते.

इन्नामिनेत धमनीच्या संबंधाचें कोष्टक.

**पुढें.**

स्तर्नम.

स्तर्नोहैयैद व स्तर्नोथैरैद स्नायु.

थैमस ग्लांदचा बाकी भाग.

डावी इन्नामिनेत शीर.

| **उजवीकडे.** | | **डावीकडे.** |
|---|---|---|
| उजवी इन्नामिनेत शीर. | इन्नामिनेत धमनी | थैमुस ग्लांदचा बाकी भाग. |
| उजवा न्यूमोग्याख्रिक्-मज्जातंतु. | | डावी करातिद धमनी. |
| प्लूरा. | | |

**मागें.**

त्रकीया.

**कामन करातिद धमन्या.**

ह्यांपैकीं उजवी उजव्या स्तर्नोक्लयाविक्युलर संधीजवळ इन्नामिनेतच्या दुभागापासून, व डावी एयोर्ताच्या कमानीपासून निघते, म्हणूनच ही उजवी पेक्षां लांब व खोल आहे.

**डावी कामन करातिद** एयोर्ताच्या कमानीपासून कांहींशी तिरपी, वर व बाहेर, डाव्या स्तर्नोक्लयाविक्युलर संधी पर्यंत जाते.

**संबंध.** पुढें स्तर्नम, स्तर्नोहैयैद व स्तर्नोथैरैद स्नायु, थैमस ग्लांद-

चा राहिलेला भाग, व डावी इन्नामिनेत शीर, ह्यांच्या योगानें स्तर्नम पासून निराळी झाली आहे; मागें ही त्रकीया, इसाफगस, व थोऱ्यासिक्‌दक्त, ह्यांवर बसते; आंतल्या आंगास इन्नामिनेत धमनी; आणि बाहेरल्या आंगास डावा न्युमोग्यास्त्रिक्‌ मज्जातंतु, डावी सब्‌क्लेवियन धमनी, व कार्दियाक मज्जातंतु, ह्या भागांचा संबंध आहे.

डाव्या कामन करातिद धमनीच्या पिंजरांतल्या भागाच्या संबंधाचें कोष्टक.

पुढें

स्तर्नम.

स्तर्नोहियैद व स्तर्नोथैरैद स्नायु.

डावी इन्नामिनेतशीर.

थैमस ग्लांदचा बाकी भाग.

| आंत | | बाहेर. |
|---|---|---|
| इन्नामिनेतशीर. | डावी कामन करातिद पिंजरांतला भाग. | डावान्यूमोग्यास्त्रिक मज्जातंतु.<br>कार्दियाक मज्जातंतु.<br>डावी सब्‌क्लेवियन धमनी. |

मागें.

त्रकीया.

इसाफगस.

थोऱ्यासिक्‌दक्त.

मानेंत दोन्ही वाहिन्यांचा संबंध सारखा असल्यामुळें एकच वर्णन दोघींस लागू पडतें. ह्या स्तर्नोक्लयाविक्युलर संधीच्या मागल्या आंगापासून, थैरैद कूर्चेच्या वरल्या कांठाच्या सपाटीपर्यंत तिरप्या वर जातात; आणि बाहेरील, व आंतील करातिद धमनी, असे त्यांचे विभाग होतात. त्यांत पहिला डोक्याच्या व मुखाच्या बाहेरल्या भागांस, आणि दुसरा मस्तकाच्या आंतल्या भागांस वांटला जातो. मानेच्या मुळा जवळ, ह्या धमन्यांच्या मधील अंतर थोडें आहे, परंतु वर चढतांनां त्या एकमेकींपासून दूर होत

जातात. कामन करातिद धमनी ही, आंतली जुग्युलर शीर, व न्यूमोग्यास्त्रिक मज्जातंतु, ह्यां सहवर्तमान मानेच्या खोल फाशियाच्या वेष्टनांत आच्छादिली आहे; शीर धमनीच्या बाहेरल्या बाजूस, आणि मज्जातंतु दोघींच्या मध्यें आणि मागें आहे. ह्या धमनीचा खालचा भाग खोल आहे, वरचा उथळ असून एका त्रिकोणाकार स्थानांत असतो. ह्या स्थानाची मागची मर्यादा स्तर्नोम्यास्तैद स्नायु, वरची मर्यादा दैग्यास्त्रिक् स्नायूचा मागचा फुगारा, आणि खालची मर्यादा ओमो-हैयैद स्नायूचा पुढचा फुगारा होय.

**संबंध**. मानेच्या खालच्या भागांत ह्या धमनीचें स्थान फार खोल आहे. एथें ती कातडें, मानेचा फाशिया, प्लातिज्मा, स्तर्नोम्यास्तैद, स्तर्नोहैयैद, स्तर्नो थैरैद स्नायु, आणि क्रैकैद कूर्चे जवळ ओमोहैयैद स्नायु, ह्या भागांनीं आच्छादिली आहे. ह्या स्थानापलीकडे ती उथळ आहे; व प्लातिज्मा, मानेचा फाशिया, व स्तर्नो म्यास्तैद ह्याचा आंतला कांठ, ह्या भागांनीं आच्छादिली आहे. दिसंदेन्सनोनै मज्जातंतु वेष्टनाच्या पुढल्या अंगावर उतरतो. मागें ही धमनीकण्याच्या मानेंतील भागावर टेंकते व त्यापासून लांगसकोलै स्नायूनें निराळी केली आहे. वर रेक्तस क्यापितिस अंतेकस मेजर आहे. रिकरंत व सिंपथेतिक मज्जातंतु खालच्या भागाच्या मागून जातात. आंतल्या आंगास त्रकीया, थैरैद ग्ल्यांद, व खालची थैरैद धमनी, ह्या भागांचा संबंध आहे; व त्यांपासून रिकरंतल्यारिंजियल मज्जातंतूनें निराळी झाली आहे. ह्याच्या वर, लेरिंक्स व फेरिंक्स ह्यांचा संबंध आहे. बाहेरल्या बाजूस आंतली ज्युग्युलर शीर, व न्युमोग्यास्त्रिक मज्जातंतु, हे आहेत.

ह्या धमनीस तिच्या उथळ भागांत बंधन बांधतात.

कामन करातिदधमनीच्या संबंधाचें कोष्टक.

पुढें

कातडें व फाशिया. स्तर्नो-थैरैद.
प्लातिज्मा. ओमोहैयैद.
स्तर्नोम्यास्तैद. दिसेंदेन्सनोनै मज्जातंतु.
स्तर्नो-हैयैद.

बाहेर

आर्तंलीजुग्युलर शीर.
न्यूमोग्यास्त्रिक मज्जातंतु.

कामनकरातिद धमनी

आंत

त्रकीया.
थैरैदग्ल्यांद.
रिकरंतल्यारिंजियल मज्जातंतु.
खालचीथैरैदधमनी.
लेरिंक्स.

मागें

लांगसकोलै स्नायु.
रेक्तसअंतैकसमेजर स्नायु.
सिंपथेतिक मज्जातंतु.
रिकरंतल्यारिंजियल मज्जातंतु.
खालची थैरैद धमनी.

**एक्स्तर्नल करातिद धमनी.**

ही धमनी थैरैद कूर्चेच्या वरच्या कांठापासून वर, व पुढें जाऊन, मग मागें जाते; आणि खालच्या दाभाडाच्या कांदैलची मान, व कानाचें छिद्र, ह्यांच्या मधील जाग्यांत विभागली जाऊन, तिजपासून तेंपरल व इन्तर्नल म्याक्सिलरी ह्या दोन शेवटच्या शाखा निघतात. कामन करातिद धमनीचा वरचा भाग ज्या त्रिकोणाकार स्थानांत असतो, त्याच स्थानांत ह्या धमनीचा खालचा भाग असतो.

**संबंध.** आरंभीं ही धमनी कातडें, प्लातिज्मा, उथळ व खोल फाशिया, व स्तर्नोम्यास्तैद ह्याचा पुढचा कांठ, ह्यांनीं आच्छादिली आहे. ह्या ठिकाणीं ती उथळ आहे. प्रथम हैपोग्लासल मज्जातंतु, व फेशियल आणि

लिंग्वल शिरा हिजवर आडव्या येतात. मग दैग्यास्त्रिक व स्तैलोहैयैद स्नायु आडवे येतात. शेवटीं ही परातिद ग्ल्यांद ह्या मध्यें खोल शिरते, एथें फेशियल मज्जातंतु हिजवरून जातो. तेंपरल व म्याक्सिलरी शिरा ही पुढें आहेत. आंतल्या आंगास हैयैद अस्थि, फेरिंक्स, व खालच्या दाभाडाची रेमस आणि परातिद ग्ल्यांद, हे भाग आहेत. मागें हिच्या आरंभाजवळ वरचा ल्यारिंजियल मज्जातंतु आहे. आणि ही आंतल्या करातिद धमनी पासून स्तैलोग्लासस, व स्तैलोफॅरिंजियस स्नायु, ग्लासोफॅरिंजियल मज्जातंतु, व परातिद ग्ल्यांद ह्यांचा कांहीं भाग, ह्यांनीं निराळी झाली आहे.

बाहेरील करातिदधमनीच्या संबंधाचें कोष्टक.

**पुढें**

कातडें व प्लातिज्मा.
उथळ व खोल फाशिया.
हैपोग्लासल मज्जातंतु.
लिंग्वल व फेशियल शिरा.
दैग्यास्त्रिक व स्तैलोहैयैद स्नायु.
फेशियल मज्जातंतु व परातिदग्लांद.
तेंपरल व म्याक्सिलरी शिरा.

**आंत**

हैयैद अस्थि.
फेरिंक्स.
परातिदग्लांद.
खालच्या दाभाडाची रेमस.

बाहेरीलकरातिद धमनी.

**मागें.**

वरचा ल्यारिंजियल मज्जातंतु
स्तैलोग्लासस स्नायु.
स्तैलोफ्यारिंजियस स्नायु.
ग्लासोफ्यारिंजियल मज्जातंतु.
परातिद ग्ल्यांद.

बाहेरील करातिद धमनी पासून आठ शाखा निघतात, त्यांचे तीन वर्ग केले आहेत.

| पुढच्या. | मागल्या. | चढत्या. | |
|---|---|---|---|
| **वरची थैरैद.** | **आक्सिपितल.** | **असेंदिंगफ्यारिंजियल.** | |
| **लिंग्वल** ( जिभेची ). | **मागली आरिक्युलर.** | तेंपरल | ह्या शेवटच्या |
| **फेशियल** ( मुखाची ) | | इन्तर्नलम्याक्सिलरी | |

**वरची थैरैद** हैयैद अस्थीच्या मोठ्या शृंगाच्या लागलीच खालती मूळ धमनी पासून निघून, प्रथम वर व आंत जाऊन नंतर थैरैद ग्ल्यांद ह्यावर वांकडी खालीं व पुढें वळते, व समोरची धमनी व खालची थैरैद ह्यांशीं संयोग पावते. ही प्रथम उथळ असते, नंतर ओमोहैयैद, स्तर्नोहैयैद, व स्तर्नोथैरैद स्नायूंखालून जाते. हिजपासून चार शाखा निघतात. १ हैयैद ही हैयैद अस्थीस जाते, ती त्याच्या स्नायूंस पोषिते २ सुपर फिशियल दिसेंदिंग शाखा ही स्तर्नोम्यास्तैद व शेजारचे स्नायु ह्यांस पोषिते. ३ सुपीरियर ल्यारिंजियल ही त्याच नांवाच्या मज्जातंतु बरोबर जाऊन, थैरोहैयैद पडदा विंधून लेरिंक्स मध्यें जाते, व त्याची म्यूकस त्वचा, ग्ल्यांद व एपिग्लातिस म्हणजे श्वासमार्गाचा पडदा, ह्यांस पोषून समोरच्या शाखेशीं संयोग पावते. ४ क्रैको थैरैद, ही लहान शाखा त्याच नांवाच्या पडद्यावर आडवी जाऊन, समोरच्या शाखेशीं संयोग पावते. ह्या शाखेचें स्थान महत्वाचें आहे, कारण लेरिंक्सला छिद्र पाडतांनां हिजपासून जो रक्तस्राव होतो, तो बंद करणें कठीण पडतें.

**लिंग्वल धमनी** वरलीच्या वर निघून हैयैद अस्थीच्या मोठ्या शृंगाकडे तिरपी वर व आंत ( पहिला भाग ) जाते. मग त्याशीं समांतर पुढें ( दुसरा भाग ) जाऊन नीट वर जिभेच्या खालच्या आंगापर्यंत ( तीसरा भाग ) चढते. शेवटी पुढें वळून रेनैन ह्या नांवानें तिच्या शेंड्यापर्यंत ( चवथा भाग ) जाते, व समोरच्या वाहिनीशीं संयोग पावते. ह्या धमनीचा पहिला भाग उथळ असून, मधल्या कंन्स्त्रिक्तर स्नायूवर टेकतो; दुसरा भाग ही ह्याच स्नायूवर टेकतो, हा भाग दैग्यास्त्रिक, स्तैलोहैयैद, व हायोग्लासस ह्या स्नायूंनी आच्छादिला आहे; तिसरा भाग हायोग्लासस व

## मस्तकाच्या आणि मानेच्या धमन्या.




अ

१ कामन करातिद धमनी. २. आंतली करातिद. ३ बाहेरली करातिद. ४ वरची थैरैद. ५ लिंग्वल. ६ फेशियल. ७ आक्सीपितल. ८ मागची आरिक्युलर. ९ आंतली म्याकूसिलरी. १० तेम्परल. ११ त्रान्सवर्स फेशियल. १२ चढती फेरीजियल. १३ वेगास मज्जातंतु. १४ हैपोग्लासल मज्जातंतु. १५ आंतली जुगुलर शीर. १६ ओमोहैयैद स्नायु. १७ स्कलीनस अंतेकस स्नायु.

* उजवी सबक्लेवियन धमनी व तिच्या शाखा ह्यांचें कोष्टक. अ. सबक्लेवियनच्या १ला भाग. ब. २रा भाग. क. ३रा भाग. ड. वर्तिब्रल धमनी. ई. थैरैद आक्सिस; तिच्या शाखा,— फ. खालची थैरैद, ग. त्रान्स्वर्सेलिस कोलै, आणि ह. सुप्रास्क्याप्युलर. ज्ञ. इन्तर्नल म्यामरी. क्ष. सुपीरियर इन्तर्कास्तल. १ कामन करातिद धमनी.

गिनियो हायोग्लासस, ह्या स्नायूंच्या मध्यें असतो; चवथा भाग फक्त म्यूकस त्वचेनें आच्छादिला आहे.

**शाखा.** १ हैयैद ही हैयैद आस्थि, व त्याचे स्नायु, ह्यांस पोषिते. २ दार्सेलिसलिंग्वि जिभेच्या वरच्या अंगाची म्यूकसत्वचा, तान्सिल, तालूचा नरम भाग, व एपिग्लातिस ह्यांस पोषून समोरच्या शाखेशीं संयोग पावते. ३ सब्लिंग्वल ही सबूलिंग्वल ग्ल्यांद, शेजारचे स्नायु, व तोंड आणि हिरड्या ह्यांची म्यूकस त्वचा, ह्यांस पोषिते. ४ लिंग्वल धमनीचा चालू झालेला भाग, गस्तेतरी मज्जातंतु सहवर्तमान जिभेच्या खालच्या आंगानें जातो, त्यास रेनैन म्हणतात.

**फेशियल धमनी** लिंग्वलच्या किंचित् वरून निघून, खालच्या दाभाडाच्या आंगा खालून पुढें व वर सब्म्याक्सिलरी ग्ल्यांद ह्यापर्यंत चढून त्यांत बसते. हा ह्या धमनीचा मानेंतील भाग म्हणावा. मग ती म्यासेतर स्नायूच्या पुढच्या खालच्या कोणावरून, खालच्या दाभाडाच्या अस्थीच्या आंगावर चढते, व गालावरून पुढें आणि वर तोंडाच्या कोणापर्यंत जाते. नंतर नाकाच्या बाजूनें नेत्र पिंडाच्या आंतल्या कोणापर्यंत जाऊन, अंग्युलर धमनी ह्या नांवानें संपते. मानेंत ही धमनी प्रथम उथळ असते, नंतर दैग्यास्त्रिक व स्तैलोहैयैद स्नायु व सब्म्याक्सिलरी ग्ल्यांद ह्या भागाच्या खालीं जाते. मुखावर ही कातडें, व वसा ह्यांनीं आच्छादिली आहे. तोंडाच्या कोणाजवळ प्लातिस्मा व जिगोम्यातिसे ह्यांनीं आच्छादिली आहे.

ह्या धमनीच्या **शाखा** दोन प्रकारच्या आहेत. पहिल्या मानेच्या भागापासून निघालेल्या व दुसऱ्या मुखावरील भागापासून निघालेल्या.

**मानेच्या**— १ असेंदिंगप्यालेतैन शाखा, ही स्तैलोग्लासस व स्तैलोफेरिंजियस स्नायु, तान्सिल, व कर्णेंद्रियाची नळी, ह्यांस पोषिते. २. तान्सिलितिक ह्या शाखा, तान्सिलास पोषितात. ३ सब्म्याक्सिलरी ह्या चार अथवा पांच शाखा सब्म्याक्सिलरी ग्ल्यांद ह्यास पोषितात. ४ दैग्यास्त्रिक ही दैग्यास्त्रिक स्नायू खालून मैलोहैयैद ह्यावर पुढें जाऊन, खालच्या दाभाडाचे स्नायु पोषून लिंग्वलशीं जुळते.

**मुखाच्या.** १ मस्क्युलर शाखा इन्तर्नलतेरिगैद, म्यासेतर, व बक्सिनेतर

ह्यांस पोषितात. २ खालची लेबियल खालच्या ओठांचे स्नायु व कातडें ह्यांस पोषिते. ३ खालची कारोनरी ही खालच्या ओठाच्या ग्ल्यांद, म्यूकस त्वचा, व स्नायु, ह्यांस पोषून, खालच्या दंतल धमनीची मेंतल शाखा, व खालची लेबियल्ल शाखा, ह्यांशीं संयोग पावते. ४ वरची कारोनरी वरचा ओंठ व नाकाची बाजू ह्यांस पोषिते. ५. ल्यानरेलिस नेजै, नाकाचें वरचें आंग व नाकपुडी ह्यांस पोषिते. ६ आंग्युलर ही फेशियलचा चालू झालेला भाग आहे. ही ल्याक्रिमल स्याक, व आर्बिक्युलेरिस स्नायु, ह्यांस पोषून अफ्थाल्मिकच्या नेज़ल शाखेशीं जुळते.

**आक्सिपितल धमनी** ही परातिद ग्ल्यांद आणि दैग्यास्त्रिक व स्तैलोहैयैद स्नायु ह्यां खालून आंतली करातिद धमनी, आंतली जुग्युलर शीर, न्युमोग्यास्त्रिक व स्पैनल अक्सेसरी मज्जातंतु ह्यांजवरून म्यास्तैद भाग व अत्लसचा पक्षतुल्यभाग ह्यांच्या मध्यें येते, मग खोल स्नायूंच्या खालून तेंपरल अस्थीच्या खांचणींतून क्षितिज समांतर मागें जाते. मग नीट वर चढून त्रपीजियस स्नायूस विंधून डोक्याच्या मागल्या आंगावर वांटली जाते, आणि मागली आरिक्युलर तेंपरल आणि समोरची आक्सिपितल ह्या धमन्यांवरोबर संयोग पावते. हैपोग्लासल मज्जातंतु ह्या धमनीस वेढा घालून मागून पुढें येतो.

**शाखा**— १ खालची मेनिन्जियल शाखा आंतल्या जुग्युलर शिरेच्या बाजूनें चढून, मागल्या ल्यासेरेतिद छिद्रांतून जाऊन दुरामेतरास वांटली जाते. २ प्रिन्सेप्ससर्वैसिस ही शाखा कंप्लेक्सस, व सेमिस्पैनेलिसकोलै, ह्यां स्नायूंच्या मधून मानेच्या बाजूनें उतरते. हिच्या शाखा सब्क्लेवियन धमनीच्या प्रोफंदासर्वैसिस वर्तिब्रल, व सुपर फिशियल सर्वैकल ह्या शाखांशीं संयोग पावतात; ह्या संयोगाच्या योगानें कामनकरातिद अथवा सब्क्लेवियन धमनी बांधली असतां, भाजूबाजूनें अभिसरण चालू होतें. ३ आरिक्युलर शाखा कानाचा मागला भाग पोषिते. ४ मस्क्यूलर शाखा दैग्यास्त्रिक, स्तैलोहैयैद, स्तर्नोम्यास्तैद, वगैरे स्नायूंस जातात.

**मागली आरिक्युलर धमनी** बाहेरील करातिदपासून दैग्यास्त्रिक व स्तैलोहैयैद ह्या स्नायूंच्या सपाटीच्या वर निघते, व स्तैलैद भागाच्या

बाजूनें परातिद ग्ल्यांद ह्याच्या खालून कानाची कूर्चा व म्यास्तैद भाग ह्यां-च्या मधील खंचणींतून जाते. मग हिचे दोन विभाग होतात, पैकीं मागचा आक्सिपितल धमनीशीं व पुढला तेंपरल धमनीशीं संयोग पावतो. हिच्या शाखा दैग्यास्त्रिक, स्तैलो-हैयेद, व स्तर्नोम्यास्तैद स्नायु, परातिदग्ल्यांद, आणि कानाची कूर्चा, ह्यां भागांस जातात. एक शाखा स्तैलोम्यास्तैद छिद्रां-तून जाऊन तिंपनम, म्यास्तैद अस्थीचीं विवरें, आणि कर्णेंद्रियांतील सेमिस-र्क्युलर कनाल ह्यांस पोषिते. कानास गेलेल्या शाखेस आरिक्युलर शाखा म्हणतात. स्तैलोम्यास्तैद छिद्रांतून जाणारीस स्तैलोम्यास्तैद म्हणतात.

**असेंदिंग** म्हणजे चढती **फ्यारिंजियल धमनी**, ही बाहेरील करातिदच्या शाखांपैकीं सर्वांत लहान आहे. ही तिच्या आरंभापासून निघून आंतली करातिद धमनी, व फेरिंक्स, ह्या भागांच्या मधून मस्तकाच्या बुडाप-र्यंत चढते, व हिजपासून तीन शाखा निघतात. १ मेनिन्जियल शाखा मागल्या ल्यासेरेतेद छिद्रांतून जाऊन, दूरामेतरावर वांटली जाते. २ फ्यारिं-जियलशाखा फेरिंक्स, तालूचा नरम भाग, तान्सिल, व कर्णेंद्रियाची नळी, ह्यांचें पोषण करते. ३ एक्स्तर्नेल शाखा ही स्नायु, लिंफ्यातिक ग्ल्यांद, व मज्जातंतु, ह्यांस वाटली जाते.

**तेंपरल धमनी** बाहेरील करातिदच्या शेवटच्या दोन शाखांपैकीं लहान शाखा आहे. ही परातिद ग्ल्यांद ह्यामध्यें खालच्या दाभाडाच्या कां-दैलची मान, व कानाचें छिद्र, ह्या भागांच्या मधून निघते, व कानड्या खालून जिगोमाच्या मुळा वरून जाते, आणि जिगोमाच्या कमानीपासून दोन इंच वरतीं हिला पुढची, व मागची, अशा दोन शाखा फुटतात. तेंपरल धमनी-चा पुढचा विभाग कपाळाच्या बाजूनें पुढें वळून, कातडें व अक्षिच्छदकू ह्यांस वाटला जातो. फ्रांतल व सुप्राअर्बितल धमन्यांशीं ह्याचा संयोग होतो, आणि शाखांचा झोंक पुढून मागें आहे. मागचा विभाग डोक्याच्या बाजूनें तेंपरल फाशिया वरून मागें जातो, व समोरच्या धमनीच्या मागल्या विभागाशीं व आरिक्युलर आणि आक्सिपितल ह्या धमन्यांशीं संयोग पावतो.

**शाखा. १** तेंपरल धमनी परातिद ग्ल्यांदमध्यें असतां, तिजपासून त्रान्स्-वर्स फेशियल म्हणून एक शाखा निघते, ती परातिद ग्ल्यांदांतून जिगोमाची

कमान व स्तीनोचा दक्त ह्यांच्या मधून अडवी मुखावर येते. हिजपासून अनेक शाखा निघतात, त्या परातिदग्ल्यांद, म्यासितर स्नायु, व कातडें, ह्यांस वाटल्या जाऊन फेशियल व इन्फ्राआर्बितल ह्या धमन्यांशीं अग्रसंयोग पावतात. २ मधली तेंपरल शाखा जिगोमाच्या कमानीच्या वरतीं निघून, तेंपरल फाशियाचें विंधन करून, तेंपरल स्नायूस वांटली जाते. इन्तरर्नेल म्याक्सिलरी धमनीच्या दीप तेंपरल शाखांशीं हिचा अग्रसंयोग होतो. ह्या धमनी पासून एक शाखा अक्षिकोशांत जाते, ती आर्बिक्युलेरिस प्याल्पिब्रेरम् स्नायूस वाटली जाते, व आफ्थ्याल्मिक धमनीच्या शाखांशीं संयोग पावते. ३ अंतीरियर आरिक्युलर शाखा कानास वाटल्या जातात.

**आंतली म्याक्सिलरी** ही बाहेरील करातिदच्या दोन शेवटच्या शाखां पैकीं मोठी आहे, व तिशीं काटकोनानें निघून, मुखाच्या खोल भागांवर वांटली जाण्या करितां, खालच्या दाभाडाच्या मानेच्या मागून आंत जाते. आरंभीं ती परातिदग्ल्यांद ह्याच्या द्रव्यांत शिरते. ह्या धमनीच्या पहिल्या अथवा **म्याक्सिलरी भागाचें** गमन खालच्या दाभाडाची रेमस, व आंतलें बाजूचें संधिबंधन, ह्यांच्यामधून क्षितिजाशीं समांतर पुढें व आंत होतें. **दुसऱ्या अथवा तेरिगेदभागाचें** गमन होतांना ही धमनी एक्स्तर्नेल तेरिगेद स्नायूच्या बाहेरल्या आंगावरून तिरपी पुढें, व वर चढते. तिसऱ्या अथवा **स्फीनोम्याक्सिलरी भागाचें गमन** झाल्यावर ही धमनी वरच्या म्याक्सिलरी भरथीजवळ येऊन, एक्स्तर्नेल तेरिगेद ह्याच्या दोहीं डोक्यांच्या मधून स्फीनोम्याक्सिलरी खांचेंत जाते, व एथें तिला मेकलच्या ग्यांग्लियनचा संबंध असतो. ह्या धमनीच्या शाखांचे तिच्या तीन भागांप्रमाणें तिन वर्ग केले आहेत.

तिंप्यानिक, मधली मेनिंजियल, धाकटी मेनिंजियल, व खालची देंतल, ह्या धमन्या **म्याक्सिलरी भागाच्या** शाखा होत.

१ तिंप्यानिक शाखा ग्ल्यासीरियन चिरेंतून जाऊन तिंपनमचा पडदा, व लाक्सेतर तिंपनैस्नायु, ह्यांस पोषून स्तैलोम्यास्तैद व विदियन ह्या धमन्यांशीं संयोग पावते. २ मधली मेनिंजियल स्पैनोजग छिद्र, व परायतल अस्थीच्या पुढच्या खालच्या कोणावरली खांचणी ह्यांतून करटीच्या खांचेंत

चिरते, व तिला पुष्कळ शाखा फुटतात; त्या डुरामेतर, मस्तक, पांचव्या मज्जातंतूचा ग्यांग्लियन, व फेशियल मज्जातंतु, ह्यांवर वांटल्या जातात. ह्यां पैकीं कित्येक स्फिनेदल चिरेंतून अक्षिकोशांत जाऊन, अफ्थाल्मिक धमनीच्या शाखांशीं जुळतात. ३. धाकटी मेनिंजियल ओवेली छिद्रांतून जाऊन डूरामेतर व कसीरियन ग्यांग्लियन, ह्यांत पोषिते. ४ खालची देंतल, देंतल छिद्रांतून देंतल मज्जातंतूसहवर्तमान दांताच्या नळांत जाते, मग ह्यग्र दंताजवळ हिच्या दोन शाखा होतात. एक छेदक दंताखालून हनवटीपर्यंत जाऊन समोरचीशीं जुळते. दुसरी मेंतल छिद्रांतून मज्जातंतु सहवर्तमान बाहेर पडून हनुवटीच्या भागास पोषिते, व फेशियल धमनीच्या शाखेशीं संयोग पावते. ह्या धमनीस देंतल छिद्राजवळ शाखा फुटून, ती मैलोहैयेद स्नायूस जाते. दांताच्या नळांत त्याचें पल्प म्हणजे गीर ह्यास हिच्या शाखा जातात.

दुसरा अथवा तेरिगेद भाग ह्या पासून खोल तेंपरल, तेरिगेद, म्यासेतेरिक, व बकल, ह्या शाखा त्याच नांवाच्या स्नायूंस जातात.

तिसऱ्या अथवा स्फीनोम्याक्सिलरी भागाच्या शाखा.

१ आल्वियोलर, ही वरच्या म्याक्सिलरी अस्थीच्या उंचवट्यावर उतरल्यावर तिला पुष्कळ शाखा फुटतात. त्यांत वरची इतरांपेक्षां मोठी (सुपीरियर देंतल ही शाखा) ह्यग्रदंत व दाढा ह्यांस पोषिते. हिच्या कांहीं शाखा अल्वियोलर भागांतील छिद्रांतून जाऊन कांहीं आंत्रमला, व कांहीं हिरड्यांनां पोषितात. २ इन्फ्राआर्बितल ही त्याच नांवाच्या नळा मधून जाते; हिच्या शाखा आश्रुपिंड, अक्षिकोशाचे कांहीं स्नायु, आंत्रम, आणि वरचें दाभाड, ह्यांस जाऊन, ही मुखावर येते; आणि आफ्थाल्मिक व फेशियल ह्या धमन्यांशीं संयोग पावते. ३ दिसेंदिंग अथवा उतरती प्यालेतेन ही मागल्या प्यालेतेन नळांतून खालीं तालूवर उतरते, आणि तालूचे ग्ल्यांद, म्यूकस त्वचा, व हिरड्या, ह्यांस पोषिते. मेकलच्या ग्यांग्लियनचे मागले प्यालेतेन मज्जातंतु ह्या शाखांच्या संगतीनें उतरतात. पुढच्या प्यालेतेन नळांतून हिची एक लहान शाखा नाकांत जाऊन स्फीनोप्यालेतेनशीं अग्रसंयोग पावते. ४ विदियन ही विदियन नळामधून मागें जाऊन, फेरिंक्स

व कर्णेंद्रियाची नळी, ह्या भागांवर वांटली जाऊन, तिंपनमला तिची एक लहान शाखा जाते. ५ वेरिगोप्यालेतैन त्याच नांवाच्या नळांतून मागें जाऊन, फेरिंक्सच्या वरच्या भाग व कर्णेंद्रियाची नळी ह्यांवर वांटली जाते. ६ नेजल अथवा स्फीनो प्यालेतैन ही स्फीनोप्यालेतैन छिद्रांतून नाकाच्या वरच्या मियेतसच्या मागल्या भागांत उतरते, व तिला दोन शाखा फुटतात. ह्यांत एक आंतली शाखा नाकाच्या पडद्यावर जाते, व बाहेरल्या शाखेच्या दोन अथवा तीन शाखा होतात, त्या नासिकाच्या बाजूच्या भिंती, आंत्रम, एथमैदल व स्फीनैदलसेल्स, ह्यां भागांस वांटल्या जातात. आंतली शाखा दिसेंदिंग प्यालेतैन धमनीच्या शाखेशीं अग्रसंयोग पावते.

## आंतील करातिद धमनी.

**आंतली करातिद धमनी** ही थैरैद कूर्चेच्या वरच्या कांठाजवळ, कामन करातिद धमनीच्या दुभागा पासून निघून, मानेच्या वरच्या तीन मणक्यांच्या पक्षतुल्य भागांपुढून तेंपरल अस्थीच्या पीत्रस भागाच्या करातिद छिद्रापर्यंत नीट वर चढते. नळांत कांहीं अंतर पावेतों वर चढून पुढें व आंत झुकते, व सेलातर्सिकाच्या बाजूनें किंचित् चढून पुढील क्लैनैद भागाच्या बाजूनें वर वळते. मग पुढल्या क्लैनैद भागाच्या आंतल्या बाजूस दुरामेतरला विंधिल्यावर तिला शेवटील शाखा फुटतात. वर्णन सुलभ होण्यासाठीं ह्या धमनीचे चार भाग मानिले आहेत. ते असे;— १ सर्वैकल, मानेचा. २ पीत्रस, कर्णास्थीच्या कठीण भागाचा. ३ क्यावर्नस, शीर्षतलास्थीच्या खांचणीचा. ४ सेरिब्रल, मेंदूसंबंधि. आरंभीं ही धमनी एका त्रिकोणाकार स्थानांत असते, त्या स्थानाच्या मर्यादा कामन करातिद धमनीच्या वर्णनांत दिल्या आहेत.

मानेच्या भागास मागें रेक्तसअंतैकसमेजर स्नायु, फ्यारिंजियल व वरच्या ल्यारिंजियल मज्जातंतु, ह्यांचा संबंध आहे; आंत फेरिंक्स, तान्सिल, व चढती फ्यारिंजियल धमनी; बाहेर आंतली जुग्युलर शीर, ग्लासोफेरिंजियल, न्यूमोग्याख्रिक्, व हैपोग्लासल मज्जातंतु, आणि पुढें स्तैलोग्लासस, स्तैलोफेरिंजियस, स्तैलो हैयैद, दैग्यास्त्रिक्, व स्तर्नोम्यास्तैद स्नायु; ग्लासो

फॅरिंजियल व हैपोग्लासल् मज्जातंतु व पेरातिद ग्ल्यांद, ह्या भागांचा संबंध आहे.

पीत्रस भाग अथवा करातिद नळांतला भाग अस्थीपासून दुरामेतरनें वेगळा झाला आहे, ह्यास करातिद् प्लेक्सस ह्याचा संबंध आहे.

क्यावर्नस भाग, क्यावर्नस सैनस ह्या शिरेच्या बाहेरच्या भिंतींत आहे. आंतल्या आंगास ह्यास सैनसला मढविणाऱ्या त्वचेचा, आणि बाहेरच्या आंगास ३ ऱ्या, ४ थ्या, अफ्थाल्मिक, व ६ व्या मज्जातंतूचा संबंध असतो.

सेरिब्रल् अथवा मेंदूसंबंधी भाग अऱ्याक्नैद पडद्याच्या वेष्टनांत गुंडाळलेला असतो, व ह्यास आप्तिक् मज्जातंतूचा संबंध असतो. ह्याच्या विभागस्थानीं हा भाग सिल्वियसच्या चिरेंत असतो.

| | | |
|---|---|---|
| शाखा | पीत्रस भागाच्या } | तिंप्यानिक. |
| क्यावर्नस भागाच्या | | सेरिब्रल भागाच्या |
| पुढची रेसेपत्याक्युले. | | पुढची सेरिब्रल. |
| पुढची मेनिंजियल. | | मधली सेरिब्रल. |
| आफ्थाल्मिक. | | मागली कम्युनिकेतिंग. |
| | | पुढची कोरैद. |

तिंप्यानिक धमनी करातिद नळामधल्या लहान छिद्रांतून तिंपनम मध्यें जाऊन, आंतल्या म्याक्सिलरी धमनीच्या तिंप्यानिक शाखेशीं, व स्तैलोम्यास्तैद धमनीशीं संयोग पावते. २ पुढील रिसेपत्याक्युले ह्या पुष्कळ शाखा पिच्युतरी ग्ल्यांद, कर्साश्रियन ग्यांग्लियन, व क्यावर्नस व पित्रोसल सैनसच्या भिंती, ह्या भागांस पोंचितात. ह्या शाखांपैकीं एकीपासून दूरामेतर ह्यास एक शाखा जाते, तिला पुढची मेनिंजियल म्हणतात. ३ अफ्थाल्मिक ही शाखा आंतली करातिद क्यावर्नस सैनसांतून निघाल्या बराबर तिजपासून पुढील क्लैनैद भागाच्या आंतल्या आंगास निघून, आप्तिक छिद्रांतून अक्षिकोशांत जाते. ही प्रथम अप्तिक मज्जातंतूच्या खालीं व बाहेर असते. मग त्याच्या वरून आंतल्या आंगास अक्षिकोशाच्या आंतल्या भिंतीजवळ येऊन सुपीरियर आब्लिक स्नायूच्या खालून नेत्रपिंडाच्या आंतल्या कोणाजवळ येते, व फ्रांतल, आणि नेजल, ह्या दोन शेवटच्या शाखा हिजपासून निघतात.

आफ्थाल्मिक धमनीच्या शाखा दोन प्रकारच्या आहेत. १ अक्षिकोश व त्या सभोंवतालचे भाग ह्यांस वांटलेल्या. २ नेत्रापिंड व त्याचे स्नायु ह्यांस वांटलेल्या.

१ ल्याक्रिमल ही आश्रुपिंडास पोषिते. २ सुप्रा आर्बितल त्याच नांवाच्या छिद्रांतून बाहेर पडून, कपाळाचे स्नायु, व कातडें, आणि डोक्याचें कातडें, ह्यांस पोषिते; व फेशियल धमनीच्या शाखा, आणि समोरची सुप्रा आर्बितल शाखा ह्यांशीं संयोग पावते. ३ एथमैदल ह्या पुढची व मागची अशा दोन आहेत. ह्या त्याच नांवाच्या छिद्रांतून करटींत जाऊन पुढचीं व मागचीं एथमैदल सेल्स, फ्रांतल व स्फिनैदल सैनसेस, ह्यांस पोषितात. नंतर ह्यांच्या शाखा लगतच्या दुरामेतरला जातात. कांहीं शाखा एथमैद अस्थीच्या पडद्याच्या छिद्रांतून नाकांत जाऊन, स्फीनोप्यालेतैन हिच्या शाखेशीं जुळतात. पुढची एथमैदल धमनी नेजल मज्जातंतूसह अक्षिकोशांतून मस्तकांत, व तेथून नाकांत येते. ४ प्याल्पिब्रल ह्या दोन शाखा सुपीरियर अब्लिक स्नायूच्या कप्पीसारख्या भागा जवळ निघून, पापण्यांस वेढा घालतात; व त्यांच्या वरची व खालची अशा कमानी होतात. ५ फ्रांतल व नेजल ह्या दोन अफ्थाल्मिकच्या शेवटच्या शाखा अक्षिकोशाच्या आंतल्या कोणाजवळ बाहेर पडून, कपाळ व नाकाचें बाहेरील आंग ह्यांवरचे भाग पोषितात. पहिली सुप्रा आर्बितलशी, व दुसरी फेशियलच्या आंग्युलर शाखेशी, अशा अग्रसयोग पावतात. ६ सिलियरी शाखांचे तीन वर्ग केले आहेत, ते आखूड, लांब, व पुढील सिलियरी हे होत.

१ आखूड सिलियरी १२ पासून १५ आहेत, व ह्या आफ्थाल्मिक अथवा तिच्या कोणत्या एकाद्या शाखे पासून निघून, आप्तिक मज्जातंतूच्या सभोंवतीं जातात. मग ज्या ठिकाणीं तो ततु स्क्लिरातिक मध्यें शिरतो, तेथें त्याला विंधून कोरैद पडदा, व सिलियरी प्रोसेसेस, ह्यांस पोषितात. २ लांब सिलियरी दोन आहेत, व त्या नेत्रापिंडाच्या प्रत्येक बाजूस स्क्लिरातिक व कोरैद ह्या पडद्यामधून सिलियरी लिगमेंतवर जाऊन, ऐरिसच्या घेरा सभोंवतीं धमन्यांचा वेढा पाडतात. ह्या वेढ्यापासून कित्येक समकद्रक् शाखा ऐरिसाच्या मोकळ्या काठाकडे पुढें जाऊन, प्युपिलच्या लगतच्या कां-

ग्यावर दुसरा धमनीचा वेढा घालतात. ४ पुढील सिलियरी ह्या स्नायूंस जाणाऱ्या शाखांपासून येतात, व कार्नियाजवळ स्क्लिरातिक पडदा विंधितात, व ऐरिसच्या घेरासभोंवतीं जो धमन्यांचा वेढा असतो, त्यांत त्यांचा शेवट होतो. ५ आर्तिरिया सेंत्रेलिसरेतिना ही अफ्थाल्मिक धमनीच्या सर्व शाखांपेक्षां लहान आहे, व आप्तिक छिद्रा जवळ निघते. ही आप्तिक मज्जातंतूस विंधून त्याच्या मध्य भागांत शिरते, व सिल्यिरी प्रासेसेस, ह्यांपर्यंत रेतिनावर हिच्या शाखा वाटल्या जातात. आफथ्याल्मिकच्या मस्क्युलर अथवा स्नायूंच्या शाखा नेत्र पिंडाच्या स्नायूंस पोषितात. ह्या दोन आहेत. १ वरची अथवा लहान शाखा लेवेतर प्याल्पिब्री, सुपीरियर रेक्तस, व सुपीरियर आब्लिक, ह्या स्नायूंस पोषिते. २ खालची, आप्तिक मज्जातंतु व खालचा रेक्तस स्नायु ह्यांच्या मधून जाऊन बाहेरचा रेक्तस, खालचा रेक्तस व खालचा आब्लिक स्नायु, ह्यांस पोषिते.

पुढची सेरिब्रल, मधली सेरिब्रल, मागली कम्युनिकेतिंग, व पुढची कोरैद, ह्या धमन्या आंतल्या करातिदच्या मेंदू संबंधी भागाच्या शाखा होत.

१ **पुढची सेरिब्रल** शाखा सिल्वियसच्या चिरेच्या आंतल्या शेवटाजवळ आंतल्या करातिद पासून निघते, व समोरच्या शाखेशीं पुढची कम्युनिकेतिंग ह्या नांवाच्या अखूड व सुमारें दोन लैन लांब शाखेनें संयोग पावते. नंतर दोन्ही बाजूच्या शाखा कार्पस क्यालोजम ह्याच्या पुढच्या कांठानें वर वळतात मग [illegible] वरच्या आंगानें मागल्या बाजूपर्यंत जाऊन, मागल्या सेरिब्रलशीं संयोग पावतात. ह्या आल्फ्याक्तरी व आप्तिक मज्जातंतु पुढच्या गड्ड्यांचे खालचें आंग, तिसरें वेंत्रिकल, पुढचें छिद्रयुक्तस्थान, कार्पस क्यालोजम, मेंदूच्या प्रत्येक अर्ध गोलांचें आंतील आंग, ह्या भागांस पोषितात. २ **मधली सेरिब्रल** शाखा सिल्वियसच्या चिरेंतून बाहेरल्या बाजूस जाते, व तिजपासून तीन शाखा निघतात. एक पुढची पुढच्या गड्ड्यास आच्छादणाऱ्या पायामेतर पडद्यास आणि मधली व मागली ह्या मधल्या गड्ड्यास पोषितात. आरंभस्थानीं ह्या शाखेला शाखाफुटून कार्पस स्त्रायेतम ह्याला शाखा जातात. ३ **मागली कम्यूनिकेतिंग**, आंतल्या करातिदच्या मागल्या भागा पासून [illegible] मागें जाते, व ब्यासिलर धमनीच्या मा-

गल्या सेरिब्रल शाखेशीं जुळते. ४ पुढची कोरैद आंतल्या करातिद पासून वरलीजवळ निघते, व मागें व बाहेर जाऊन बाजूच्या वेंत्रिकलच्या उतरत्या शृंगांत शिरते; आणि हिपोक्यांपस मेजर, कार्पस फिंब्रियेतम्, व कोरैद प्लेक्सस, ह्या भागांस वांटली जाते.

## ऊर्ध्व शाखेच्या धमन्या.

उर्ध्व शाखेस पोषणारी धमनी आरंभा पासून कोपरा पर्यंत विभागरहित एकच कांडें आहे. परंतु ती ज्या ज्या निरनिराळ्या देशांमधून जाते, त्या त्या प्रमाणें तीस निरनिराळीं नांवें प्राप्त झाली आहेत. आतां आरंभा पासून पहिल्या फांसळीच्या बाहेरील कांठापर्यंत जाणाऱ्या भागास, सब्क्लेवियन हें नांव दिलें आहे; ह्या पलीकडे कांखेच्या खालच्या कांठा पर्यंत जाणाऱ्या भागास आक्सिलरी म्हणतात; आणि ह्या ठिकाणा पासून कोपराच्या बाकापर्यंत जाणाऱ्या भागास ब्रेकियल म्हणतात. मग ह्या ठिकाणीं रेडियल व अल्नर ह्या शाखा निघाल्यावर मूळकांड समाप्त होतें. अधः शाखेंतील व्यवस्था ह्या व्यवस्थे सारखीच आहे.

### सब्क्लेवियन धमन्या.

वर्णन सुलभ होण्या साठीं प्रत्येक सब्क्लेवियन धमनीचे तीन विभाग केले आहेत. उजव्या बाजूचा पहिला भाग आरंभा पासून स्कलीनस अंतेकस स्नायूच्या आंतल्या कांठा पर्यंत तिरपा वर चढतो. डावी कडचा पहिला भाग त्या स्नायूच्या आंतल्या कांठा पर्यंत नीट वर चढतो. तेव्हां ह्या भागाचे संबंध भिन्नभिन्न आहेत, म्हणून त्यांचें वर्णन पृथक् केलें आहे, दुसरा व तिसरा हे भाग दोन्ही बाजूस सारखेच आहेत. उजव्या बाजूचा पहिला भाग डाव्या बाजूच्या पहिल्या भागा पेक्षां अखूड व उथळ असून तिरपा आहे. डावीकडचा पहिला भाग लांब, खोल, व नीट आहे.

### उजव्या सब्क्लेवियन धमनीचा पहिला भाग.

हा भाग उजव्या बाजूच्या स्तर्नो क्लाविक्युलर संधीपाशीं इन्नामिनेत धमनीपासून निघून, मानेच्या मुळानें स्कलीनस अंतेकस स्नायूच्या आंतल्या

कांठा पर्यंत वर व बाहेर चढतो, एथें हा किंचित् क्ल्याविकलच्या वर चढून आला आहे.

संबंध. पुढें कातडें, उथळ व खोल फाशिया, प्लाटिज्मा, स्तर्नोम्यास्तैद, स्तर्नोहैयैद, व स्तर्नोथैरैद स्नायु, आंतली ज्युग्युलर व वर्तिब्रल ह्या शिरा, आणि फ्रेनिक्, न्यूमोग्यास्त्रिक्, व कार्दियाक, हे मज्जातंतु; खालीं प्लूराचें आच्छादन आहे; मागें लांगस कोलै स्नायु, मानेच्या सातव्या मणक्याचा पक्षतुल्य भाग, आणि सिंपथेतिक मज्जातंतु, हे भाग असून खालच्या व मागल्या अंगानें रिकरंत ल्यारिंजियल मज्जातंतु वेढा घालतो; क्ल्याविकलच्या मागें सब्‌क्लेवियन शीर धमनीच्या खालीं आहे.

उजव्या सब् क्लेवियन धमनीच्या पहिल्या भागाच्या संबंधाचें कोष्टक.

पुढें.

कातडें, उथळ व खोल फाशिया.

प्लातिज्मा.

स्तर्नोम्यास्तैद, स्तर्नो हैयैद, व स्तर्नो थैरैद स्नायु.

आंतली जुग्युलर व वर्तिब्रल शिरा.

न्यूमोग्यास्त्रिक्, कार्दियाक, व फ्रेनिक् मज्जातंतु.

| उजवी | खालीं. |
|---|---|
| सब् क्लेवियन धमनी पहिला भाग | प्लुरा. |

मागें.

रिकरंत ल्यारिंजियल मज्जातंतु.

सिंपथेतिक मज्जातंतु.

लांगसकोलै स्नायु.

मानेच्या सातव्या मणक्याचा पक्षतुल्य भाग.

डाव्या सब्क्लेवियन धमनीचा पहिलाभाग.

हा एयोर्ताच्या आडव्या भागाच्या शेवटा पासून पाठीच्या दुसऱ्या मणक्या समोर निघून, स्कलीनस अंतैकस स्नायूच्या बद्ध स्थानामागें पहिल्या

फांसळीच्या आंतल्या कांठा पर्यंत चढतो, ह्यामुळें समोरच्या भागा पेक्षां हा लांब व खोल असून उभा आहे.

**संबंध.** ह्या भागाच्या पुढें डावा प्लूरा, डावें फुफ्फुस, न्युमोग्यास्त्रिक्, फ्रेनिक्, व कार्डियाक हे मज्जातंतु, डावी करातिद धमनी, डावी आंतली ज्युग्युलर व इन्नामिनेत शिरा, हे भाग आहेत, हा स्तर्नो हैयेद, स्तर्नो थैरैद व, स्तर्नो म्यास्तैद ह्या स्नायूंनीं आच्छादिला आहे; मागें इसाफगस, थोन्यासिक्दक्त, लांगस कोलै स्नायु, कणा व सिंपथेतिकचा खालचा सर्वैकल ग्यांग्लियन, हे भाग आहेत; आंतल्या आंगास त्रकीया, इसाफगस, व थोन्यासिक्दक्त, हे भाग आहेत; बाहेरल्या आंगास प्लूरा आहे.

डाव्या सब् क्लेवियन धमनीच्या पहिल्या भागाच्या संबंधाचें कोष्टक.

पुढें.

डावा प्लूरा व डावें फुफ्फुस.
न्यूमोग्यास्त्रिक्, कार्डियाक, व फ्रेनिक् मज्जातंतु.
डावी करातिद धमनी.
डावी आतंली जुग्युलर व इन्नामिनेत ह्या शिरा.
स्तर्नो थैरैद, स्तर्नो हैयेद, व स्तर्नो म्यास्तैद स्नायु.

| आंत. | | बाहेर. |
|---|---|---|
| इसाफगस. | डावी सब् क्लेवायन धमनी पहिला भाग. | प्लूरा. |
| त्रकीया. | | |
| थोन्यासिक् दक्त. | | |

मागें.

इसाफगस व थोन्यासिक् दक्त.
सिंपथेतिकचा खालचा सर्वैकल ग्यांग्लियन.
लांगस कोलै स्नायु व कणा.

**सबक्लेवियन धमनीचा दुसरा भाग** तिच्या कमानीच्या इतर भागांपेक्षां अखूड व उंच असून, दोहों स्कलीनै स्नायूंच्या मध्यें आहे.

**संबंध.** पुढें हा कातडें, प्लातिजमा, स्तर्नोम्यास्तैद, मानेचा फाशिया, स्कलीनस अंतेकस स्नायु, व फ्रेनिक् मज्जातंतु, ह्या भागांनीं आच्छादिला आहे; मागें मिदूस स्कलीनस स्नायूचा संबंध; वर ब्रेकियल प्लेक्ससचा; व खालीं

प्लूराचा संबंध आहे. सब् क्लेवियन शीर धमनीच्या पुढें व खालीं आहे, व तिजपासून स्कलीनस अंतेकस स्नायूनें निराळी झाली आहे.

सब् क्लेवियन धमनीच्या दुसऱ्या भागाच्या संबंधाचें कोष्टक.

पुढें.

प्लातिज्मा व स्तर्नोम्यास्तैद स्नायु.
सर्वैकल फाशिया.
फ्रेनिक् मज्जातंतु.
स्कलीनस अंतैकस स्नायु.

| वर. | | खाली. |
|---|---|---|
| ब्रेकियल प्लेक्सस. | सब् क्लेवियन धमनी दुसरा भाग. | प्लूरा. |

मागें.

मधला स्कलीनस स्नायु.

सब्क्लेवियन हिचा तिसरा भाग स्कलीनस अंतैकसच्या बाहेरील कांठापासून, पहिल्या फांसळीच्या खालच्या कांठापर्यंत, खालीं व बाहेर जातो; व ह्या पलीकडे त्याची आक्सिलरी धमनी होते. हा भाग एका त्रिकोणाकार स्थानांत आहे. ह्या त्रिकोणाचा पाया अथवा आंतली बाजू स्कलीनस अंतैकस स्नायूनें, वरची बाजू ओमो हैयेद स्नायूनें, आणि खालची बाजू क्लयाविकूल ह्यानें, अशा झाल्या आहेत.

संबंध. पुढें कातडें, प्लातिज्मा, उथळ व खोल फाशिया, क्लयाविकूल, सबक्लेवियस स्नायु, सुप्रास्क्याप्युलर धमनी व शीर, ह्या भागांनीं आच्छादिला आहे. बाहेरील जुग्युलर सुप्रास्क्याप्युलर व त्रान्स्वर्ससर्वैकूलशिरा, व सर्वैकल प्लेक्सस ह्याच्या उतरत्या शाखा, ह्यावरून जातात. धमनीची स्वताची शीर ह्या भागाच्या खालीं व पुढें आहे. मागें हा भाग मधल्या स्कलीनस स्नायूवर टेकतो. ह्याच्या वरच्या व बाहेरच्या बाजूस ब्रेकियल प्लेक्सस, व ओमो हैयेद स्नायु, हे भाग आहेत. खालीं हा पहिल्या फांसळीच्या वरच्या आंगावर टेकतो.

## सब् क्लेवियन धमनीच्या तिसऱ्या भागाच्या संबंधाचें कोष्टक.

**पुढें.**

कातडें, फाशिया, व प्लातिज्मा.

एक्स्तर्नल जुग्युलर, त्रान्स्वर्स सर्वैकल, व सुप्रास्क्याप्युलर शिरा.

सर्वैकल् प्लेक्ससच्या उतरत्या शाखा.

क्ल्याविकूल्, सब् क्लेवियस स्नायु, व सुप्रास्क्याप्युलर रक्त वाहिन्या.

| वर. | सब् क्लेवियन | खालीं. |
|---|---|---|
| ब्रेकियल प्लेक्सस. | धमनी | पहिली फासळी. |
| ओमो हैयॆद स्नायु. | तिसरा भाग | |

**मागं**

स्कलीनस मीदियस स्नायु.

सब्क्लेवियन धमनीच्या तिसऱ्या भागास बंधन लावतात.

सब्क्लेवियन धमनीच्या शाखा चार आहेत. त्यांपैकीं **वर्तिब्रल, इन्तर्नल म्यामरी, व थैरॆद आक्सिस,** ह्या पहिल्या भागां पासून आणि वरची **इंतर कास्तल** ही दुसऱ्या भागा पासून, अशा निघतात.

### वार्तेब्रल धमनी.

ही धमनी सब् क्लेवियन हिची पहिली व सर्वांत मोठी शाखा आहे. ही त्या धमनीच्या पहिल्या भागाच्या वरच्या व मागल्या अंगापासून निघून, वर जाऊन मानेच्या साहव्या मणक्याच्या पक्षतुल्य भागांतील छिद्रांत शिरते. व मानेच्या सर्व मणक्यांच्या छिद्रांतून जाऊन, आक्सिसच्या छिद्रांतून वर व बाहेर वळून, आल्लसच्या छिद्रांतुन त्याच्या मागल्या कमानीवरच्या खांचणींत येते. मग मागें जाऊन मागलें आक्सिपितो अत्लैद बंधन, व ड्यूरामेतर, ह्या भागांस विंधून आक्सिपतच्या मोठ्या छिद्रांतून मस्तकांत शिरते. मग मेदला अब्लांगेता ह्याच्या पुढून जाऊन, पान्सवेरोलिये ह्याच्या खालच्या कांठाजवळ समोरच्या धमनीशीं जुळून, ब्याजिलर धमनी पूर्ण होते. ह्या धमनीच्या शाखांचे दोन वर्ग केले आहेत.

| मानेंत गेलेल्या. | मस्तकांत गेलेल्या. |
| --- | --- |
| ल्यातरलस्पैनल. | मागली मेनिंजियल. |
| मस्क्युलर. | पुढली स्पैनल. |
| | मागली स्पैनल. |
| | खालची सेरिबेलर. |

१ ल्यातरल स्पैनल ही मानेच्या मणक्याच्या छिद्रांतून कण्याच्या नळांत जाऊन, तिच्या शाखा स्पैनल कार्द व मणके ह्यांस जातात. २ मस्क्युलर शाखा मानेचे स्नायु पोषिते. १ मागली मेनिंजियल ही एक अगर दोन असतात. ही आक्सिपतच्या मोठ्या छिद्राजवळ निघून, ड्यूरामेतर व अस्थि ह्यामध्यें शिरून फ्यालूक्स सेरिबेलै ह्याला पोषिते. २ पुढची स्पैनल ह्या दोन शाखा वार्तेब्रल हिच्या समाप्तिस्थानापासून निघून, मेदल्लाच्या पुढें एकत्र जुळतात, व एक धमनी होते, ती स्पैनल कार्द हिच्या पुढल्या आंगानें तिच्या शेवटापर्यंत जाऊन, तिला व तिच्या पडद्याला पोषिते, व इतर स्पैनल धमन्यांशीं संयोग पावते. ३ मागली स्पैनल ही शाखा मेदल्ला आब्लांगताच्या बाजू जवळ निघून, स्पैनलकार्दच्या मागल्या आंगानें उतरते, मग ओळीनेंच मणक्यां मधल्या छिद्रांतून शिरणाऱ्या वाहिन्यांशीं जुळून स्पैनलकार्द व कादेइक्वैना म्हणजे तिचाच चालूभाग ह्यांनां पोषिते. स्पैनलशाखा पायामेतरच्या खालीं असतात. ४ खालची सेरिबेलर ही शाखा मेदल्लास वेढा घालून, सेरिबेलमच्या खालच्या आंगास मागें जाते, हिच्या शाखा सेरिबेलमचें पोषण करतात. हिला आंतली व बाहेरली अशा दोन शाखा असतात. पहिली सेरिबेलमच्या दोहों गहृरांमधील खांचेंत जाते. दुसरी सेरिबेलमच्या खालच्या आंगानें त्याच्या बाहेरच्या काठापर्यंत जाते.

ब्यासिलर धमनी पान्सवेरोलियैच्या पुढच्या कांठापासून मागल्या कांठापर्यंत पोंहचते.

शाखा.

| | |
| --- | --- |
| ट्रान्सवर्स | वरची सेरिबेलर |
| पुढची सेरिबेलर | मागली सेरिब्रल. |

१ त्रान्सूवर्स शाखा पान्स व सभोंवतालचे भाग ह्यांस पोषितात. २ पुढची सेरिबेलर ही त्रान्सूवर्स धमनीची शाखा, सेरिबेलमच्या खालच्या आंगाचा पुढचा भाग पोषिते. ३ वरची सेरिबेलर ब्याजिलरच्या समाप्तिस्थानापासून निघून, सेरिब्रमच्या देठां भोंवतीं गुंडाळून सेरिबेलमच्या वरच्या आंगास येते. मग त्यास आच्छादणारा पायामेतर पडदा, पिनियल ग्ल्यांद, आणि वीलमइन्तरपाजितम्, ह्या भागास तिच्या पोषक शाखा जातात. ४ मागली सेरिब्रल ह्या दोन शाखा ब्याजिलर धमनीच्या शेवटल्या शाखा आहेत. ह्या सेरिब्रमच्या देठा भोंवतीं गुंडाळून, सेरिब्रमच्या मागल्या गड्याच्या आंगास जाऊन त्यास पोषितात. नंतर पुढच्या व मागल्या सेरिब्रल, व मागल्या कम्युनिकेतिंग, ह्या शाखांशीं संयोग पावतात.

उइलिसचें वर्तुळ, हें पुढची सेरिब्रल, व मागली कम्यूनिकेतिंग; प्रत्येक बाजूस आंतल्या करातिद धमनीचें कांडें, व मागली कम्यूनिकेतिंग; मागें मागली सेरिब्रल, व ब्याजिलरचा शेवट; ह्या धमन्यांनीं पूर्ण झालें आहे. ह्या संयोगाच्या योगानें मेंदूमधील रक्ताभिसरण सारखें होऊन, एक अथवा अधिक शाखा बंद पडल्या असतां, तें यथास्थित चालण्याचा बंदोबस्त झाला आहे.

## थैरैद आक्सिस.

हें अखुड व जाड कांडें सबक्लेवियन धमनीच्या पुढल्या आंगापासून स्कलीनस अंतेकस स्नायूच्या आंतल्या बाजूस निघतें, व त्यापासून खालची थैरैद, सुप्रास्क्याप्युलर, आणि त्रान्स्वर्सेलिस कोलै, ह्या शाखा निघतात.

१ खालची थैरैद धमनी करातिद वाहिन्यांच्या वेष्टनामागून वर जाऊन, वरची थैरैद व समोरची ह्या वाहिन्यांशीं संयोग पावते. ही लेरिंक्स, ब्रकीया, इसाफगस, आणि मानेचे स्नायु, ह्यांस पोषिते. कित्येक शाखा कण्याच्या नळांत शिरून स्पैनलकार्द, तिचीं वेष्टनें, व मणके, ह्या भागांस पोषितात.

२ सुप्रास्क्याप्युलर धमनी स्कलीनस अंतेकस स्नायूच्या खालच्या भागावर टेकते, सबूक्लेवियन धमनी वरून अडवी जाते, मग क्ल्याविकल व सबक्लेवियस स्नायु ह्यांच्या मागून, व ओमोहैयैद स्नायु खालून, मानेच्या मुळाजवळ

आडवी जाऊन, सुप्रास्क्याप्युलर खांचणीच्या अडव्या बंधनावरून स्क्यापुलाच्या पाठीवर येते, व सुप्रा स्पैनेतस स्नायु, व अस्थि, ह्यांच्या मध्यें तिच्या शाखा जातात. खांचणी जवळ स्क्याप्युलाच्या इन्फ्रास्पैनस खांचेत तिची शाखा जाते, ती मागली स्क्याप्युलर, व सबस्क्याप्युलर, ह्या शाखांशीं संयोग पावते. ही धमनी सुप्रास्पैनेतस, स्तर्नोम्यास्तैद हे, व शेजारचे स्नायु पोषिते.

२ त्रान्स्वर्सेलिस कोलै, ही मानेच्या मुळावरून आडवी त्रपीजियस स्नायुच्या पुढच्या कांठापर्यंत जाते, व तेथें तिजपासून सुपरफिशियल सर्वैकल, व मागली स्क्याप्युलर ह्या शाखा निघतात. पहिली त्रपीजियस व शेजारचे स्नायु, आणि मानेच्या ग्ल्याद, ह्यांस पोषिते. दुसरी शाखा धमनीचा चालु भाग होय, व तो लेवेतर आंग्युली स्क्याप्युली ह्या स्नायु खालून स्क्याप्युलाच्या वरच्या कोणाजवळ येऊन, त्याच्या मागल्या कांठा जवळून खालच्या कोणाजवळ जातो, व एथें आक्सिलरी धमनीच्या सबस्क्याप्युलर शाखेशीं संयोग पावतो.

**इन्तर्नेल म्यामरी धमनी** सबक्लेवियन हिच्या पहिल्या भागाच्या खालच्या आंगापासून थैरैद आक्सिस च्या सामोर निघते, व क्ल्याविकलच्या मागून छातिच्या भिंतीच्या पुढच्या भागाच्या आंतल्या आंगानें उतरून, स्तर्नमच्या कांठापासून कांहीं अंतरावर फासळ्यांच्या कूर्चांवर टेंकते, मग ६ व्या, व ७ व्या, कूर्चांच्या मध्यें तिजपासून मस्क्युलोफ्रेनिक् व वरची एपिग्यास्त्रिक्, ह्या दोन शाखा निघतात.

**शाखा.** इन्तर्नेल म्यामरी धमनीच्या कित्येक शाखा, दायफ्रम व पोटाचे इतर स्नायु, पेरिकार्दियम, मेदियस्तैनम, फासळ्यांच्या मधील जागा, व छातीचे स्नायु व कातडें, ह्यांना पोषितात.

१ वरची एपिग्यास्त्रिक् धमनी इन्तर्नेल म्याममरीच्या गतीनें चालू होऊन, रेक्तस स्नायूच्या वेष्टनामागें उतरते. मग त्याला विंधून बाहेरल्या इलियाक धमनीच्या खालच्या एपिग्यास्त्रिक शाखेशीं संयोग पावते. कांहीं शाखा रेक्तस स्नायूला विंधून पोटाचे स्नायु व कातडें ह्यांना पोषितात.
२ मस्क्युलो फ्रेनिक ही खोट्या फासळ्यांच्या कूर्चांच्या मागून जाऊन दैफ्रममध्ये विंधन करते. हिजपासून पुढच्या इंतर कास्तल शाखा निघतात, त्या मागच्या इंतर कास्तलशीं संयोग पावतात.

**वरची इन्तरकोस्तल धमनी** सबक्लेवियन हिच्या दुसऱ्या भागाच्या वरल्या व मागल्या आंगानें निघून मागें जाते, व तिजपासून खोल सेर्वैकल शाखा जाते. मग पहिल्या दोन फांसळयांच्या मानेस आच्छादणाऱ्या प्लूराच्या मागें उतरून, एयोर्ताच्या पहिल्या इंन्तर कास्तल शाखेशीं जुळते. हिच्या शाखा फांसळयांच्या मधल्या पहिल्या व दुसऱ्या जाग्यास जातात. व ह्या शाखां पैकीं प्रत्येकीपासून कण्याच्या मागल्या स्नायूंस एक, व मणक्यांमधील छिद्रांतून स्पैनल कार्द व तिचे पडदे ह्यांस दुसरी, अशा शाखा पोषितात.

१ प्रोफंदा सर्वैसिस शाखा ही मागें जाऊन, पहिली फांसळी व मानेचा पहिला मणका ह्यांच्या मधून वर दुसऱ्या मणक्यापर्यंत चढून, शेजारच्या स्नायूंस पोषून आक्सिपितल धमनीच्या प्रिन्सेप्स सर्वैसिस शाखेशीं जुळते. ही धमनी फार खोल असते, व मानेच्या मागल्या आंगानें वर चढते.

**काखेचें स्थान** शंङ्काकृति आहे. ह्याचा शेंडा, आंत पहिली फांसळी, बाहेर स्कयाप्युलाचा वरचा कांठ, व पुढें क्लयाविकल व सबक्लेवियस स्नायु, ह्या भागांच्या मधील स्थान होय. बूड खालीं झुकलें आहे, तें कातडें व फाशियाचा जाड थर ह्यांनीं घटित आहे. काखेचें स्थान, पुढें पेक्तोरल स्नायु, मागें वर सब्स्कयाप्युलेरिस व खालीं ल्यातिसिमस दार्सै व तीरीजमेजर हे स्नायु, आंत सेरेतस म्याग्नस स्नायु, आणि बाहेर भुजास्थि, कारेको ब्रेकियेलिस, व बैसेप्स स्नायु, ह्या भागांनीं मर्यादिलें आहे. ह्या स्थानांत आक्सिलरी रक्तवाहिन्या, ब्रेकियलप्लेक्सस व त्याच्या शाखा, इन्तरकास्तल मज्जातंतु, लिंफ्यातिक ग्ल्यांद, व वसा, आणि ह्या सर्व भागांस एकत्र जुळविणारी शिथिल अरियोलर त्वचा, हे भाग आहेत.

## आक्सिलरी धमनी.

ही धमनी किंचित् बांक घेऊन काखेच्या स्थानांतून पहिल्या फांसळीच्या बाहेरच्या कांठापासून, ल्यातिसिमसदार्सै व तीरीजमेजर ह्या स्नायूंच्यां तंदनाच्या खालच्या कांठापर्यंत, खालीं व बाहेर उतरते, व ह्या शेवटच्या ठिकाणीं तिची ब्रेकियल धमनी होते. ह्या धमनीची ठेव भुजेच्या ठेवीच्या अनुरोधानें निरनिराळी असते. भुज स्वाभाविक स्थितींत छातीच्या बाजूस

लागून असला वर, ह्या धमनीस किंचित् बांक असतो, त्याची गोलबाह्यता-वर व बाहेर असते. भुजेचा धडाशीं काठकोण करविला असतां, धमनी सरळ होते; भुज ह्याहून वर उचलला तर, धमनी खालीं गोलबाह्य होते.

संबंध. पुढें पेक्तोरल स्नायूंचें आच्छादन आहे; आंत आक्सिलरी शीर, अल्नर व आंतला क्युतेनियस मज्जातंतु; बाहेर ब्रेकियलप्लेक्सस, मीदियन व मस्क्युलोक्युतेनियस मज्जातंतु आणि कारकोब्रेकियेलिस स्नायु; मीदियन मज्जातंतूचीं दोन डोकीं काखेच्या स्थानाच्या मध्यावर धमनीस आपल्या मध्यें घेतात. मागें पहिला इन्तर कास्तल स्नायु, सरेतस म्याग्नस स्नायू-चा बोटा सारखा भाग, मागचा थोऱ्यासिक मज्जातंतु, सबस्क्याप्युलेरिस, ल्यातिसिमस दार्सि, व तीरिज मेजर, हे स्नायु, आणि मस्क्युलोस्पैरल व सर्कंफ्लेक्स हे मज्जातंतु आहेत. ह्या धमनीचे तीन भाग करतां येतात. पहिला भाग पेक्तोरेलिसमैनर स्नायूच्या वरच्या कांठा पर्यंत पोंहचतो; दुसरा ह्या स्नायूनें आच्छादिला आहे; आणि तिसरा भाग ह्या स्नायूच्या खालच्या कांठापासून तीरीजमेजर स्नायूच्या खालच्या कांठा पर्यंत पोंहचतो. ह्या ध-मनीस हिच्या पेक्तोरेलिस मैनर स्नायूच्या वर अथवा खालीं असणाऱ्या भागांस म्हणजे पहिल्या भागास अथवा तिसऱ्या भागास बंधन लावतात.

## अक्सिलरी धमनीच्या संबंधाचें कोष्टक.

**पुढें.**

कातडें व फाशिया.
पेक्तोरेलिस मेजर व मैनर स्नायु.
कास्तो कारेकैद मेंब्रेन.
क्रिफ्यालिकशीर.

| **बाहेर.** | | **आंत.** |
|---|---|---|
| ब्रेकियलप्लेक्सस. | अक्सिलरी धमनी. | अक्सिलरी शीर. |
| कारेकोब्रेकियेलिसस्नायु. | | अल्नर मज्जातंतु. |
| मीदियन मज्जातंतु. | | आंतला क्युतेनियस मज्जातंतु |
| मस्क्युलोक्युतेनियस मज्जातंतु. | | |

**मागें.**

पहिलें इन्तर कास्तल स्थान व इन्तर कास्तल स्नायु.
सरेनसम्याग्नसचा पहिला बोटा सारखा भाग.
मागचा थोऱ्यासिक मज्जातंतु.
सब्स्क्याप्युलेरिसस्नायु.
ल्यातिसिमसदार्सै व तीरीज मेजर स्नायु.
मस्क्युलोस्पैरल व सर्कंफ्लेक्स मज्जातंतु.

**शाखा.** १ सुपीरियर थोऱ्यासिक शाखा पेक्तोरल स्नायूंच्या मध्यें शिरून, त्यांस व छातीच्या भिंतीस वांटली जाते. २ अक्रोमियल थोऱ्यासिक काखेस मर्यादणारे स्नायु, व त्या स्थानांतील ग्ल्यांद, ह्यांस पोषिते. ३ थोऱ्यासिका लांगा, काखेस मर्यादणारे कांहीं स्नायु, व स्तन, ह्या भागास पोषिते. ४. थोऱ्यासिका एलेरिस ही, मज्जातंतूंचा ब्रेकियल प्लेक्सस व ग्ल्यांद ह्यांस पोषिते. ५ सब्स्क्याप्युलर ही आक्सिलरीच्या सर्व शाखां पेक्षां मोठी आहे, ही सब्स्क्याप्युलेरिस स्नायूच्या खालच्या कांठानें स्क्याप्युलाच्या खालच्या कोणापर्यंत मागें जाऊन, सब्क्लेवियन हिच्या मागल्या स्क्याप्युलर शाखेशीं अन्यसंयोग पावते. हिची एक शाखा स्क्याप्युलाच्या काखेच्या कांठा वरून त्याच्या पाठीकडच्या आंगास गेली आहे, हिला दार्सेलिस स्क्याप्युली म्हणतात. ही वर तीरीज मैनर, खालीं तीरीज मेजर, व पुढें त्रैसेप्सचें लांब

## आक्झिलरी आणि ब्रेकियल धमन्या व त्यांच्या शाखा. पेक्टोरल स्नायु काढून टाकले आहेत.




१ रेषा. हिच्या वरती आक्झिलरी. व खाली ब्रेकियल धमनी आहे. २ थोऱ्यासिका आक्रोमियेलिस. ३ सुपीरियर थोऱ्यासिक. ४ थोऱ्यासिका ल्यांगा. ५ थोऱ्यासिका एलेरिस. ६ सबस्क्याप्युलेरिस ७ मागची सरकम्फ्लेक्स ८ पुढची सरकम्फ्लेक्स ९ वरची प्रोफंडा. १० खालची प्रोफंडा ११ अन्यास्टमॉटिका म्याग्ना अ. क्ल्याविकल व सबक्लेवियस स्नायु. ब. कॉरॅकॉइड प्रोसेस, पेक्टोरॅलिस मेजर स्नायु काढून टाकला आहे. क. कॉरॅको ब्रेकियेलिस. ड. बायसेप्स ई. बायसिपिटल फाशिया, हा ब्रेकियल धमनीस मीडियन बेसिलिक शिरेपासून सोडवितो. फ. सुपीनेटर लांगस. ग. प्रोनेटर रेडियेटारीज.

डोकें, ह्यांनीं मर्यादिलेल्या त्रिकोणाकार स्थानांतून इन्फ्रास्पैनेतस स्नायू खाली जाते, आणि त्या स्नायूस वाटली जाऊन सुप्रास्क्याप्युलर व पोस्तीरियर स्क्याप्यूलर ह्या धमन्यांशीं अग्रसंयोग पावते. सरकंफ्लेक्स धमन्या ह्यूमरसच्या माने भोंवतीं वेढा घालतात. ६. पुढची सरकमूफ्लेक्स ही कारेकोब्रेकियेलिस व बैसेप्सचें अखूड डोकें ह्यांखाली जाऊन, तिजपासून खांद्यास पोषणारी शाखा निघते, ती बैसिपितल खांचर्णांतून भुजास्थीचें डोके व स्कंधसंधि ह्यास जाते. चालू भाग देल्तैद स्नायूस वाटला जाऊन, मागल्या सरकंफ्लेक्सशीं अग्रसंयोग पावतो. ७ मागली सरकंफ्लेक्स पुढची पेक्षां मोठी आहे, ती ह्यूमरसच्या मानेस मागल्या आंगाने वेढा घालून देल्तैद स्नायु व रवादा ह्यांस पोषिते; व पुढची सरकंफ्लेक्स, अक्रोमियल, थोऱ्यासिक, आणि सुप्रास्क्याप्युलर, ह्या शाखाशीं संयोग पावते. ही धमनी तीरीज मेजर व मेनर, त्रैसेप्सचें लांब डोकें, व भुजास्थि, ह्यानी मर्यादिलेल्या चौकोणाकार स्थानांतून जाते.

## ब्रेकियल धमनी.

ही धमनी दंडाच्या आंतल्या आंगाने तीरीज मेजर स्नायूच्या तेंदनाच्या खालच्या कांठापासून, कोपराच्या बाकाच्या किंचित् खाली जाते, व तिच्या रेदियल व अल्नर ह्या दोन शाखा होऊन ती सपते. काखेच्या बाहेरच्या बाजूपासून व तिच्या दोहों पडद्याच्या मधून ह्यूमरसच्या दोहों कांदेलच्यामध्या पर्यंत रेषा काढली तर, ही ब्रेकियल धमनीच्या मार्गाची दर्शक होईल. ही धमनी कोपराच्या बाकाजवळ एका त्रिकोणाकार स्थानात शिरते, त्याच्या मर्यादा खाली दिल्या आहेत. ह्या स्थानात ब्रेकियल, रेदियल व अल्नर, ह्या धमन्या व त्याच्या संगतीच्या शिरा, मीदियन व मस्क्युलो स्पैरल मज्जातंतु, आणि बैसेप्सचें तेंदन हे भाग असतात.

**संबंध.** ही धमनी खालीं जातांनां त्रैसेप्स, कारेकोब्रेकियेलिस, व ब्रेकियेलीस अंतैकस, ह्यांवर टेकते. मस्क्युलोस्पैरल मज्जातंतु व सुर्पारियर प्रोफंदा धमनी हे भाग मागून जातात. आंतल्या आंगास, आंतला क्युतेनियस, मीदियन, व अल्नर, हे मज्जातंतु आहेत. बाहेरल्या आंगास मीदियन मज्जातंतु, कारेकोब्रेकियेलिस व बैसेप्स हे स्नायु; पुढें कातडें व मीदियनबेजिलिक शीर आहे,

आणि मीदियन मज्जातंतु बाहेरून आंत धमनी वरून जातो. नेष्टना-मध्यें विनीकामितीज ह्या नांवांच्या शिरांचा संबंध आहे. कोपराच्या बांका-जवळ ब्रेकियल धमनी एका खोल त्रिकोणाकार स्थानांत शिरते. त्याचा पा-या वर भुजास्थिकडे असतो, बाहेरची बाजू सुपेनेतर लांगस स्नायूनें, आंत-ली बाजू प्रोनेतर रेदिऐतीरीज ह्यानें, आणि जमीन कारेकोब्रेकियेलिस व सुपे-नेतर ब्रीविस ह्यांनीं झाली आहे.

ह्या धमनीस मध्यावर बंधन लावतात, व बैसेप्सचा आतला कांठ धम-नीच्या जवळ असतो.

ब्रेकियल धमनीच्या संबंधाचें कोष्टक.

पुढें.

कातडें व फाशिया.

बैसिपितल फाशिया.

मीदियन बजेलिकशीर.

मीदियन मज्जातंतु.

| बाहेर. | | आंत. |
|---|---|---|
| मीदियन मज्जातंतु. | ब्रेकीयल | |
| कारेकोब्रेकियेलिस स्नायु. | धमनी. | आंतला क्युतेनियस मज्जातंतु. |
| बैसेप्स स्नायु. | | अल्नर व मीदियन मज्जातंतु. |

मागें.

त्रैसेप्स स्नायु.

मस्क्युलोस्पैरल मज्जातंतु.

वरची प्रोफंदा धमनी.

कारेकोब्रेकियेलिस स्नायु.

ब्रेकियेलिस अंतेकस स्नायु.

शाखा. १ वरची प्रोफंदा, ही तीरीजमेजर स्नायूच्या तंदनाच्या खाल-च्या कांठाजवळ निघून, त्रैसेप्स व ह्यूमरस ह्यांच्या-मध्यें जाते, व ह्यूमरसला वेढा घालून ब्रेकियेलिसअंतेकस व सुपेनेतर लांगस ह्या स्नायूंच्या मध्यें येऊन, रेदियल रिकरंत धमनीशीं अग्रसंयोग पावते. ही धमनी मस्क्यूलो-

स्पैरल मज्जातंतु सहवर्तमान जाते, व कोपराचा संधि व दंडाचे स्नायु ह्यां-स तिच्या शाखा जातात, कोपराच्या संधीस आलेल्या शाखेस आर्तिक्युलर शाखा म्हणतात. ह्या शाखा खालची प्रोफंदा, अनास्तमातिकाम्यायमा, व रेदियलरिकरंत, ह्या धमन्यांशी संयोग पावतात. २ खालची प्रोफंदा ब्रेकियल हिच्या मध्य भागापासून निघून, अल्नर मज्जातंतु सहवर्तमान जाऊन स्नायूंच्या मधील आंतला पडदा विधिते, आणि ओलिक्रेनन, व ह्यूमरसचा आंतील संधिभाग, ह्यांच्या मध्ये येऊन मागली अल्नर रिकरंत व अनास्तमातिकाम्यायमा ह्यांशीं अग्रसंयोग पावते. ३ अनास्तमातिकाम्यायमा कोपराच्या वर सुमारे दोन इंचावर निघाली आहे. ही ब्रेकियेलिस अंतेकस स्नायूवर जाऊन, स्नायूच्या मधील आतला पडदा विधून, ह्यूमरस भोंवतीं वेढा घालून, त्रैसेप्स स्नायु व अस्थि ह्यांच्या मधून जाते, आणि वरच्या प्रोफंदाच्या आर्तिक्युलर शाखेशीं अग्रसंयोग पावते. हिच्या शाखा मागली व पुढली अल्नररिकरंत व खालची प्रोफंदा ह्यांशीं अग्रसंयोग पावतात. ४ स्नायूंस गेलेल्या शाखा कारेकोब्रेकियेलिस, बैसेप्स, व ब्रेकियेलिसअंतेकस, ह्या स्नायूंना पोषितात. ह्यांस मस्क्युलर शाखा म्हणतात. ५ पोषक धमनी ब्रेकियलच्या मध्यापासून निघून भुजास्थीच्या आतल्या भागावर जें पोषक छिद्र आहे त्यांत शिरते, आणि अस्थींच द्रव्य पोषिते

## रेदियल धमनी.

रेदियल धमनी तिच्या गतीवरून ब्रेकियलचाच चालू भाग आहे असें दिसते. ही प्रकोष्ठाच्या रेदियस कडच्या बाजूनें कोपराच्या बाकापासून मणगटापर्यंत जाते, मग अंगठ्याच्या बुडाजवळ त्याचें प्रसरण करणाऱ्या स्नायूंच्या तेंदना खालून मागें वळून, अस्थींच्या मधील पाठीकडच्या पहिल्या इन्तर आसियस स्नायूच्या दोहों डोक्याच्या मधून तळव्यांत शिरते. ह्यानंतर ती मेताकार्पेल अस्थींवरून आडवी हाताच्या अल्ना कडच्या बाजूस जाते. तिचा अल्नर धमनीच्या खोल शाखेशीं संयोग होऊन तळव्यांतील खोल कमान पूर्ण होते.

**संबंध.** ही धमनी प्रकोष्ठाच्या ठिकाणीं फार उथळ आहे, म्हणजे

फक्त कातडें आणि फाशिया ह्यांनीं आच्छादिली असून, वरल्या आंगास सुपैनेतर लांगस स्नायूनें किंचित् झांकली आहे. मागें ती बैसेप्स, सुपैनेतर ब्रीविस, प्रोनेतररेदियैतीरीज, फ्लेक्सर सब्लैमिस ह्याचा रेदियस कडचा आरंभ, फ्लेक्सर लांगस पालिसिस, व प्रोनेतर क्वाद्रेतस, ह्या सर्व स्नायूंवर लागोपाठ टेकत जाते; शेवटीं ती रेदियसच्या खालच्या शेवटावर टेकते. मणगटावर ही बाहेरील संधिबंधनास लागली आहे, व अंगठ्यास प्रसरणाऱ्या स्नायूंच्या खालीं असते, व तळव्यांत त्याला आकुंचित करणाऱ्या स्नायूंखालीं असते. हिचा वरला एक तृतीयांश सुपैनेतर लांगस व प्रोनेतर रेदिऐतीरीज ह्या स्नायूंच्या मध्यें असतो, व खालचे दोन तृतीयांश सुपैनेतर लांगस व फ्लेक्सर कार्पैरेदियेलिस ह्या स्नायूंच्या तेंदनांच्या मध्यें असतात. रेदियल् मज्जातंतु मधल्या तृतीयांश भागाच्या बाहेरील आंगास असतो, आणि विनीकामितीज शिरा सर्व भागांत तिच्या संगतीस असतात.

रेदियल धमनीच्या संबंधाचें कोष्टक.

पुढें.

कातडें, उथळ व खोल फाशिया.
सुपैनेतर लांगस स्नायु.

| आंत. | | बाहेर. |
|---|---|---|
| प्रोनेतर रेदियैतीरीज.<br>फ्लेक्सर कार्पैरेदियेलिस. | रेदियल धमनी.<br>प्रकोष्ठांतला भाग. | सुपैनेतर लांगस.<br>रेदियल मज्जातंतु (मधल्या तृतीयांश भागास.) |

मागें.

बैसेप्सचें तेंदन.
सुपैनेतर ब्रीविस.
प्रोनेतर रेदियैतीरीज.
फ्लेक्सरसब्लैमिस दिजितोरम्.
फ्लेक्सर लांगस पालिसिस.
प्रोनेतर क्वाद्रेतस.
रेदियस.

ही धमनी प्रकोष्ठांत कोणत्याही ठिकाणीं बांधली जाते, परंतु खालच्या दोन तृतीयांश भागांत फार सुलभ रीतीनें बांधतां येते.

शाखा. तीन प्रकारच्या आहेत. १ प्रकोष्ठाच्या. २ मणगटाच्या. ३ हाताच्या.

१ प्रकोष्ठाच्या शाखा. १ रेदियल रिकरंत ही लागलींच कोंपराच्या खालीं निघून सुपैनेतर ब्रेविसवर टेकते, मग सुपैनेतर लांगस व ब्रेकियेलिस अंतैकस, ह्या स्नायूंच्या मधून वर चढते, आणि त्या स्नायूंस हिच्या शाखा जातात; नंतर ही वरच्या प्रोफंदाच्या शेवटच्या शाखेशीं अग्रसंयोग पावते. २ स्नायु संबंधी शाखा, रेदियस कडच्या आंगास असणाऱ्या स्नायूंस पोषितात. ३. सुपरफीशियल वोली ही मणगटाजवळ निघते, आणि आब्दक्तर पालिसिस स्नायूच्या तंतूंच्या मधून जाऊन, तळव्यांत अल्नर धमनीच्या चालू भागाशीं अग्रसंयोग पावते, व तिनें तळव्यांतील उथळ कमान पूर्ण होते. ४ पुढची कार्पल मणगटाच्या पुढून आत वळते. ही अल्नर धमनीच्या पुढच्या कार्पल शाखेशीं जुळून कमान होते, तिजपासून मणगटाच्या संधीस शाखा जातात.

२ मणगटाच्या शाखा. १ मागली कार्पल ही कार्पसच्या मागून आंत जाते; अल्नर धमनीच्या मागल्या कार्पलशीं हिचा संयोग होऊन कमान होते, त्या कमानी पासून कांहीं शाखा खालीं जाऊन मेताकार्पल अस्थींच्या मधील ३ ऱ्या व ४ थ्या स्थानांस पोषितात; व कांहीं वर जाऊन पुढच्या इन्तर आसियस धमन्यांशीं अग्रसंयोग पावतात. हाताच्या ठायीं खोल कमानी-च्या मागल्या परफोरेनिग म्हणजे विंधणाऱ्या शाखांशीं संयोग पावतात. २ मेताकार्पल शाखा तर्जनी व मध्यमा ह्यांचीं लगतचीं आंग पोषिते. ३ दार्सेलिस पालिसिस ह्या दोन लहान शाखा अंगुष्ठाच्या पाठीकडच्या दोहों बाजूंस जातात. ४ दार्सेलिस इंदिसिस ही लहान शाखा तर्जनीचें मेताकार्पल अस्थि, व पेरीं ह्यांचें रेदियस कडचें आंग पोषिते.

३ हाताच्या शाखा. १ प्रिन्सेप्स पालिसिस ही अंगुष्ठाच्या तळव्याकड-च्या बाजूस पोषिते. २ रेदियेलिस इंदिसिस ही तर्जनीचें रेदियस कडचें आंग पोषिते, व उथळ कमानी पासून निघालेल्या दिजितल म्हणजे बोटा

संबंधी शाखांशीं जुळते. परफोरेतीज म्हणजे विंधणाऱ्या ह्या तीन शाखा तीन दार्सल इन्तर आसिये स्नायूंच्या डोक्यांच्या मधून मार्गे जाऊन, दार्सल इन्तर आसियस म्हणजे अस्थींमधील पाठीकडच्या शाखा ह्यांशीं अग्रसंयोग पावतात. ४ पाल्मर इन्तर आसिऐ म्हणजे अस्थींच्या मध्यें असणाऱ्या तळव्यांतल्या ह्या खोल कमानीच्या तीन अथवा चार शाखा अस्थींच्या मधील स्नायूंवर पुढें जाऊन बोटांच्या बेचकांमध्यें उथळ कमानीच्या दिजिनल शाखांशीं संयोग पावतात.

## अल्नर धमनी.

अल्नर धमनी ब्रेकियल धमनीच्या दोन विभागांपैकीं मोठी होय. ही कोंपराच्या बाकाच्या किंचित् खालीं सुरू होते, व प्रकोष्ठाच्या आंतल्या आंगावरून त्याच्या मध्यापर्यंत तिरपी आंत जाते, आणि तेथून अल्नाकडच्या बाजूनें नीट खालीं मणगटापर्यंत उतरते; मग पिसिफार्म अस्थीच्या रेदियसकडच्या बाजूनें आन्युलर लिगमेंतावरून तळव्यांत उतरते, व त्यावर आडवी जाऊन उथळ कमान पूर्ण होते. ती कमान सुपरफीशियल वोली ह्या धमनीशीं जुळून संपते.

**संबंध**. वरचा अर्ध भाग खोल आहे; हा फ्लेक्सर कार्पै अल्नेरिस स्नायु निराळा करून, उथळ थरांतील बाकीचे सर्व स्नायु व फाशिया ह्यांनीं आच्छादिला आहे. एथें मीदियन मज्जातंतु ह्याजवरून गेला आहे, परंतु आरंभीं तो ह्या धमनीच्या आंतल्या आंगास असतो. ही धमनी फ्लेक्सर प्रोफंदस व ब्रेकियेलिस अंतेकस ह्यांवर टेकते; प्रकोष्ठांतील खालचा अर्ध भाग फ्लेक्सर प्रोफंदस ह्याच्या वर, व फ्लेक्सर कार्पै अल्नेरिस व फ्लेक्सर सब्लैमिस ह्या स्नायूंच्या मध्यें आहे, आणि कातडें, उथळ व खोल फाशिया, ह्या भागांनीं आच्छादिला आहे. खालच्या दोन तृतीयांश भागांस अल्नर मज्जातंतु आंतल्या आंगास आहे. वीनीकामितांज ह्या शिरा धमनीच्या संगतीनें असतात.

अल्नर धमनीच्या संबंधाचें कोष्टक.

पुढें.

उथळ थराचे स्नायु. } वरच्या अर्ध भागास.
मीडियन मज्जातंतु. }

उथळ व खोल फाशिया. } खालच्या अर्ध भागास.

| आंत. | | बाहेर. |
|---|---|---|
| फ्लेक्सरकार्पै अल्नेरिस. अल्नर मज्जातंतु (खालच्या दोन तृतीयांश भागास.) | अल्नर धमनी प्रकोष्ठांतला भाग. | फ्लेक्सर प्रोफंदस दिजितोरम्. |

मागें.

ब्रेकियेलिस अंतेकस.

फ्लेक्सर प्रोफंदस दिजितोरम्.

अल्नर धमनीचा जो भाग तळहातांत असतो, त्यास सुपरफीशियल पाल्मर आर्च म्हणजे तळव्याची उथळ कमान म्हणतात. ही धमनी अंगुष्ठ व तर्जनी ह्यांच्या मध्यें तिरपी बाहेर येऊन, सुपर फिशियेलिस वोली, व रेडियेलिस इन्दिसिसची शाखा, ह्यांशीं संयोग पावते.

**संबंध.** ह्या कमानीच्या पुढें कातडें, पाल्मेरिस ब्रेविस स्नायु, व पाल्मर फाशिया, हे भाग आहेत. हिच्या मागें आन्युलर लिगमेंत, कनिष्ठिकेच्या स्नायूंचे आरंभ, उथळ आकुंचक स्नायूंचीं तेंदनें, आणि अल्नर व मीडियन मज्जातंतूंचे विभाग, असे आहेत.

उथळ कमानीच्या संबंधाचें कोष्टक.

| पुढें. | | मागें. |
|---|---|---|
| कातडें. | अल्नर धमनी हातांतला भाग | आन्युलर लिगमेंत. |
| पाल्मेरिसब्रेविस. | | करंगळीच्या स्नायूंचे आरंभ. |
| पाल्मरफाशिया. | | उथळ आकुंचक स्नायूंचीं तेंदनें. |
| | | अल्नर व मीडियन मज्जातंतूंचे विभाग. |

ही धमनी प्रकोष्ठांतील खालच्या दोन तृतीयांश भागांत बद्ध केली जाते.

शाखा. १ प्रकोष्ठाच्या. २ मणगटाच्या. ३ हाताच्या.

१ प्रकोष्ठाच्या. १ पुढची अल्नर रिकरंत कोपराच्या खालीं निघून, पुढच्या आंगानें ब्रेकियेलिस अंतैकस व प्रोनेतर रेदियैतीरीज ह्या स्नायूंच्या मधून वर व आंत चढते, आणि खालची प्रोफंदा व अन्यास्तमातिकाम्यामा ह्या ब्रेकियल धमनीच्या शाखांशीं संयोग पावते. २ मागली अल्नर रिकरंत ही फ्लेक्सर सब्लैमिस स्नायूच्या खालून, मागें व आंत जाऊन भुजास्थीच्या आंतल्या कांदैलच्या मागें चढते. मग फ्लेक्सरकार्पैअल्नेरिस ह्याच्या दोहों डोक्यांच्या मधून जाऊन, अनास्तमातिकाम्यामा व इन्तरआसियस रिकरंत ह्यांशीं संयोग पावते. कांहीं शाखा कोपरास जातात. ३ इन्तर आसियस हें अखूड व मोठें कांडें अल्नर पासून रेदियसच्या उंचवट्या जवळ निघतें, मग अस्थींच्या मधील त्वचेकडे मागें जातें, व त्याजपासून पुढची व मागची अशा दोन शाखा निघतात; त्या त्यांच्या नांवा प्रमाणें त्वचेचीं आंगें पोषून, रेदियल व अल्नर ह्यांच्या कार्पल शाखांशीं अग्रसंयोग पावतात, व स्नायूंस त्यांच्या कित्येक शाखा जातात. मागची शाखा अस्थींच्या मधील बंधनाच्या वरच्या छिद्रांतून जाते. पुढची शाखा अस्थींच्या मधील त्वचेच्या पुढच्या आंगानें उतरून प्रोनेतर क्वाद्रेतस स्नायूच्या मागून जाते, आणि मागच्या शाखेशीं व इतरांशीं अग्रसंयोग पावते. मागची शाखा मागच्या देशाच्या स्नायूंच्या दोहों थरांच्या मधून खालीं उतरते, व मणगटाच्या मागें पुढच्या शाखेशीं व मागल्या कार्पल शाखांशीं संयोग पावते. ही धमनी दोन्ही थरांच्या स्नायूंस पोषिते. हिची एक शाखा वरच्या प्रोफंदाशीं संयोग पावते. स्नायूसंबंधी शाखा प्रकोष्ठाच्या अल्नाकडच्या बाजूच्या स्नायूंस वाटल्या जातात.

२ मणगटाच्या शाखा. १ पुढची कार्पल रेदियल हिच्या त्याच शाखेशीं अग्रसंयोग पावते, व तिनें पुढची कार्पल आर्च म्हणजे मणगट संबंधक कमान पूर्ण होते. २ मागली कार्पल रेदियल हिच्या त्याच शाखेशीं अग्रसंयोग पावते, व तिनें मागली कार्पल कमान पूर्ण होते.

३ हाताच्या शाखा. १ खोल अथवा कम्यूनिकेटिंग ही शाखा तळव्या-च्या कमानीच्या आरंभस्थानाजवळ निघते, आणि आब्दक्तर मिनिमैदिजिते. व फ्लेक्सर ब्रीविसमिनिमैदिजिवे ह्यांच्या मध्ये त्यांच्या आरंभ स्थाना जवळ खोल आंत शिरते, आणि रेदियल धमनीच्या शेवटाशीं जुळून तळव्यांतली खोल कमान पूर्ण होते.

२ दिजितल म्हणजे बोटांच्या शाखा चार आहेत, व त्या तळव्याच्य उथळ कमानीच्या गोलबाह्य आंगापासून निघतात. ह्या कनिष्ठिकेची अल्ना कडची.बाजू आणि अनामिका, मध्यमा, व तर्जनी, ह्यांच्या लगतच्या बाजू ह्यांस पोषितात. तर्जनीची रेदियस कडची बाजू व अंगुष्ठ हे रेदियल धमनीनें पोषिले आहेत. दिजितल शाखा दिजितल मज्जातंतूच्या खालीं असतात. शेवटच्या पेऱ्याच्या मध्यावर प्रत्येक बोटाच्या दोन शाखा जुळून कमान होते, त्या कमानीच्या गोलबाह्य अथवा पुढच्या आंगापासून नखा-च्या पोषणार्थ शाखा जातात.

## उतरती एयोर्ता. दिसेंदिंग एयोर्ता.

उतरत्या एयोर्ताचे पिंजराची एयोर्ता, व पोटाची एयोर्ता, असे दोन भाग आहेत.

पिंजराची एयोर्ता धमनी, पाठीच्या तिसऱ्या मणक्याच्या आंगाच्या खाल-च्या कांठा जवळ कण्याच्या डाव्या बाजूस सुरू होऊन, पाठीच्या शेवटच्या मणक्याच्या पुढच्या आंगास दायफ्रम मधल्या एयोर्ताच्या छिद्रा जवळ कण्या-चें वळण घेऊन संपते.

**संबंध—** ही मागलें मीदियस्तैनम् ह्याच्या मागल्या भागांत असून, पुढें हिला वरून खालीं डावी पल्मनरी धमनी, डावी ब्रांकस, पेरिकार्दियम्, व इसाफगस; मागें कणा, व वीनीअजिगास मैनर; उजव्या बाजूस वरतीं इसाफ-गस, वीनीअजिगास मेजर, व थोऱ्यासिकदक्त; डावीकडे, डावें फुप्फुस, प्लूरा व खालीं इसाफगस, ह्या भागांचा संबंध आहे. इसाफगस, ही वर एयोर्ताच्या उजवीकडे, मध्यें पुढें, व खालीं डावीकडे, आहे.

## पिंजराच्या एयोर्ताच्या संबंधाचें कोष्टक.

**पुढें.**

डावी पल्मनरी धमनी.

डावी ब्रांकस.

पेरिकार्दियम्.

इसाफगस.

| **उजवीकडे.** | पिंजराची एयोर्ता. | **डावीकडे.** |
| --- | --- | --- |
| इसाफगस ( वर ). | | डावें फुप्फुस. |
| वीनाअजिगास मेजर. | | इसाफगस ( खालीं ) |
| थोऱ्यासिकदक्त. | | |

**मागें.**

पाठीचा कणा.

वीनाअजिगास मैनर.

**शाखा.** १ ब्रांकियल ह्या फुप्फुसाच्या पोषक धमन्या डाव्या बाजूस दोन आहेत, त्या एयोर्ताच्या पुढच्या आंगापासून व उजवीकडे एक आहे, ती एयोर्ताच्या पहिल्या इन्तर कास्तल धमनी पासून अशा निघतात. मग पुढें ब्रांकस हिच्या मागल्या आंगास जाऊन तिज बरोबर जातात. मग त्यांच्या शाखा व प्रतिशाखा होऊन त्या ब्रांकै, फुप्फुसाची सेल्युलर त्वचा, ब्रांकियल ग्ल्यांद, व इसाफगस, ह्या भागांस पोषितात. २ इन्तर कास्तल धमन्या एयोर्ताच्या मागल्या भागापासून निघतात, आणि उजव्या डाव्यापेक्षां लांब आहेत. ह्या धमन्या प्रत्येक बाजूस दहा दहा आहेत ( फांसळ्यांच्या मधील पहिलें स्थान सबक्लेवियन धमनीच्या वरच्या इन्तर कास्तल शाखेनें पोषिलें आहे ) ह्या फांसळ्यांच्या मधल्या स्थानांत जाऊन त्यांपासून पुढची व मागली अशा शाखा निघतात. पुढल्या शाखेपासून दोन शाखा निघतात, त्यांपैकी मोठी, इन्तर कास्तल स्नायूंच्या मधून जाऊन वरच्या फांसळ्यांच्या खांचण्यांत बसते, व इन्तर कास्तल स्नायूंस पोषून आंतली म्यामरी व आक्सिलरी ह्यांच्या शाखांशीं संयोग पावते; लहान शाखा खालच्या फांसळीच्या वरच्या काठानें जाऊन, मोठी प्रमाणेंच अग्रसंयोग पावते. मागली अथवा पाठीकडची शाखा

पक्षतुल्य भागांच्या मधून मागें जाऊन कण्याचे स्नायु, व कण्याची रज्जु, ह्यांस पोषिते. २ पिंजराच्या एयोर्ताच्या कित्येक शाखा इसाफगस, पेरिकार्दियम, व मीदियस्तैनम, ह्यांस पोषितात.

## पोटाची एयोर्ता. अब्दामिनल एयोर्ता.

ही दायफ्रम मधल्या एयोर्ताच्या छिद्रा पाशीं पाठीच्या शेवटच्या मणक्याच्या आंगाच्या पुढल्या बाजूस सुरू होऊन, कण्याच्या किंचित् डावीकडल्या बाजूनें कमरेच्या चवथ्या मणक्याच्या आंगाच्या डाव्या बाजूस उतरते. ह्याठिकाणीं विभागून तिजपासून दोन कामन इलियाक धमन्या निघतात.

**संबंध**— पुढें हिला धाकटें ओमेंतम्, व पक्काशय ह्यांचें आच्छादन आहे; व ह्या भागांच्या मागल्या आंगास सिलियाक आक्सिस नामक धमनीच्या शाखा व सोलरप्लेक्सस हे भाग असतात; ही खालीं स्प्लेनिक् शीर, प्यांक्रीज, डाव्या मूत्र पिंडाची शीर, दूओदीनम ह्याचा आडवा भाग, मेजेंतरी, आणि एयोर्तिक प्लेक्सस, ह्या भागांनीं आच्छादित होते; मागें ही धमनी कमरेच्या मणक्यां पासून डाव्या लंबर शीरा, रिसेप्ट्याक्युलम कैलै, व थोऱ्यासिकदक्त, ह्या भागांनीं सोडविली आहे. उजवीकडे दायफ्रमचा उजवा स्तंभ, खालची केवा शीर, आजिगास शीर, थोऱ्यासिकदक्त, व उजवा सेमिल्यूनर ग्यांग्लियन, ह्यांचा; आणि डावीकडे सिंपथेतिक मज्जातंतु, व डावा सेमिल्यूनर ग्यांग्लियन, ह्या भागांचा संबंध आहे.

ही धमनी प्रकोष्ठांतील खालच्या दोन तृतीयांश भागांत बद्ध केली जाते.

शाखा. १ प्रकोष्ठाच्या. २ मणगटाच्या. ३ हाताच्या.

१ प्रकोष्ठाच्या. १ पुढची अल्नर रिकरंत कोपराच्या खालीं निघून, पुढच्या आंगानें ब्रेकियेलिस अंतैकस व प्रोनेतर रेदियेतीरीज ह्या स्नायूंच्या मधून वर व आंत चढते, आणि खालची प्रोफंदा व अन्यास्तमातिकाम्याग्ना ह्या ब्रेकियल धमनीच्या शाखांशीं संयोग पावते. २ मागली अल्नर रिकरंत ही फ्लेक्सर सब्लैमिस स्नायूच्या खालून, मागें व आंत जाऊन भुजास्थीच्या आंतल्या कांदेलच्या मागें चढते. मग फ्लेक्सरकार्पैअल्नेरिस ह्याच्या दोहों डोक्यांच्या मधून जाऊन, अनास्तमातिकाम्याग्ना व इन्तरआसियस रिकरंत ह्यांशीं संयोग पावते. कांहीं शाखा कोपरास जातात. ३ इन्तर आसियस हें अखूड व मोठें कांडें अल्नर पासून रेदियसच्या उंचवट्या जवळ निघतें, मग अस्थींच्या मधील त्वचेकडे मागें जातें, व त्याजपासून पुढची व मागची अशा दोन शाखा निघतात; त्या त्यांच्या नांवा प्रमाणें त्वचेचीं आंगें पोषून, रेदियल व अल्नर ह्यांच्या कार्पल शाखांशीं अग्रसंयोग पावतात, व स्नायूंस त्यांच्या कित्येक शाखा जातात. मागची शाखा अस्थींच्या मधील बंधनाच्या वरच्या छिद्रांतून जाते. पुढची शाखा अस्थींच्या मधील त्वचेच्या पुढच्या आंगानें उतरून प्रोनेतर क्काद्रेतस स्नायूच्या मागून जाते, आणि मागच्या शाखेशीं व इतरांशीं अग्रसंयोग पावते. मागची शाखा मागच्या देशाच्या स्नायूंच्या दोहों थरांच्या मधून खालीं उतरते, व मणगटाच्या मागें पुढच्या शाखेशीं व मागल्या कार्पल शाखांशीं संयोग पावते. ही धमनी दोन्ही थरांच्या स्नायूंस पोषिते. हिची एक शाखा वरच्या प्रोफंदाशीं संयोग पावते. स्नायूसंबंधी शाखा प्रकोष्ठाच्या अल्नाकडच्या बाजूच्या स्नायूंस वाटल्या जातात.

२ मणगटाच्या शाखा. १ पुढची कार्पल रेदियल हिच्या त्याच शाखेशीं अग्रसंयोग पावते, व तिनें पुढची कार्पल आर्च म्हणजे मणगट संबंधिक कमान पूर्ण होते. २ मागली कार्पल रेदियल हिच्या त्याच शाखेशीं अग्रसंयोग पावते, व तिनें मागली कार्पल कमान पूर्ण होते.

३ हाताच्या शाखा. १ खोल अथवा कम्यूनिकेटिंग ही शाखा तळव्याच्या कमानीच्या आरंभस्थानाजवळ निघते, आणि आब्दक्तर मिनिमैदिजिते. व फ्लेक्सर ब्रीविसमिनिमैदिजिवै ह्यांच्या मध्ये त्यांच्या आरंभ स्थाना जवळ खोल आंत शिरते, आणि रेदियल धमनीच्या शेवटाशीं जुळून तळव्यांतली खोल कमान पूर्ण होते.

२ दिजितल म्हणजे बोटांच्या शाखा चार आहेत, व त्या तळव्याच्य उथळ कमानीच्या गोलबाह्य आंगापासून निघतात. ह्या कनिष्ठिकेची अल्ना कडची बाजू आणि अनामिका, मध्यमा, व तर्जनी, ह्यांच्या लगतच्या बाजू ह्यांस पोषितात. तर्जनीची रेदियस कडची बाजू व अंगुष्ठ हे रेदियल धमनीनें पोषिले आहेत. दिजितल शाखा दिजितल मज्जातंतूच्या खालीं असतात. शेवटच्या पेऱ्याच्या मध्यावर प्रत्येक बोटाच्या दोन शाखा जुळून कमान होते, त्या कमानीच्या गोलबाह्य अथवा पुढच्या आंगापासून नखाच्या पोषणार्थ शाखा जातात.

## उतरती एयोर्ता. दिसेंदिंग एयोर्ता.

उतरत्या एयोर्ताचे पिंजराची एयोर्ता, व पोटाची एयोर्ता, असे दोन भाग आहेत.

पिंजराची एयोर्ता धमनी, पाठीच्या तिसऱ्या मणक्याच्या आंगाच्या खालच्या कांठा जवळ कण्याच्या डाव्या बाजूस सुरू होऊन, पाठीच्या शेवटच्या मणक्याच्या पुढच्या आंगास दायफ्रम मधल्या एयोर्ताच्या छिद्रा जवळ कण्याचें वळण घेऊन संपते.

**संबंध**– ही मागलें मीदियस्तैनम् ह्याच्या मागल्या भागांत असून, पुढें हिला वरून खालीं डावी पल्मनरी धमनी, डावी ब्रांकस, पेरिकार्दियम्, व इसाफगस; मागें कणा, व वीनोअजिगास मैनर; उजव्या बाजूस वरतीं इसाफगस, वीनीअजिगास मेजर, व थोऱ्यासिकदक्त; डावीकडे, डावें फुप्फुस, प्लूरा व खालीं इसाफगस, ह्या भागांचा संबंध आहे. इसाफगस, ही वर एयोर्ताच्या उजवीकडे, मध्यें पुढें, व खालीं डावीकडे, आहे.

## पिंजराच्या एयोर्तोच्या संबंधाचें कोष्टक.

**पुढें.**

डावी पल्मनरी धमनी.

डावी ब्रांकस.

पेरिकार्दियम्.

इसाफगस.

| उजवीकडे. | पिंजराची एयोर्ता | डावीकडे. |
|---|---|---|
| इसाफगस ( वर ). | | |
| वीनाअजिगास मेजर. | | फुप्फुस. |
| थोर्‍यासिकदक्त. | | इसाफगस ( खालीं ). |

**मागें.**

पाठीचा कणा.

वीनाअजिगास मैनर.

**शाखा.** १ ब्रांकियल ह्या फुप्फुसाच्या पोषक धमन्या डाव्या बाजूस दोन आहेत, त्या एयोर्ताच्या पुढच्या आंगापासून व उजवीकडे एक आहे, ती एयोर्ताच्या पहिल्या इन्तर कास्तल धमनी पासून अशा निघतात. मग पुढें ब्रांकस हिच्या मागल्या आंगास जाऊन तिज बरोबर जातात. मग त्यांच्या शाखा व प्रतिशाखा होऊन त्या ब्रांके, फुप्फुसाची सेल्युलर त्वचा, ब्रांकियल ग्ल्यांद, व इसाफगस, ह्या भागांस पोषितात. २ इन्तर कास्तल धमन्या एयोर्ताच्या मागल्या भागापासून निघतात, आणि उजव्या डाव्यापेक्षां लांब आहेत. ह्या धमन्या प्रत्येक बाजूस दहा दहा आहेत ( फांसळ्यांच्या मधील पहिलें स्थान सबक्लेवियन धमनीच्या वरच्या इन्तर कास्तल शाखेनें पोषिलें आहे ) ह्या फांसळ्यांच्या मधल्या स्थानांत जाऊन त्यांपासून पुढची व मागली अशा शाखा निघतात. पुढल्या शाखेपासून दोन शाखा निघतात, त्यांपैकीं मोठी, इन्तर कास्तल स्नायूंच्या मधून जाऊन वरच्या फांसळ्यांच्या खांचण्यांत बसते, व इन्तर कास्तल स्नायूंस पोषून आंतली म्यामरी व आक्सिलरी ह्यांच्या शाखांशीं संयोग पावते; लहान शाखा खालच्या फांसळीच्या वरच्या काठानें जाऊन, मोठी प्रमाणेंच अग्रसंयोग पावते. मागली अथवा पाठीकडची शाखा

पक्षतुल्य भागांच्या मधून मागें जाऊन कण्याचे स्नायु, व कण्याची रज्जु, ह्यांस पोषिते. ३ पिंजराच्या एयोर्ताच्या कित्येक शाखा इसाफगस, पेरिकार्दियम, व मीदियस्तैनम, ह्यांस पोषितात.

## पोटाची एयोर्ता. अब्दामिनल एयोर्ता.

ही दायफ्रम मधल्या एयोर्ताच्या छिद्रा पाशीं पाठीच्या शेवटच्या मणक्याच्या आंगाच्या पुढल्या बाजूस सुरू होऊन, कण्याच्या किंचित् डावीकडल्या बाजूनें कमरेच्या चवथ्या मणक्याच्या आंगाच्या डाव्या बाजूस उतरते. ह्याठिकाणीं विभागून तिजपासून दोन कामन इलियाक धमन्या निघतात.

**संबंध**– पुढें हिला धाकटें ओमेंतम्, व पक्वाशय ह्यांचें आच्छादन आहे; व ह्या भागांच्या मागल्या आंगास सिलियाक आक्सिस नामक धमनीच्या शाखा व सोलरप्लेक्सस हे भाग असतात; ही खालीं स्प्लेनिकूशीर, प्यांक्रीज, डाव्या मूत्र पिंडाची शीर, दूओदीनम ह्याचा आडवा भाग, मेजेंतरी, आणि एयोर्तिक प्लेक्सस, ह्या भागांनीं आच्छादित होते; मागें ही धमनी कमरेच्या मणक्यां पासून डाव्या लंबर शीरा, रिसेप्त्याक्युलम कैलै, व थोऱ्यासिकदक्त, ह्या भागांनीं सोडविली आहे. उजवीकडे दायफ्रमचा उजवा स्तंभ, खालची केवा शीर, आजिगास शीर, थोऱ्यासिकदक्त, व उजवा सेमिल्यूनर ग्यांग्लियन, ह्यांचा; आणि डावीकडे सिपथेतिक मज्जातंतु, व डावा सेमिल्यूनर ग्यांग्लियन, ह्या भागांचा संबंध आहे.

**पोटाच्या एयोर्टाच्या संबंधाचें कोष्टक.**

**पुढें.**

धाकटें ओमेंतम् व पक्वाशय. | डावी रिनलशीर.
सिलियाक आक्सिस व | दुओदीनमच्या आडवा भाग.
त्यांच्या शाखा. | मेजेंतरी.
स्प्लेनिक् शीर. | एयोर्तिक प्लेक्सस.
प्यांक्रीज.

**उजवीकडे.** | | **डावीकडे.**
---|---|---
दायफ्रमचा उजवा स्तंभ. | पोटाची. | सिंपथेतिक मज्जातंतु.
खालची वीनाकेवाशीर. | एयोर्ता. | डावा सेमिल्यूनर ग्यांग्लियन.
वीनाआजिगास. | |
थोऱ्यासिकदक्त. | |
उजवा सेमिल्यूनर ग्यांग्लियन. | |

**मागें.**

डाव्या लंबर शिरा.
रेसेप्त्याक्युलम् केलि.
थोऱ्यासिकदक्त.
पाठीचा कणा.

पोटांतील एयोर्ताच्या शाखा दोन प्रकारच्या आहेत. १ पोटाच्या अवयवांस वाटलेल्या २ पोटाच्या भिंतीस वाटलेल्या.

## अवयवांस वाटलेल्या.

पचनेंद्रियांस पोषणाऱ्या.
- सिलियाक आक्सिस ...
  - ग्यास्त्रिक् .. पक्वाशयाची.
  - हिप्यातिक .. काळजाची.
  - स्प्लेनिक् .... प्लीहाची.
- वरची मेजेंतेरिक.
- खालची मेजेंतेरिक.

सुप्रारीनल ग्लांड ह्यांच्या .. सुप्रारीनल.
मूत्रपिंडाच्या .. .. .. .. .. .. .. रीनल.
अंडाच्या .. .. .. .. .. .. .. .. स्पर्म्याटिक.

## पोटाची एयोर्ता व इलियाक् धमन्या.




१ पोटाची एयोर्ता. २ फ्रेनिक् धमनी. ३ सिलियाक् आक्सिस विभागून तीन शाखा होतात. ४ सुप्रारीनल्. ५ वरची मेजेंतेरिक्. ६ रीनल्. ७ स्पर्मातिक्. ८ खालची मेजेंतेरिक्, लंबर धमन्या एयोर्तीच्या प्रत्येक बाजूस जातांना दिसत आहेत. ९ सेक्रा मीदिया. १० कामन् इलियाक् धमनी. ११ आंतली इलियाक् धमनी. १२ बाहेरली इलियाक् धमनी. १३ सर्कंफ्लेक्स इलियै. १४ खोल एपिग्यास्त्रिक्. अ. खालची वीना केवा. ब. सुप्रारीनल क्याप् स्यूल. क. मूत्र पिंड. ड. मूत्र वाहिनी, छेदिलेली. ई. क्वाड्रेतस लम्बोरम् स्नायु. फ. सो अस म्याग्नस् स्नायु.

## पोटाच्या भिंतीस वांटलेल्या.

**फ्रेनिक्.** लंबर. **सेक्रामीडिया**

**सिलियाक आक्सिस.**

हें अखूड व जाड कांडें सुमारें अर्ध इंच लांब आहे, व हें दायफ्रमच्या कांठां समोर निघून पुढें गेल्यावर, ह्या पासून ग्यास्त्रिक्, हिप्यातिक, व स्प्लेनिक्, ह्या शाखा निघतात.

**ग्यास्त्रिक** म्हणजे पक्वाशयाची धमनी, ही तिहींत लहान आहे. ही ओमेंतमच्या दोहों थरांच्या मधून वर व डावीकडे पक्वा शयाच्या कार्दियाक छिद्राकडे जाते. मग धाकट्या वाकणानें डावी कडून उजवीकडे पैलोरस जवळ येऊन, हिप्यातिक शाखेच्या पैलोरिक शाखेशीं अग्रसंयोग पावते. ही पक्वाशय व इसाफगस ह्यांस पोषून, इसाफजीयल धमनी व स्प्लेनिक् धमनीच्या शाखा ह्यां बरोबर संयोग पावते.

**हिप्यातिक** म्हणजे काळजाची धमनी, पुढें वळण घेऊन धाकट्या ओमेंतमच्या दोहों थरांमधून काळजापर्यंत वर व उजवीकडे जाते. मग तिजपासून दोन शाखा निघतात, त्या त्याच्या आडव्या चिरेंत शिरून पोर्तल नळांत त्याच्या उजव्या व डाव्या गड्यांस वांटल्या जातात. ह्या धमनीस दक्तस कम्यूनिस कोलिदकस म्हणजे सामान्य पित्तवाहिनी व पोर्तल शीर ह्यांचा संबंध आहे, त्यांत पित्तवाहिनी उजवीकडे, धमनी डावीकडे, आणि पोर्तल शीर दोहोंच्या मागें, असे आहेत.

**शाखा**— पैलोरिक शाखा पक्वाशयाच्या पैलोरिक शेवटावर उतरते, मग लहान वांकणानें उजवी कडून डावीकडे जाऊन, ग्यास्त्रिक् धमनीशीं संयोग पावते. २ ग्यास्त्रोदूओदिनोलिस ही अखूड शाखा पैलोरसच्या मागें उतरून, विभागून तिच्या दोन शाखा होतात. १ ग्यास्त्रोएपिप्लैकादेक्स्त्रा ही मोठ्या ओमेंतमच्या दोहों थरांच्यामधून मोठ्या वांकणानें उजवी कडून डावीकडे जाते, व मध्यावर स्प्लेनिक धमनीच्या ग्यास्त्रोएपिप्लैका सिनिस्त्राशीं जुळते. २ प्यांक्रियातिको दूओदीनल ही प्यांक्रीज, व दूओदीनम, ह्यांस पोषिते. ही ह्या दोहों इंद्रियांच्या मधून खालीं उतरते, व खालच्या प्यांक्रियातिको दूओदी-

नलशीं संयोग पावते. सिस्तिक ही पित्ताशयास पोषिते, व हिप्यातिक शाखे पासून निघते.

स्प्लेनिक ही सिलियाक आक्सिस हिच्या सर्व शाखांपेक्षां मोठी, व गती विषयीं अगदीं नागमोड आहे. ही स्प्लेनिक शिरे सहवर्तमान क्षितिजाशीं समांतर प्यांक्रीजच्या वरच्या कांठाच्या मागून डाव्या बाजूस जाऊन, प्लीहा जवळ विभागून हिच्या शाखा होतात, त्यांतून कित्येक हैलस मध्यें म्हणजे त्या इंद्रियाच्या चिरेमध्यें शिरून, त्याच्या रचनेवर वाटल्या जातात. दुसऱ्या शाखा पक्वाशयाच्या मोठ्या शेंडयावर वांटल्या जातात, आणि प्यांक्रियातिक शाखा प्यांक्रीज ह्यावर वांटल्या जातात, व त्यां पैकीं एक ह्या इंद्रियाच्या वाहिनी सहवर्तमान जाते, तीस प्यांक्रियातिका म्याग्ना म्हणतात.

शाखा— १ ग्यास्त्रिक् शाखा, पक्वाशयास पोषितात. २ डावी ग्यास्त्रो एपिप्लैका, ही पक्वाशयाच्या मोठ्या वांकणानें डावी कडून उजवीकडे येऊन, हिप्यातिक धमनीच्या उजव्या ग्यास्त्रोएपिप्लैक शाखेशीं जुळते.

## वरची मेजेंतेरिक धमनी.

ही सिलियाक आक्सिस पासून चार लैन खालीं निघून, प्यांक्रीज व दूओदीनम् ह्याचा आडवा भाग, ह्यांच्या मधून पुढें जाऊन, उजव्या इलियाक खांचेंत उतरून कमान होते. ह्या कमानीचें गोलबाह्य आंग डावीकडे, पुढें, व खालीं, झुकलें आहे, आणि गोलांतरता उजवीकडे, मागें, व वर, झुकली आहे. ह्या धमनीच्या संगतीस वरची मेजेंतेरिक शीर असते.

शाखा.— १ खालची प्यांक्रियातिको दूओदीनल, प्यांक्रीज व दूओदीनम् ह्यांस पोषून, हिप्यातिकच्या वरच्या प्यांक्रियातिको दूओदीनल शाखेशीं जुळते. २ व्याजा इन्तेस्तैना तिन्युइस ह्या १२ पासून १५ असतात, व धमनीच्या गोलबाह्य आंगा पासून निघून जजूनम व इलियम ह्यांस पोषितात, व त्यांचा संयोग होऊन ओळींनच कमानी होतात, त्यांच्या तीन पासून चार ओळी असतात, आणि त्यां पासून शाखा निघून अंतडयास वाटल्या जातात. ३ इलियोकालिक, ही वरच्या मेजेंतेरिक धमनीच्या गोलांतर आंगा पासून निघते. व ती विभागून तिच्या दोन शाखा होतात. त्यां पैकीं एक खालीं जाऊन वर सांगितलेल्या शाखांतून शेवटलीशीं जुळते, व दुसरी वर जाऊन

उजव्या कालिक शाखेशीं जुळते, अशा ह्या शाखांच्या दोन कमानी होतात. त्यांपासून निघणाऱ्या शाखा इलियम, सीकम, व त्याचा अपेंदिक्स, इलियोसीकल व इलियोकालिक हे पडदे, इतक्या भागांस पोषितात. ४ उजवी कालिक शाखा वरचीच्या वरतीं निघून, उजव्या बाजूस जाऊन विभागली जाते. हिच्या वरच्या शाखा मधल्या कालिकशीं व खालच्या इलियोकालिक ह्यांशीं जुळून कमानी होतात, त्यांपासून शाखा जाऊन चढत्या कोलनास पोषितात. ५ मधली कालिक वरलीच्या वर निघते, व विभागून दोन शाखा होतात, त्यांपैकीं एक उजव्या कालिकशीं, व दुसरी खालच्या मेजेंतरिक धमनीच्या डाव्या कालिकशीं अशा जुळतात. ह्या संयोगानें झालेल्या कमानीपासून आडव्या कोलनास शाखा जातात.

## खालची मेजेंतरिक धमनी.

ही वरची मेजेंतरिक हिच्या खालीं एयोर्ताच्या डाव्या बाजूपासून निघून, डाव्या इलियाक खांचेंत खालीं जाते, व वरची हेमरैदल् ह्या नांवानें पेल्विसमध्यें उतरते. पोटाची एयोर्ता संपते, त्या ठिकाणापासून दोन इंच वरतीं ही धमनी निघते.

शाखा— १ डावी कालिक् शाखा डावीकडे जाते, व तिजपासून एक चढती शाखा निघते, ती मधल्या कालिक् शाखेशीं अग्रसंयोग पावते, व एक उतरती शाखा निघते, ती सिग्मैद धमनीशीं अग्रसंयोग पावते, ह्या योगानें झालेल्या कमानीपासून उतरत्या कोलनास पोषणाऱ्या शाखा जातात. २ सिग्मैद धमन्या सिग्मैद् फ्लेक्सर ह्याला पोषण्यास खालीं उतरतात, आणि वर सांगितलेल्या शाखेशीं व वरच्या हेमरैदल धमनीशीं संयोग पावतात. सिग्मैद धमन्या कधींकधीं एक व कधींकधीं दोन पासून चार असतात. ३ वरची हेमरैदल ही रेक्तमला पोषून, आंतली इलियाक व आंतली प्युदिक् ह्या धमन्यांच्या शाखांशीं संयोग पावते. ही धमनी रेक्तमच्या मागल्या अंगानें उतरते, व शेवटीं हिच्या दोन शाखा होतात. ही डावी कामन इलियाक धमनी व शीर, आणि युरेतर, ह्यांच्या पुढून जाते.

सुप्रारीनल धमन्या एयोर्तापासून निघून, सुप्रारीनल कपाप्स्यूलास पोष-

ह्यास प्रत्येक बाजूस वर व बाहेर जातात, आणि सुप्रारीनल क्यापस्युल ह्याच्या खालीं आल्यावर ह्यांपासून शेवटील शाखा निघतात.

**रीनल** ह्या धमन्या बाहेरल्या आंगास मूत्रपिंडाकडे वळून विभागून त्यांच्या चार पासून पांच शाखा होतात, ह्या त्याच इंद्रियाच्या चिरे मधून त्याच्या द्रव्यांत शिरून त्यास पोषितात. उजवी कडची धमनी डावीपेक्षां लांब आहे. प्रत्येकीचा झोक क्षितिजसमांतर बाहेर असतो.

**स्पर्म्यातिक्** ह्या दोन लहान, लांब, व पातळ धमन्या, एयोर्ताच्या पुढल्या आंगा पासून रीनल धमन्याच्या खालीं निघून, अंडाच्या रज्जूसहवर्तमान पोटाच्या अंगठी सारख्या छिद्रामधून पुरुषाच्या शरीरांत अंडास जाऊन, त्यांचें पोषण करतात. स्त्रियांत त्या पोटाच्या बाहेर न पडतां त्यांचे अंडाशय,फेलोपियन नळ्या, व गर्भाशय, ह्या भागांस पोषितात. ह्या धमन्या तिरप्या खालीं व बाहेर पेरितनियमच्या मागून व युरेतरच्या पुढून जातात, आणि सोअसम्याग्नस स्नायूवर टेकतात. उजवी, खालच्या वीना केवाच्या पुढें, व डावी सिग्मॆदफ्लेक्सरच्या मागें असते. पेल्विसच्या काठा जवळ आल्यावर त्या बाहेरील इलियाक धमनीच्या पुढून जाऊन, व्यक्तिभेदानुरोधें वाटल्या जातात.

**फ्रेनिक् धमन्या** एयोर्ताच्या पुढच्या आंगा पासून निघून, त्यांच्या शाखा दैफ्रमच्या खालच्या आंगास जाऊन त्यास पोषितात, व आंतली म्यामरी, व पोटाच्या दुसऱ्या धमन्या, ह्यांच्या शाखांशीं संयोग पावतात.

**लंबर धमन्या** चार आहेत, त्या एयोर्ताच्या मागल्या आंगा पासून निघून, मणक्यांच्या पक्षतुल्य भागांच्या मधील जाग्यांत बाहेर जातात, आणि तेथें त्यांचे पोटाचा व पाठीचा असे दोन भाग होतात. पाठी कडची शाखा पाठीचें कातडें पोषून, इन्तर कास्तल धमन्यांच्या पाठीकडे गेलेल्या शाखांशीं जुळते, व आरंभीं एक कण्यासंबंधी शाखा निघते, ती कण्याच्या नळांत शिरून तेथील भाग पोषून, दुसऱ्या शाखेशीं संयोग पावते. पोटाकडची शाखा क्वाद्रेतस लंबोरम् स्नायूच्या मागून, पोटाच्या स्नायू मध्यें शिरून, दुसऱ्या धमन्यांशीं संयोग पावते.

**मधली सेक्रल् धमनी** एयोर्ताच्या मागल्या आंगास तिच्या दुभागण्या

च्या स्थानालगत निघून, सेक्रमच्या पुढल्या भागानें काक्सिक्सच्या वरच्या भागा पर्यंत जाते; व रेक्तमला पोषिते. कांहीं शाखा पुढील सेक्रल छिद्रांमधून मागें जातात. ह्या धमनीच्या शाखांचा ल्यातरल सेक्रल धमन्यांशीं संयोग होतो.

## कामन इलियाक धमन्या.

कामन इलियाक ह्या दोन धमन्या सुमारें दोन इंच लांब आहेत. ह्या कमरेच्या चवथ्या मणक्याच्या डाव्या बाजूस एयोर्ताच्या दुभागा पासून, खालीं व बाहेर कमरेचा शेवटचा मणका व सेक्रम ह्यांच्या मधील पदार्था पर्यंत जातात, व तेथें त्यांपासून आतली, व बाहेरली, अशा दोन इलियाक धमन्या निघतात. पहिली पेल्विसमधले अवयव, व त्याच्या भिंती, ह्यांनां पोषिते, आणि दुसरी अध' शाखेस पोषिते.

**उजवी कामन इलियाक** पुढें पेरितोनियम व आंतडीं ह्यांनीं आच्छादिली आहे, व हिजवरून मूत्रवाहिनी जाते; मागें ही कमरेच्या मणक्यां पासून दोन्ही कामन इलियाक शिरांनी सोडविली आहे. हिच्या उजव्या बाजूस अथवा बाहेरल्या अंगास वरतीं उजवी कामन इलियाक शीर व खालची वीनाकेवा शीर, व खालीं सोअस स्नायु, ह्या भागाचा संबंध आहे

**डावी कामन इलियाक** धमनी पुढें पेरितोनियम, रेक्तम, व वरची हेमरैदल धमनी, ह्यानी आच्छादिली असून, हिच्या दुभागण्याच्या ठिकाणीं मूत्रवाहिनी हिजवरून जाते. बाहेरच्या बाजूस हिला सोअस म्यागस स्नायूचा संबंध आहे. डावी इलियाक शीर धमनीच्या काहीं भागास आंत, व काहीं भागास खालीं असते.

## आंतली इलियाक धमनी.

आंतली इलियाक धमनी पेल्विसच्या भिंती, त्यांतले अवयव, प्रजोत्पत्तीचीं इंद्रियें, व मांडीची आतली बाजू, ह्या भागांस पोषिते. ही सुमारें दीड इंच लांब आहे, व कामन इलियाक धमनीच्या दुभागापासून मोठ्या सेक्रोसायातिक छिद्राच्या वरच्या कांठापर्यंत खालीं जाऊन, विभागून हिचीं पुढचें व मागचें अशीं दोन कांडीं होतात; आणि काहीं अंशीं बंद पडलेली हैपोग्यास्त्रिक धमनी हिच्या शेंड्यापासून मूत्राशयाच्या शेंड्यापर्यंत जाते. ह्या शेवट

च्या भागापासून नाभीपर्यंतही हिला हैपोग्यास्त्रिक् धमनी म्हणतात, व हींतून अभिसरण अगदीं बंद असतें. हा भाग नाळेच्या पाठी मागचा होय, आणि गर्भावस्थेंत वारेवर वांटल्या जाणाऱ्या धमनीचा प्रौढावस्थेंत हा शेष होय. पोटाच्या बाहेर पडल्यावर ह्या धमनीस अंबलैकल धमनी म्हणतात.

**संबंध**. पुढें मूत्रवाहिनी व पेरितोनियम; मागें आंतली इलियाक शीर, लंबोसेक्रल मज्जातंतु, व पीरिफार्मिस स्नायु; आणि बाहेरल्या बाजूस सोअस म्याग्नस स्नायु; ह्यांचा संबंध आहे.

आंतल्या इलियाक धमनीच्या संबंधाचें कोष्टक.

**पुढें.**
पेरितोनियम.
युरेतर.

**बाहेर.**
सोअस म्याग्नस स्नायु.

आंतली इलियाक धमनी.

**मागें.**
आंतली इलियाक शीर.
लंबोसेक्रल मज्जातंतु.
पीरिफार्मिस स्नायु.

**पुढच्या भागाच्या शाखा.** १ **वरची व्हिसैकल** धमनी वासदेफरन्स व मूत्रवाहिनी ह्यांना पोषिते. २ **मधली व्हिसैकल्** धमनी व वेसिक्युली सेमिनेलिस ह्यांना पोषिते. ३ **खालची व्हिसैकल** धमनी प्रोस्तेत ग्ल्याद व वेसिक्युली सेमिनेलिस ह्यांना पोषिते. ४ **मधली हेमरॅदल** रेक्तमला पोषिते. ५ **युतरैन** गर्भाशयाला पोषिते. ६ **वेजैनल** योनीस पोषिते. ७ **आब्त्युरेतर धमनी** सामान्यतः आंतल्या इलियाकच्या पुढच्या विभागा पासून निघते, परंतु अनेक वेळीं ही मागच्या विभागा पासून ही निघते. मग पुढें जाऊन, आब्त्युरेतर छिद्राच्या वरच्या कांठास जी खाचणी आहे, तींतून पेल्विसच्या बाहेर पडते, आणि आंतली व बाहेरची अशा दोन शाखा हिजपासून निघतात,

त्या आब्‍ट्युरेतर छिद्रास वेढा घालून परस्परांशी, व आंतल्या सर्कंफ्लेक्स ध- मनीच्या शाखांशीं संयोग पावतात. ह्यांपासून मांडीच्या स्नायूंस व खुब्या- स शाखा जातात. पेल्विस मध्यें असतां हिजपासून स्नायूंस व मूत्राशयास शाखा जातात. आब्ट्यूरेतर धमनी कधींकधीं एपिग्यास्त्रिक् धमनी पासून व कधींकधीं बाहेरील इलियाक पासून निघते. एपिग्यास्त्रिक् पासून नि- घाली असतां, ही आब्ट्यूरेतर छिद्राकडे नीट खालीं उतरते, व सामान्यतः फेमरल् रिंगच्या बाहेरल्या आंगास असते, अशा प्रसंगी मांडीचा अतंर्गळ ब- रा करण्यास शस्त्र उपाय केला असतां ही तुटणार नाहीं. परंतु कधीकधीं ही गिंबर्नातच्या लिगमेंतच्या मोकळ्या कांठानें आंत वळून अंतर्गळाच्या वेष्टना- च्या (स्याकच्या) मानेस वेढा घालते; असें झाल्यास शस्त्रउपायांत ती निः- संशय तुटते. ८ आंतली प्यूदिक् धमनी आंतल्या इलियाक धमनीच्या शेवटी- ल दोन शाखां पैकी लहान होय. ही पेरिफार्मिस स्नायूवरून मोठ्या से- क्रोसायातिक छिद्राच्या खालच्या कांठाकडे खालीं व बाहेर वळून, पेरिफार्मिस व काक्सिजियस ह्या स्नायूंच्या मधून बाहेर पडते, आणि इस्कियमच्या कंट- कतुल्य भागा वरून धाकट्या सेक्रोसायातिक छिद्रांतून पुनः पेल्विस मध्यें शिरते. नंतर ही इन्तरनल अब्ट्युरेतर स्नायू वरून इस्कियमच्या रेमसच्या आंतल्या आंगानें पुढें व वर जाऊन, पेरिनियमच्या खोल फाशियाचा माग- ला थर विंधून प्यूबिसच्या रेमसच्या आंतल्या कांठानें जाऊन, शेवटीं पेरि नियमच्या खोल फाशियाचा पुढला थर विंधिते, आणि शिश्नाच्या पाठीची व कार्पस क्यावर्नोजम ह्याची अशा शेवटच्या दोन शाखा निघाल्यावर संपते

शाखा. १ बाहेरच्या हेमरॅदल आंत शिरून इस्कियोरेक्तल खांचेंतल्या. स्नायूंस व कातड्यास पोषितात. २ उथळ पेरिनियल शाखा, वृषण व पे- रिनियमचे स्नायु ह्यांस पोषिते. ३ आडवी पेरिनियल (त्रान्स्वर्सस पेरिनिऐ) आंत वळून त्याच नांवाच्या स्नायूस पोषिते. ४ बल्बची शाखा आंत जाऊ- न युरिथ्राच्या बल्बास पोषिते. ५ शेवटच्या शाखा शिश्न व कार्पस क्याव- र्नोजम, ह्यांस पोषितात. स्त्रियांमध्यें त्या गर्भाशय, योनि, व उपस्थ, ह्यांस पोषितात.

सायातिक ही आंतल्या इलियाक धमनीच्या शाखां पैकीं मोठी धमनी

मोठ्या सेक्रोसायातिक छिद्रांतून पेरिफार्मिस स्नायूच्या खालून पेल्विसच्या बाहेर पडते; ग्लूतियसम्याक्सिमस स्नायूच्या आच्छादना खालीं सायातिक मज्जातंतु सहवर्तमान मोटा त्रोक्यातर, व इस्कियमचा उंचवटा, ह्यांच्या मध्यें उतरते; आणि तिच्या शाखा मांडीच्या खुब्याच्या मागल्या बाजूच्या खोल स्नायूंस जातात. कांहीं लहान शाखा खुब्याच्या क्याप्स्युलर बंधनास ही जातात.

**ग्लूतियल धमनी** आंतल्या इलियाक धमनीच्या सर्व शाखांहून थोर आहे, व ही तिच्या मागल्या कांड्याचा चालू भाग आहे. ही मोठ्या सेक्रोसायातिक छिद्राच्या वरच्या भागाकडे खालीं जाऊन, पेरिफार्मिस स्नायूच्या कांठा वरून पेल्विसच्या बाहेर पडते, व ही विभागून हिज पासून दोन शाखा निघतात, त्या ग्लूतिऐ स्नायूंस पोषितात. पेल्विसमध्यें ही शेजारच्या स्नायूंस पोषिते. शेवटीं ही मांडीचा खुबा पोषून, बाहेरल्या सर्कंफ्लेक्स धमनीशीं अग्रसंयोग पावते.

**इलियोलंबर धमनी** सोअस स्नायूच्या खालीं इलियाक खाचेच्या वरल्या भागापर्यंत चढते; व हिजपासून इलियाक, व लंबर, ह्या शाखा निघतात; त्या पोट, इलियाक, व ग्लूतियल देशाचे स्नायु, व इलियम अस्थि, ह्यांस पोषून, ग्लूतियल धमनी व बाहेरच्या इलियाक धमनीच्या शाखा, ह्यांशीं अग्रसंयोग पावतात.

**ल्यातरल सेक्रल** ह्या प्रत्येक बाजूस दोन आहेत, पैकीं वरची पुढच्या सेक्रल छिद्रांतून सेक्रमच्या नळांत शिरून, त्यांतले भाग पोषून मागल्या सेक्रल छिद्रांतून बाहेर पडून, सेक्रमच्या मागले भाग पोषिते. खालची ल्यातरल सेक्रल धमनी सेक्रम व काक्सिक्स ह्यांच्या पुढच्या भागावरून मागें जाते, व काक्सिक्सला आच्छादणाऱ्या भागास हिच्या शाखा जातात.

## बाहेरची इलियाक धमनी.

ही अधःशाखेस पोषणारी मुख्य धमनी, प्रौढावस्थेत आंतल्या इलियाक धमनी पेक्षां मोठी असते, व सोअस स्नायूच्या आंतल्या कांठानें कामन इलियाक धमनीच्या दुभागण्याच्या स्थानापासून तिरकस खालीं व बाहेर पूपार्टच्या लिगमेंतपर्यंत जाते. एथें मांडीत शिरून फेमरल हें नांव पावते. नाभी

पासून इलियमचा पुढचावरचा कंटकतुल्य भाग व सिंफिसिस प्यूबिस ह्यांच्या मधोमध रेषा ओढली तर, ह्या धमनीची गति दाखविली जाईल.

**संबंध**— पुढें पोरितोनियम, इलियाक फाशिया, व आंतडीं आहेत; व आरंभीं हिजवरून कधीं कधीं मूत्रवाहिनी जाते, पूपार्तच्या लिगमेंतजवळ जेनितोक्रूरल मज्जातंतूची शाखा व सर्कंफ्लेक्स इलियैक्शीर वरून जाते; व कांहीं अंतर पावेतों स्पर्म्यातिक वाहिन्या हिजवर टेंकतात. वासदेफरन्स हिच्या आंतल्या आंगानें खालीं वळते. मागें वाहेरची इलियाक शीर आहे, ती फेमरल कमानी जवळ धमनीच्या आंतल्या आंगास येते, व डावी कडच्या धमनीच्या संपूर्ण भागास आंतल्या आंगास असते. वाहेरच्या आंगास धमनी सोअस स्नायूवर टेंकते, व त्या पासून इलियाक फाशियानें सोडविली आहे. पूपार्तच्या लिगमेंतजवळ ती इलियाक स्नायूवर टेंकते. आंत व पुढें तिला लिम्फ्यातिक ग्ल्यांद व लिम्फ्यातिक वाहिन्या ह्यांची मर्यादा आहे.

वाहेरील इलियाक धमनीच्या संबंधाचें कोष्टक.

**पुढें.**

पोरितोनियम, आंतडीं, व इलियाक फाशिया.

| | |
|---|---|
| पूपार्तच्या लिगमेंत जवळ. | स्पर्म्यातिक रक्तवाहिन्या. |
| | जेनितोक्रूरल मज्जातंतु. |
| | सर्कंफ्लेक्स इलियै शीर. |
| | लिम्फ्यातिक वाहिन्या व लिम्फ्यातिक ग्ल्यांद. |

| **वाहेर.** | | **आंत.** |
|---|---|---|
| सोअसम्याग्नस. इलियाक फाशिया. | वाहेरील इलियाक धमनी. | वाहेरील इलियाक शीर व व्यासदेफरन्स. (पूपार्तच्या लिगमेंत जवळ) |

**मागें.**

वाहेरील इलियाक शीर.

खालच्या व वरच्या दोंवटांस मोठया रक्तवाहिन्यांचा संबंध असल्यामुळें, ते शेवट सोडून ही धमनी वाकीच्या कोणत्याही ठिकाणीं बंद करतां येते.

**शाखा.** स्नायु व ग्ल्यांद ह्यांस गेलेल्या कित्येक शाखाखेरीज, ह्या धमनी पासून आणखी दोन शाखा निघतात. १ एपिग्यास्त्रिक् धमनी बाहेरील इलियाक धमनीच्या पुढच्या आंगानें पूपार्तच्या लिगमेंतच्या वर निघून, प्रथम लिगमेंतकडे उतरते; मग पेरितोनियम, व त्रान्स्वर्सेलिस फाशिया, ह्यांच्या मधून रेक्तस स्नायूच्या वेष्टनापर्यंत तिरपी वर चढते. मग वेष्टनास विंधून-रेक्तस स्नायूच्या मागल्या आंगानें एन्सिफार्म कूर्चेपर्यंत जाऊन, आंतल्या म्यामरीच्या वरच्या एपिग्यास्त्रिक् शाखेशीं अग्रसंयोग पावते. वर चढतांनां ही धमनी इंग्विनल् नळाच्या मागें, पोटाच्या आंतील अंगठी सारख्या छिद्राच्या आंतल्या बाजूस, व फेमरल् नामक अंगठी सारख्या छिद्राच्या लागलींच वर असते; आणि पुरुषांत वासदेफरन्स, व स्त्रियांत रौंदालिगमेंत हे भाग हिज वरून मागल्या आंगानें जातात. ही पोटाचे स्नायु व कातडें ह्यांस पोषून इतर धमन्यांशीं संयोग पावते. २ सर्कंफ्लेक्स धमनी वरची जवळ निघून, पूपार्तच्या लिगमेंतच्या मागून इलियमच्या आंतल्या आंगानें त्रान्स्वर्सेलिस स्नायू पर्यंत जाऊन त्यास विंधून, तो व आंतला आब्लीक स्नायु ह्यांच्या मध्यें चालू होऊन मागें जाऊन ग्लूतियल, व इलियोलंबर, ह्या धमन्यांशीं संयोग पावते.

## फेमरल धमनी.

ही धमनी बाहेरील इलियाक धमनीचा चालू भाग होय. ही इलियमचा पुढचावरचा कंटकतुल्य भाग, व सिंफिसिसप्यूबिस, ह्यांच्या मधोमध पुपार्तच्या लिगमेंत पासून मांडीच्या आंतल्या आंगानें आदक्तर म्याग्नस स्नायूमधल्या छिद्रापर्यंत उतरून, एथें मांडीच्या मधल्या व खालच्या तृतीयांशांच्या संयोगस्थानीं पाप्लितियल धमनी होते. ही वर पूपार्तचें लिगमेंत, बाहेर सार्तोरियस, व आंत आदक्तर लांगस स्नायु, ह्या भागांनीं मर्यादिलेल्या त्रिकोणाकार स्थानांत असते, आणि त्या स्थानाच्या बुडापासून शेंडयापर्यंत लंब रेषा काढली तर, ती ह्या धमनीची मार्गदर्शक होते.

**संबंध.** फेमरल धमनी तिच्या शिरेसहवर्तमान एका बळकट वेष्टनांत गुंडाळली आहे. हें वेष्टन पूपार्तच्या लिगमेंतजवळ फाडून उघडें केलें अ-

सतां, धमनी वेष्टनाच्या बाहेरल्या भिंतीजवळ, व शीर आंतल्या भिंतीजवळ आहे, असें दिसेल; आणि शीर व वेष्टनाची आंतली भिंत, ह्यांच्या मध्यें व शिरेपासून फैब्रस त्वचेनें निराळें झालेलें असें एक त्रिकोणाकार स्थान आहे. ह्याला फेमरल अथवा क्रूरल नळ म्हटलें आहे, व ह्यांतूनच मांडीस आंतडें उतरतें. स्वाभाविक अवस्थेंत, ह्या नळामध्ये एक लिंफ्यातिक् ग्ल्याद असतो. फेमरल धमनी वर अनुक्रमें करून कातडें, उथळ व खोल फाशिया, ह्या भागानी आच्छादिली आहे. ह्या खेरीज हिच्या खालच्या भागास सार्तोरियस स्नायु, व वास्तसइन्तर्नस स्नायूपासून आदक्तर म्याग्नस ह्याला गेलेला बंद, ह्याचें आच्छादन आहे. फेमरल शीर प्रथम आंतल्या आंगास असते, व धमनीच्या सपाटीवर असते, मग ती धमनीच्या मागल्या आंगावर टेकते, व क्रमेंकरून बाहेरच्या आंगास जाते. धमनी व तिचें वेष्टन ह्यांच्या बाहेरल्या आंगास पुढचा क्रूरल मज्जातंतु असतो. धमनीचें खालचे आंग सोअस व इलायकस, पेक्तिनियस, आदक्तर लांगस, व आदक्तर म्याग्नस, ह्या स्नायूवर अनुक्रमें करून टेकत जातें.

## फेमरल धमनीच्या संबंधाचें कोष्टक.

**पुढें.**

| | |
|---|---|
| कातडें, उथळ व खोल फाशिया<br>सार्तोरियस स्नायु. | मांडीच्या वरच्या तृतीयांशांत. |
| वास्तस इन्तर्नस पासून आदक्तरलांगस व<br>म्याग्नस ह्या स्नायूंस जाणारा अपान्युरोसिसचा पडदा. | मांडीच्या मधल्या तृतीयाशांत. |

जेनितो क्रूरल मज्जातंतूची क्रूरल शाखा.

| **बाहेर.** | | **आंत.** |
|---|---|---|
| फेमरल शीर (खाली). | फेमरल धमनी. | फेमरल शीर (वरतीं) |
| आंतला सफीनस-मज्जातंतु. | | आदक्तर लांगस व सार्तोरियस स्नायु } खालीं |
| पुढच्या क्रूरल मज्जातंतु. | | |

**मागें.**

सोअस व इलायकस स्नायु.

पेक्तिनीयस.

आदक्तर लांगस.

आदक्तर म्याग्नस.

प्रोफंदा रक्तवाहिन्या.

फेमरल शीर. (मध्यें).

ही धमनी पूपार्तच्या लिगमेतच्या खालीं चार इंचावर बांधतात.

**शाखा.** सुपराफिशियल एपिग्यास्त्रिक् फेमरल हिच्या वरच्या भागा पासून निघून, एपिग्यास्त्रिक् देशाच्या कातडयावर वांटली जाते, आणि आंतली म्यामरी व खोल एपिग्यास्त्रिक् ह्या धमन्यांशीं संयोग पावते. २ उथळ व खोल बाहेरील प्युदिक् ह्या शाखा पोटाचें कातडें, शिश्न, व वृषण, आणि स्त्रियांमध्यें उपस्थाचे पार्श्व ह्यांस पोषितात. ३ उथळ सर्कंफ्लेक्स पूपार्तच्या लिगमेंतशीं समांतर जाते, व इलियमच्या शिखे जवळ तिजपासून शाखा निघतात, त्या कातडें, फाशिया, व इंग्विनल देशांतले ग्ल्यांद, ह्यांस पोषून इतर धमन्यांच्या शाखांशीं संयोग पावतात. ४ प्रोफंडा फेमरिस (खोल फेमरल धमनी) ही सरासरी उथळ फेमरल धमनी एवढी असते. ही फेमरल धमनीच्या मा-

ल्या व बाहेरल्या आंगापासून, पूपार्तच्या लिगमेंत पासून दोन इंच खालीं निघते. ही प्रथम फेमरल धमनीच्या बाहेरल्या बाजूस असते, नंतर ती धमनी व फेमरल शीर ह्यांच्या मागून, फीमरच्या आंतल्या आंगास येते, आणि मांडीच्या खालच्या तृतीयांशा जवळ ही लहान होऊन आदक्तर म्याग्नस स्नायूस विंधून, मांडीच्या मागल्या आंगास जे आकुंचक स्नायु आहेत, त्यांस वांटली जाते. एथें ही पाप्लितीयल व खालची परफोरेतिंग ह्या धमन्यांच्या शाखांशीं अग्रसंयोग पावते.

संबंध. मागें, इलायकस, आदक्तर ब्रीविस, व आदक्तर म्याग्नस, हे स्नायु असतात; आणि ह्यांवर ही धमनी अनुक्रमें करून टेकते; वरतीं फेमरल शीर व प्रोफंदा शीर, आणि खालीं आदक्तर लांगस स्नायु, ह्या भागानीं ही फेमरल धमनी पासून सोडविली आहे, म्हणजे हे भाग हिच्या पुढे असतात; बाहेरल्या आंगास ही धमनी, वास्तस इन्तर्नस स्नायूनें फीमर पासून सोडविली आहे.

शाखा. १ बाहेरची सर्कंफ्लेक्स प्रोफंदाच्या बाहेरल्या आंगापासून निघून, सार्तोरियस व रेक्तस ह्या स्नायूंच्या खालून, क्षितिजसमांतर बाहेर जाते, आणि हिजपासून चढत्या, उतरत्या, व अडव्या शाखा निघतात. चढत्या शाखा तेन्सरवेजायनी फेमारिस स्नायूच्या खालून, खुब्याच्या बाहेरल्या आंगास जातात, आणि ग्लूतियल व सर्कंफ्लेक्स इलियाकू ह्या धमन्यांशीं संयोग पावतात, अडव्या शाखा वास्तस इन्तर्नस स्नायू मधून मांडीच्या मागल्या आंगास जाऊन इतर शाखांशीं संयोग पावतात. उतरत्या शाखा वास्तें स्नायूं वरून गुडघ्याच्या बाहेरल्या आंगापर्यंत उतरून, पाप्लितीयल धमनीच्या वरल्या आर्तिक्युलर शाखांशीं संयोग पावतात, आणि वरील स्नायूंस वांटल्या जातात. २ आंतली सर्कंफ्लेक्स धमनी आंतल्या आंगून निघून पेक्तिनियस, व सोअस, ह्या स्नायूंच्या मधून फीमरला वेढा घालते; मग आब्त्यूरेतर एक्स्तर्नस स्नायूच्या तेंदनाजवळ आल्यावर, हिच्या दोन शाखा होतात. एक शाखा आदक्तर, ग्र्यासिलिस, व आब्त्यूरेतर एक्स्तर्नस, ह्या स्नायूंस वांटली जाऊन आब्त्यूरेतर धमनीशीं संयोग पावते, ही चढती शाखा होय. दुसरी उतरती शाखा आदक्तर स्नायूंस वांटली जाते. धमनीचा चालू भाग क्वाद्रेतस फेमरिस, व आदक्तर म्याग्नसचा वरचा कांठ, ह्यांच्या मधून मागें जाऊन, सायाटिकू

एक्स्टर्नल सर्कंफ्लेक्स, व वरची परफोरेटिंग, ह्या धमन्यांशीं संयोग पावतो.

परफोरेटिंग धमन्या बहुधा तीन असतात, आणि ह्या प्रोफंदा पासून निघतात. पहिली अथवा वरची परफोरेटिंग शाखा पेक्टिनीयस व आदक्तर ब्रीविस ह्या स्नायूंच्या मधून जाऊन, आदक्तर म्याग्नस स्नायूस विंधून मागें जाते, आणि आदक्तर, बैसेप्स, व ग्लूतियस म्याक्सिमस, ह्या स्नायूंस वाटली जाते. सायातिक, आंतली सर्कंफ्लेक्स, आणि मधली परफोरेटिंग, ह्या धमन्यांशीं संयोग पावते. मधली परफोरेटिंग शाखा वरचीच्या खालीं निघून आदक्तर म्याग्नस स्नायूस विंधून मागें जाते, आणि आकुंचक स्नायूंस वाटली जाते. ही इतर परफोरेटिंग शाखांशीं संयोग पावते. खालची परफोरेटिंग शाखा आदक्तर ब्रीविस स्नायूच्या खालीं निघून, आदक्तर म्याग्नस स्नायूस विंधून मागें जाते. ही मांडीच्या आकुंचक स्नायूंस वाटली जाऊन, इतर परफोरेटिंग शाखांशीं संयोग पावते.

५ फेमरल हिच्या स्नायूंसंबंधी शाखा सातपासून आठ असतात, आणि ह्या मुख्यत्वें वास्तस इन्तर्नस व सार्तोरियस ह्यांस पोषितात. ६ अनास्तमातिका म्याग्ना ही फेमरल धमनी आदक्तर म्याग्नस ह्याच्या छिद्रांत शिरावयाच्या अधीं तिजपासून निघते, व तिजपासून दोन शाखा निघतात, त्यांपैकीं उथळ शाखा सार्तोरियस स्नायूच्या खालून चढून कातडयावर वांटली जाते, खोल शाखा खाली जाऊन गुडघ्यास पोषिते, व वरची बाहेरील अर्तिक्युलर व पुढच्या तिबियलची रिकरंत शाखा ह्या धमन्यांशीं संयोग पावते. ही शाखा वास्तस इन्तर्नस स्नायूच्या द्रव्यांतून गुडघ्याच्या आंतल्या आंगास उतरते. हिजपासून एक शाखा गुडघ्याच्या पुढून जाऊन बाहेरील अर्तिक्युलरशीं संयोग पावते, तेणे करून एक कमान होते. मांडीचा खालचा तृतीयांश व जंघेचा वरचा पंचमांश, ह्यांचें मागलें आंग हें पाप्लितियल् स्थान होय. ह्याचा आकार चौकोण आहे, त्या चौकोणाची लांब कर्णरेषा पायाच्या उभ्या मध्यरेषेंत पडते. बाहेर संधीच्या वर बैसेप्स; व खालीं ग्यास्ट्रोक्नीमियस ह्याचें बाहेरील डोकें, ह्या मर्यादा आहेत. आंत संधीच्या वर सेमीतेंदिनोसस, सेमीमेम्ब्रिनोसस, सार्तोरियस, व ग्र्यासिलिस, हे स्नायु; संधीच्या खालीं ग्यास्ट्रोक्नीमियस ह्याचें आंतलें डोकें, ह्या मर्यादा होत; वर आंतल्या व बाहेरल्या हाम्-

लिंग स्नायूंची जुळणी; आणि खालीं ग्याख्रोक्नीमियस स्नायूच्या दोहों डो-क्यांची जुळणी, ह्या मर्यादा होत. ह्या स्थानांत पाप्लितियल रक्तवाहिन्या, सफीनस शीर, आंतला व बाहेरला पाप्लितियल व लहान सायातिक हे मज्जा-तंतु, असे भाग आहेत.

## पाप्लितीयल धमनी.

**पाप्लितीयल धमनी** आदक्तर म्याग्नस स्नायूच्या छिद्रा जवळ, फेमरल धमनीच्या समाप्तिस्थानीं सुरू होऊन पाप्लितियल स्थाना मधून, पाप्लितियस स्नायूच्या खालच्या कांठा पर्यंत जाऊन, तिचे पुढली व मागली तिबियल ध-मनी असे दोन विभाग होतात.

**संबंध.** खालीं उतरतांनां ही प्रथम फीमरवर, नंतर गुडघ्याच्या मागील संधिबंधनावर, व शेवटीं पाप्लितियस स्नायूस आच्छादणाऱ्या फाशिया वर टें-कते. हिच्या उथळ आंगास वर सेमिमेंब्रिनोसस, व बसा ह्यांचा संबंध अ-सून त्यांच्या योगानें ती खोल फाशिया पासून निराळी झाली आहे. खालच्या भागास ग्याख्रोक्नीमियस, सोलियस, व प्लांतेरीस, ह्या स्नायूंचें आच्छादन आहे. बाहेरच्या आंगास पाप्लितियल शीर, हिच्या बाहेर व धमनी पेक्षां उथळ, पाप्लितियल मज्जातंतु आहेत; धमनीच्या शेवटच्या भागास शीर व मज्जातंतु हे भाग धमनी वरून जाऊन आंतल्या आंगास येतात. धमनीच्या दोहों बाजूस पाप्लितियल स्थान मर्यादणारे स्नायु असतात.

**पाप्लितियल धमनीच्या संबंधाचें कोष्टक**

**पुढें.**

फीमर.

गुडघ्याच्या मागचें बंधन.

पाप्लितीयस स्नायूस आच्छादणारा फाशिया.

| **बाहेर.** | | | **आंत.** | |
|---|---|---|---|---|
| पाप्लितीयल शीर.<br>आंतला पाप्लिति-<br>यल मज्जातंतु. | } वर | पाप्लितीयल धमनी. | पाप्लितीयल शीर.<br>आंतला पाप्लितीयल मज्जातंतु. | } खालीं |

बाहेरचा पाप्लितीयल मज्जातंतु.

पाप्लितियल स्थानाच्या बाहेरच्या मर्यादेस असणारे स्नायु.

पाप्लितीयल स्थानाच्या आंतल्या मर्यादेत असणारे स्नायु.

**मागें.**

सेमिमेंब्रानोसस स्नायु.

वसा.

ग्यास्ट्रोक्नीमियस.

सोलियस.

प्लांतेरिस.

पाप्लितीयल शीर.

आंतला पाप्लितीयल मज्जातंतु.

उथळ व खोल फाशिया.

कातडें.

ह्या धमनीस जखम झाली तर, हिला वर अथवा खालीं ह्याच्या उथळ स्थानीं बांधतात.

**शाखा.** १ वरच्या आर्तिक्युलर धमन्या बाहेरली व आंतली अशा दोन आहेत, त्या त्याच कांदेल्स ह्यांना वेढा घालून गुडघ्याच्या संधीच्या पुढल्या भागास येतात, व एकमेकींशीं व फेमरल व पुढची तिबियल ह्या धमन्यांच्या शाखांशीं संयोग पावतात. २ अभिगात आर्तिक्युलर ही एकच आहे, व ही

गुडघा व जंघा ह्यांच्या मागच्या अंगच्या धमन्या. उथळ आकुंचक स्नायु काढून टाकले आहेत.




१ पाप्लिटियल् धमनी पाप्लिटियल् स्थानांत शिरत आहे. २, २ आर्टिक्युलर धमन्या. ३, ३, मागची टिबियल् धमनी. ४ पुढच्या टिबियल्‌चा आरंभ ५ पेरोनियल् धमनी. ६ पुढची पेरोनियल्. अ. पाप्लिटियल् मज्जातंतु. ब. पॉप्लिटियस स्नायु. क. आंमला घोटा. ड. तेंदो आकिलिसचा शेष भाग.

गुडघ्याचें मागलें संधिबंधन विंधून संधींत जाऊन त्याच्या भागांस पोषिते. ३ खालच्या आर्तिक्युलर ह्या, आंतली व बाहेरली अशा दोन आहेत, व त्या तिबियाच्या डोक्या भोंवतीं आंतल्या व बाहेरल्या बाजूच्या संधिबंधना खालून वेढा घालून संधीच्या पुढच्या आंगास येतात, मग एकमेकींशीं, वरच्या आर्तिक्युलर धमनीशीं, व पुढच्या तिबियल धमनीच्या रिकरंत शाखेशीं संयोग पावून गुडघ्याच्या संधीस पोषितात. ४ सूरल शाखा स्नायूंस पोषितात.

## पुढची तिबियल धमनी.

पुढची तिबियल धमनी तिबियेलिस पोस्तेकस स्नायूचीं दोन डोकीं, व अस्थींच्या मधल्या त्वचेच्या वरच्या भागावरचें छिद्र, ह्यांमधून पुढें जाऊन पुढच्या तिबियल देशांत येते, मग जंघेच्या पुढच्या आंगानें गुल्फसंधी पर्यंत खालीं उतरून, दार्सेलिस पीदिस धमनी होते.

**संबंध.** हिच्या मार्गांमध्यें ही धमनी अस्थींच्या मधील त्वचा, तिबियाचा खालचा भाग, व गुल्फ संधीचें पुढील बंधन, ह्या भागावर टेकते. हिचा वरचा तृतीयांश भाग, तिबियेलिस अंतेकस व एक्स्तेन्सर लांगस दिजितोरम् ह्या स्नायूंच्या मध्यें आहे. ह्या खालीं ती तिबियेलिस अंतेकस, व एक्स्तेन्सर प्रोप्रियस पालिसिस, ह्या स्नायूंच्या मध्यें आहे; गुल्फ संधी पर्यंत पोहचण्याच्या पूर्वीं ह्या शेवटील स्नायूचें तंदन हिजवरून जातें, व ही त्या स्नायूच्या व एक्स्तेन्सर लांगस दिजितोरम् ह्याच्या आंतल्या तंदनाच्या मध्यें असते. वीनी कामितेज ह्या शिरा हिज बरोबर असतात. पुढचा तिबियल मज्जातंतु वर हिच्या बाहेरल्या आंगास असतो, मध्यावर त्याचा हिच्या उथळ आंगाशीं संबंध असतो, व खालीं तो पुनः बाहेरच्या आंगास जातो.

## पुढच्या तिबियल धमनीच्या संबंधाचें कोष्टक.

**पुढें.**

कातडें, उथळ व खोल फाशिया.

तिब्रियेलिस अंतैकस.

एक्स्तेन्सर लांगस दिजितोरम्.

एक्स्तेन्सर प्रोप्रियसपालिसिस.

पुढचा तिबियल मज्जातंतु.

| बाहेर. | | आंत. |
|---|---|---|
| पुढचा तिबियलमज्जातंतु.<br>एक्स्तेन्सर लांगस दिजितोरम्.<br>एक्स्तेन्सरप्रोप्रियसपालिसिस. | पुढची तिबियल धमनी. | तिबियेलिस अंतैकस.<br>एक्स्तेन्सर प्रोप्रियस-पालिसिस. |

**मागें.**

अस्थींच्या मधली त्वचा.

तिबिया.

गुल्फसंधीचें पुढचें बंधन.

ह्या धमनीस वरच्या अथवा खालच्या भागांत बांधतात.

शाखा— १ रिकरंत शाखा गुडघ्याच्या संधीच्या पुढच्या आंगास वर जाऊन त्यावर वांटली जाते, आणि पाश्चितियल धमनीच्या अर्तिक्युलर शाखांशीं संयोग पावते. २ स्नायू संबंधी शाखा पुढील तिबियल देशाच्या स्नायूंस पोषितात. ३ म्यालियोलर ह्या आंतली, व बाहेरली, अशा दोन शाखा आहेत. त्या गुल्फ संधीस पोचून आंतली व बाहेरली प्लांतर व पेरोनियल, ह्या धमन्यांशीं संयोग पावतात.

## दार्सेलिस पीदिस धमनी.

ही पुढच्या तिबियलचा चालू भाग होय, ही गुल्फ संधीपासून पुढें पावलाच्या पाठीवरून तिबियाकडच्या बाजूनें अंगठ्याच्या मेतातार्सल अस्थीच्या बुडा पर्यंत आले, व एथें तिजपासून दार्सेलिस हाल्युसिस, व कम्यूनिकेंटिस, ह्या दोन शाखा निघतात.

**संबंध.** ही आंत एक्स्तेन्सर प्रोप्रियसपालिसिस ह्याचें तेंदन, व बाहेर एक्स्तेन्सर लांगस दिजितोरम् ह्याचें आंतलें तेंदन, ह्यांच्या मध्यें असते; शेव- टीं एक्स्तेन्सर ब्रीविस दिजितोरम् ह्याचें आंतलें तेंदन हिजवरून आडवें जातें, वीनीकामितीज ह्या दोन शिरा हिच्या संगतीस असतात, आणि पुढच्या ति- बियल मज्जातंतूचा चालू भाग हिच्या बाहेरल्या बाजूस असतो. ही धमनी अस्त्रागलस, स्केफैद, व आंतलें क्यूनिये़फार्म, हीं अस्थि जुळविणाऱ्या बंधनावर टेकते, आणि कातडें व फाशिया ह्यांनीं आच्छादिली आहे.

दार्सेलिस पीदिस धमनीच्या संबंधाचें कोष्टक.

**पुढें.**

कातडें व फाशिया.

एक्स्तेन्सर ब्रीविस दिजितोरम् स्नायूचें आंतलें तेंदन.

| **बाहेर.** | | **आंत** |
|---|---|---|
| एक्स्तेन्सर लांगस दिजि- तोरम्. | दार्सेलिस पीदिस धमनी. | एक्स्तेन्सर प्रोप्रियस- पालिसिस. |
| पुढचा तिबियल मज्जातंतु. | | |

**मागें.**

अस्त्रागलस.

स्केफैद.

आंतलें क्यूनिऐफार्म.

ह्या अस्थींस जुळविणारीं बंधनें.

**शाखा.** १ तार्सिया ही तार्ससवर आडवी कमान करून त्याच्या अस्थींच्या संधींस पोषिते. २ मेतातार्सिया ही मेतातार्सल अस्थींच्या बुडावर कमान करून, पावलाची बाहेरील बाजू पोषून तार्सल व बाहेरील प्लांतर ह्या धमन्यां- शीं संयोग पावते; कमानीच्या गोलबाह्य अंगा पासून तीन इन्तरआसिऐ शाखा निघतात, त्या अस्थींच्या मधील बाहेरील तीन स्थानांतून जाऊन बो- टांचीं लगतचीं अंगें पोषितात. ३ दार्सेलिस हाल्युसिस हिजपासून दोन शाखा निघतात, त्यांपैकीं एक अंगठयाचें आंतलें अंग पोषिते, व दुसरी वि- भागून दोन शाखा होतात, त्या अंगठा व दुसरें बोट ह्यांचीं लगतचीं अंगें

पोषितात. ४ कम्यूनिकेतिंग शाखा पहिल्या दार्सल इन्तर आसियस स्नायूच्या डोक्यांच्यामधून तळव्यांत शिरते, व बाहेरच्या प्लांतर धमनीशीं अग्रसंयोग पावून तळव्यांतली कमान पूर्ण करते.

## मागली तिबियल धमनी.

ही पाप्लितियस स्नायूच्या खालच्या कांठा पासून, जंघेच्या तिबियाकडच्या बाजूनें आसक्यालिसस ह्याच्या गोलांतर आंगा पर्यंत, तिरपी खालीं उतरते; येथें आंतली व बाहेरली प्लांतर हे हिचे विभाग होतात.

**संबंध**. हिच्या मार्गांत ही प्रथम तिबियेलिसपोस्तैकस ह्यावर, मग फ्लेक्सर लांगस दिजितोरम् ह्यावर, नंतर तिबियावर टेकते. वरचा भाग-ग्यास्त्रोक्नीमियस व सोलियस ह्या स्नायूंनीं आच्छादिला आहे. खालचा भाग उथळ असून, त्यास फाशियाचें मात्र आच्छादन आहे. वीनीकामितीज ह्या शिरा धमनीच्या संगतीस असतात. मागला तिबियल मज्जातंतु प्रथम आंतल्या बाजूस, व नंतर संपूर्ण भागांत बाहेरल्या बाजूस असतो.

मागच्या तिबियल धमनीच्या संबंधाचें कोष्टक.

**पुढें.**

तिबियेलिस पोस्तैकस.

फ्लेक्सर लांगस दिजितोरम्.

तिबिया.

गुल्फसंधि.

| बाहेर. | | आंत. |
|---|---|---|
| मागचा तिबियल-मज्जातंतु ( खालच्या दोन तृतीयांशात ). | मागची तिबियल धमनी. | मागचा तिबियल मज्जातंतु ( वरच्या तृतीयांशास ). |

**मागें.**

ग्यास्त्रोक्नीमियस.

सोलियस.

फाशिया.

कातडें.

**शाखा. १ पेरोनियल धमनी** ही मागील तिबियल धमनीची अत्यंत मोठी शाखा होय. ही पाप्लितीयस स्नायूच्या खालच्या कांठा पासून एक इंच खालीं निघून, तिरपी फिब्युलाकडे जाते, व त्या अस्थीच्या आंतल्या काठानें जंघेच्या खालच्या तृतीयांश भागा पर्यंत खालीं उतरते. ह्या ठिकाणीं हिजपासून पुढची पेरोनियल शाखा निघते. हिचा चालू भाग बाहेरच्या म्यालियोलसकडे जाऊन स्नायूंस पोषून मागच्या तिबियल धमनीस संयोगी शाखा देतो. २ **पोषक धमनी** तिबियाच्या छिद्रांत शिरून त्याला पोषिते. ३ **स्नायुसंबंधी** शाखा सोलियस ह्याला, व जंघेच्या मागल्या आंगच्या दुसऱ्या खोल स्नायूंला पोषितात. ४ **क्यालकेनियन्** ह्या चार पांच शाखा पावलाच्या आंतल्या बाजूचे भाग पोषितात. ५ **आंतली प्लांतर धमनी** मागल्या तिबियल धमनीच्या दुभागा पासून आंतल्या म्यालियोलस जवळ निघते, व आब्दक्तर पालिसिस स्नायू खालून पावलाच्या आंतल्या कांठानें जाऊन त्यास व अंगठ्यास पोषिते. ६ **बाहेरिल प्लांतर धमनी** आंतली पेक्षां मोठी आहे, व तिरपी बाहेर वळून तळव्याच्या स्नायूंच्या पाहिल्या व दुसऱ्या थरांच्या मधून पांचव्या मेतातार्सल अस्थी पर्यंत जाते, मग क्षितिजाशीं समांतर आंत वळून स्नायूंच्या पहिल्या व दुसऱ्या थराच्या मधून पहिल्या मेतातार्सल स्थानांत येते, व दार्सेलिस पीदिस हिच्या कम्यूनिकेतिंग शाखेशीं अस्रसंयोग पावून तळव्याची कमान पूर्ण करते, ह्या कमानीचें गोलवाख आंग पुढें झुकलें आहे.

**कमानीच्या शाखा.** १ स्नायू संबंधी शाखा तळव्यांतल्या स्नायूंस वांटल्या आहेत. २ दिजितल म्हणजे बोटांच्या शाखा चार आहेत. पहिली करंगळीच्या बाहेरच्या आंगास गेली आहे. बाकीच्या तीन बोटांच्या बेचकांत जातात, व तेथें विभागून त्यांच्या शाखा निघतात, त्या बाहेरचीं तीन बोटें व दुसऱ्या बोटाचें बाहेरील आंग ह्यांस पोषितात. प्रत्येक दिजितल शाखे पासून पुढची परफोरेतिंग शाखा निघून वर जाते, ती मेतातार्सिया धमनीच्या इन्तर आसियस शाखांशीं जुळते. ३ मागल्या परफोरेतिंग ह्या बाहेरील तीन दार्सल इन्तर आसिऐ स्नायूंच्या डोक्यातून वर जाऊन मेतातार्सिया धमनीच्या कमानीशीं संयोग पावतात.

## पल्मनरी धमनी.

ही धमनी काळसर किंवा अशुद्ध रक्त हृदाच्या उजव्या बाजू पासून फुप्फुसामध्यें नेते. ही वाहिनी सुमारें दोन इंच लांब आहे. ही उजव्या वेंत्रिकलूच्या बुडाच्या डाव्या बाजू पासून चढत्या एयोर्ताच्या पुढें निघते. नंतर वर व मागें, आणि डावीकडे जाऊन उजवी व डावी पल्मनरी धमनी हे दोन विभाग होऊन ही संपते.

**संबंध.** हिचा बहुतेक भाग पेरिकार्दियम् ह्यामध्यें वेष्टिला आहे; मागें एयोर्ताच्या कमानीचा चढता भाग, व डाव्या आरिकलूचा अपेंदिक्स व कारोनरी धमनी हीं आहेत; आणि वर दक्तस आर्तीरियोजस हिचा रज्जु आहे.

१ **उजवी पल्मनरी धमनी** डावी पेक्षां किंचित् मोठी व लांब आहे, ही चढती एयोर्ता व वरची वीनाकेवा ह्यांच्या मागून आडवी बाहेर वळून, उजव्या फुप्फुसाच्या मुळाजवळ जाते, आणि तेथे विभागून तीन गड्यास तीन शाखा जाऊन ती संपते; हिच्या मार्गा मध्यें ही धमनी उजव्या ब्रांकसच्या पुढें व त्याशीं समांतर आहे.

२ **डावी पल्मनरी धमनी** उजवी पेक्षां लहान व अखूड आहे. ही उतरती एयोर्ता व डावी ब्रांकस ह्यां वरून आडवी डाव्या फुप्फुसाच्या मुळाकडे जाते, व तेथून दोन गड्यांस दोन शाखा जाऊन ती संपते.

## शिरांविषयीं सामान्य वर्णन.

शिरा म्हणजे शरीराच्या निरनिराळ्या भागां पासून अशुद्ध अथवा काळसर रक्त हृदास परत नेणाऱ्या वाहिन्या. **फुप्फुस संबंधी शिरा** ज्यां मध्यें आरक्त वर्ण रक्त असतें, ह्यामुळें त्या इतर शिरांहून वेगळ्या आहेत, त्या तें रक्त फुप्फुसां पासून हृदाच्या डाव्या आरिकल मध्यें परत नेतात. ह्या शिरांनां पल्मनरी शिरा म्हणतात.

**शरीरसंबंधी शिरा** प्रत्येक भागाचें काळसर रक्त हृदाच्या उजव्या आरिकलांत परत आणतात, ह्यास सिस्तेमिक् शिरा म्हणतात.

**पोर्तलशीर,** शरीर संबंधी शिरांपैकीं आहे. ही पचन संबंधी अवयवांचें काळसर रक्त काळजांत परत नेते. मग तेथून तें काळजाच्या शिरांतून खालची वीनाकेवा नामक मोठी शीर आहे, तींत परत जातें.

शिरा आरंभीं अत्यंत सूक्ष्म असतात, व त्यांचीं जाळीं होतात. त्या केशाकार धमन्यांशीं संयोग पावतात. ह्या शरीराच्या बहुतेक भागांत सांपडतात, आणि ह्या एकत्र जुळून ह्यांचीं मोठालीं कांडीं होतात, तीं जसजशीं ह्रदाजवळ येतात तसतशीं जास्ती मोठीं होतात. शिरांचे परस्परांशीं संयोग सर्व भागांत विपुल आहेत, आणि मस्तक व मान ह्या ठिकाणीं तर ते फारच विपुल आहेत. शिरांस तीन पडदे असतात, आंतला, एपिथिलियल त्वचेचा व स्थितिस्थापक; मधला मांसमय, व स्थितिस्थापक; आणि बाहेरचा अरियोलर फैब्रस त्वचेचा असतो. बहुतेक शिरांस आंतल्या आंगानें दोनदोन पडदे लागले असतात, ते शिरांस मढविणारा पडदा दुमटल्यानें झाले असून गोलबाह्य कांठांनीं शिरांच्या आंतल्या आंगास बद्ध असतात. हे पडदे रक्त खालीं उलट उतरूं देत नाहींत, व शाखाच्या व मुख्यत्वें अधः शाखांच्या शिरांमध्यें ह्यांचा भरणा फार असतो. अत्यंत लहान शिरा तशाच वीनाकेवा, पोर्तल व तिच्या शाखा, काळीज, मूत्रपिंड, गर्भाशय, व अंडाशय, ह्यांच्या शिरांमध्यें पडदे मुळींच नसतात. ह्या पडद्यास **वाल्व** म्हणतात.

धमन्यां प्रमाणेंच शिरासही, वेज.वेंजोरम्, नामक पोषक वाहिन्यांचा पुरावा असतो.

शिरांचे तीन वर्ग करतां येतात. १ डोकें, मान, ऊर्ध्व शाखा, आणि पिंजर, ह्या भागाच्या शिरा, ह्या वरच्या वीनाकेवा मध्यें संपतात. २ अधःशाखा, पेल्विस, आणि पोट, ह्यांच्या शिरा, ह्या खालच्या वीनाकेवा मध्यें संपतात. ३ ह्रदाच्या शिरा, ह्या प्रत्यक्ष उजव्या आरिकलांत संपतात.

## डोक्याच्या व मानेच्या शिरा.

ह्यांचे तीन वर्ग करतां येतात. १ डोक्याच्या बाहेरल्या आंगच्या शिरा २ मानेच्या शिरा. ३ दिप्लोईच्या व करटीच्या आंतल्या शिरा.

मस्तकाच्या बाहेरील आंगच्या शिरा फेशियल, तेंपरल्, आंतली म्याक्सिलरी, तेंपरोम्याक्सिलरी, मागली आरिक्युलर, आणि आक्सिपितल ह्या आहेत; व ह्या त्याच नांवांच्या धमन्यांचा मार्ग धरून डोक्याच्या बाहेरील भागांपासून रक्त परत आणतात.

आल्स्याक्तरी व पांचव्याच्या व मेकल्च्या ग्यांग्लियनच्या शाखा हे घ्राणेंद्रियसंबंधी मज्जातंतु होत.

## नेत्र.

**नेत्रपिंड** अक्षिकोशांत आहे. ह्या ठिकाणीं तो अपघाता पासून सुरक्षित असतो, व ह्याची ठेवण अशी आहे कीं, तिच्या योगानें दृष्टीची पोहोंच अत्यंत विस्तीर्ण होते. ह्यास स्नायू असतात त्यांच्या योगानें हा हवा तिकडे चलन पावतो. ह्यास रक्तवाहिन्या व मज्जातंतु ह्यांचा पुरावा आहे. ह्याच्या पुढल्या बाजूस असणाऱ्या भिंवया, पांपण्या इत्यादि अनुषांगिक भागांनीं ह्याचें रक्षण होतें.

**नेत्रपिंडाचा** आकार गोल असून पुढल्या आंगास लहान गोलाचा खंड असल्या मुळें, ह्याचा पुढून मागें व्यास आडव्या व्यासा पेक्षां अधिक आहे. मोठ्या गोलाचा खंड नेत्रपिंडाचा पांचषष्ठांश होतो, व हा स्क्लेरातिक्नें झाला आहे; लहान खंड नेत्रपिंडाचा बाकी एक षष्ठांश होतो, व हा कार्नियानें घटित आहे. नेत्रपिंडाचे आंस बहुत करून परस्परांशीं समांतर असतात, व ते अक्षिकोशांच्या आसांशीं मिळत नाहींत, कारण हे बाहेर झुकले असतात. आप्तिक् मज्जातंतु व अक्षिकोश ह्यांच्या आंसांची दिशा एकच असते, व ते नेत्रपिंडांत किंचित् आंतल्या अथवा नाकाकडच्या बाजूनें शिरतात. नेत्रपिंडामध्यें कित्येक वेष्टणारे पडदे, व किरणांचें वक्रीभवन करणारे प्रवाही व अप्रवाही मीदिया म्हणजे मध्यस्थ पदार्थ असतात. ह्या मध्यस्थ पदार्थांस ह्यूमर्स म्हणतात.

नेत्रपिंडाचे पडदे तीन आहेत,—१ला. स्क्लेरातिक् व कार्निया. २ रा. कोराइद, ऐरिस, व सिलियरी प्रासेसेस. ३ रा. रेतिना व सस्पेन्सरी लिगमेंत.

वक्रीभवन करणारे मीदिया अथवा ह्यूमर्स म्हणजे रस हेही तीन आहेत,—१ एक्वियस ह्यूमर म्हणजे जलवत्रस. २ क्रिस्तलैन लेन्स म्हणजे स्फटिकवत् रस. ३ वित्रियस ह्यूमर म्हणजे कांचवत् रस.

**पहिला पडदा. स्क्लेरातिक्** आणि **कार्निया** मिळून नेत्रपिंडाचा बाहेरील पडदा होतो. **स्क्लेरातिक्** हें नांव त्यास त्याच्या कठिणपणा मुळें दिलें आहे. हा फैब्रस त्वचेचा बळकट व न लवणारा पांढरा पडदा नेत्रपिंडाचा आकार जसाचातसाच

राखितो. हा पुढल्या पेक्षां मागल्या आंगास अधिक जाड आहे; बाहेरील आंग कांजेंक्तैवानें आच्छादिलें असून साफ व गुळगुळीत आहे; आंतील आंग सेल्युलर त्वचेच्या योगानें कोराइदच्या बाहेरील आंगास लागलें आहे; मागलें आंग आप्तिक् मज्जातंतूनें विंधिलें आहे, व त्याच्या वेष्टनाशीं सलग्न होतें, ह्या ठिकाणीं मज्जातंतु व रक्तवाहिन्या जाण्यासाठीं कित्येक छिद्रें आहेत. अक्षिकोशाचे स्नायु स्क्लिरातिक् वर बद्ध आहेत.

**रचना.** स्क्लिरातिक् हा पडदा फैब्रस त्वचेच्या लांब लांब तंतूंनीं झाला आहे. ह्यांत स्थितिस्थापक तंतु व सेल्स हीं मिसळलीं आहेत. ह्यांत वाहिन्या पुष्कळ नाहींत, व मज्जातंतू विषयीं तर संशयच आहे.

बाहेरील पडद्याच्या पुढें आलेल्या पारदर्शक भागास **कार्निया** म्हणतात, व हा सर्व नेत्रपिंडाचा एक षष्ठांश होतो. घड्याळाची कांच जशी त्याच्या घरावर आलेली असते, त्याप्रमाणें हा भाग स्क्लिरातिक् वर आलेला असतो. हा पुढील आंगास गोलबाह्य, व मागील आंगास गोलांतर आहे. ह्याचा आडवा व्यास अधिक लांब असल्या मुळें, हा अगदीं वर्तुळाकार नाहीं. ज्याप्रमाणें कार्नियाची गोलवाह्यता कमी किंवा ज्यास्ती असते, त्याप्रमाणें नेत्राची वक्रीभवन शक्ति कमी किंवा ज्यास्ती असते, आणि निरनिराळ्या पुरुषांस दीर्घ व लघु दृष्टि असण्याचें हेंच कारण होय.

**रचना.** कार्नियास पांच थर आहेत. पहिला जाड, चिवट, व पारदर्शक, फैब्रस त्वचेचा थर कार्नियाचा मुख्य भाग होय; ह्याच्या पुढल्या आंगास पुढील स्थितिस्थापक पडदा म्हणून एक पारदर्शक व सजातीय त्वचेनें युक्त थर असतो; ह्यावर कांजेंक्तैवाचें आच्छादन असतें; मुख्य भागाच्या मागल्या आंगास मागला स्थितिस्थापक पडदा आहे, व ह्यास एक्वियस चेंबर ह्यास मढविणाऱ्या एपिथीलियल् त्वचेचें आच्छादन आहे. पुढील व मागील स्थितिस्थापक पडद्यांची रचना सारखीच आहे.

कार्निया मध्यें रक्तवाहिन्या मुळींच नाहींत, परंतु मज्जातंतु पुष्कळ आहेत.

**दुसरा पडदा.** हा मागल्या आंगास कोराइद, पुढल्या आंगास ऐरिस व सिलियरी प्रोसेसेस, आणि स्क्लिरातिक् व कार्निया ह्यांच्या संयोगापाशीं सिलियरी स्नायु ह्यांनीं पूर्ण झाला आहे.

कोराइद हा अतिशय पातळ व रक्तवाहिन्यांनीं झालेला काळसर उ. दी रंगाचा पडदा नेत्रपिंडाचा मागील पांचषष्ठांश भाग व्यापितो, व मागील आंगास आप्तिक् मज्जातंतूनें विंधिला आहे. पुढल्या आंगास सिलियरी लिगमेंतपाशीं ह्याचा शेवट होतो, व हा एथें आंत मुरडला जाऊन कित्येक चुण्या होतात, त्यांस सिलियरी प्रोसेसेस म्हणतात. हा बाहेरच्या आंगानें स्क्लरातिक्शीं, व आंतल्या आंगानें रेतिनाशीं जुळला आहे. ह्यांत तीन थर असतात, त्यांपैकीं बाहेरला व मधला रक्तवाहिन्यांच्या केशाकार जाळ्यांनीं, व आंतला रंगाच्या कणांनीं भरलेलीं सेल्स ह्यांनीं, असे झाले आहेत.

कोराइद्चा आंतील व मधील थर आंतल्या आंगास दुमडून सिलियरी प्रोसेसेस होतात, व हे लेन्सच्या सस्पेन्सरी लिगमेंतच्या असल्याच चुण्यांत बसतात. हे साठ पासून ऐंशीं असतात, आणि लेन्सच्या कांठा भोंवतीं ऐरिसच्या मागल्या आंगास वर्तुलाकार लागले असतात. जे सर्वांत मोठे असतात, त्यांची लांबी $\frac{1}{10}$ इंच असते. त्यांचें पुढील आंग ऐरिसच्या परिघाशीं मागल्या बाजूनें सलग्न असतें, आणि मागील आंग लेन्सच्या सस्पेन्सरी लिगमेंतशीं दृढ जुळलें असतें. त्यांचा बाहेरील कांठ सिलियरी लिगमेंतास लागलेला असतो, व आंतील मोकळा असून लेन्सच्या परिघावर टेकतो. ह्यांची रचना कोराइद्च्या रचने प्रमाणेंच असते.

ऐरिस हें निरनिराळ्या मनुष्यांत निरनिराळ्या रंगाचें असतें. हें कार्नियाच्या मागल्या व लेन्सच्या पुढल्या बाजूस एक्कियस ह्यूमर ह्यामध्यें टांगलेला पातळ वाटोळा, व आकुंचन पावणारा पडदाच झाला आहे. उजेड आंत जाण्या साठीं ह्याला एक वाटोळें छिद्र आहे, त्याला प्यूपिल म्हणजे कनीनिका म्हणतात. ह्याचा घेर आंतल्या बाजूनें कोराइदशीं, व बाहेरल्या बाजूनें सिलियरी लिगमेंतच्या योगानें स्क्लरातिक् व कार्निया ह्यांशीं जुळला आहे. ह्याची आंतील कड व कनीनिकेची कड एकच आहे. ह्याचीं आंगें चापट आहेत, पुढील कार्नियाच्या बाजूस पुढें आलेलें दिसतें, व मागील सिलियरी प्रोसेसेस व लेन्स ह्यांकडे मागें झुकलेलें आहे. ह्याचें पुढील आंग निरनिराळ्या रंगानें युक्त असतें, व ह्यावर केंद्रापासून नीट जाणाऱ्या रेषा असतात, त्या सर्व कनीनिके कडे वळवात. ह्याचा मागील भाग अगदीं जांभळ्या रंगाचा असतो.

# नेत्रपिंडाचा उभा छेद.




१ स्क्लिरातिक् पडदा. २ कार्निया. ३ कोरैद. ४ सिलियरी प्रोसेसेस. ५ ऐरिस. ६ सिलियरी स्नायु. ७ जलवत् रसानें भरलेलें विवर; ह्याचे, पुढच्या व मागच्या असे दोन आशय होतात. ८ स्फटिकवत् रस किंवा लेन्स, हा त्याच्या वेष्टनांत आहे. ९ कांचवत् रसानें भरलेलें विवर; ह्यास एका पडद्याचें वेष्टन आहे. तो पडदा पुढें लेन्सच्या वेष्टनास व सिलियरी प्रोसेसेस ह्यांस लागला आहेसा दिसतो. १० आप्तिक् मज्जातंतु, ह्याच्या पसरणानें. ११ हा रेतिना किंवा नेत्रपिंडाच्या आंतला पडदा होतो. १२ आप्तिक् मज्जातंतूंचें संयोगस्थान. १३ स्क्लिरातिक् ह्यास जेथें रेक्टे स्नायु बद्ध होतात तें स्थान.

**रचना.** ऐरिसं हा स्त्रोमा म्हणजे तंतूचीं जाळीं, स्नायूचे तंतु, व रंगाचीं सेल्स, ह्यांनीं झाला आहे.

स्त्रोमा हा फैब्रस त्वचेच्या सूक्ष्म जुडग्यांनीं घटित आहे, व हे जुडगे परस्परांत गुंतले जाऊन एक जाळें होतें, त्यांतील फटींत रंगाचीं सेल्स, रक्तवाहिन्या, व मज्जातंतु, हीं असतात.

स्नायूचे तंतु इनूवालंतरी अथवा स्वेच्छानधीन असतात, हे वर्तुलाकार व समकेंद्रक आहेत. वर्तुलाकार तंतु आकुंचन करणारा स्नायु घटित करतात, व हे ऐरिसच्या मागल्या आंगास कनीनिकेच्या कांठा भोंवतीं लागले असतात. केंद्रा पासून नीट जाणारे तंतु जे कनीनिकेचें प्रसरण करणारे स्नायु घटित करतात, ते परिघा कडून आंत वळून कनीनिकेच्या कांठा जवळ वर्तुलाकार तंतूंशीं जुळतात. वर्तुलाकार तंतूंच्या योगानें कनीनिका आकुंचित होते, व केंद्रा पासून नीट जाणाऱ्या तंतूंनीं ती प्रसरण पावते.

रंगाचीं सेल्स ऐरिसच्या स्त्रोमामध्यें असतात.

गर्भावस्थेंत कनीनिकेवर एका पारदर्शक व रक्तवाहिन्यांनीं युक्त अशा त्वचेचें आच्छादन असतें, तें जन्मतांच नाहींसें होतें.

**सिलियरीलिगमेंत** म्हणून वर्तुलाकार तंतूंची एक लहानशी अंगठी असते. ती $\frac{१}{४०}$ इंच जाड असून कोराइद, कार्निया, व स्क्लिरातिकचा बाहेरील थर, आणि ऐरिसचा परिघ, ह्यांच्या संयोगस्थानीं असते.

कोराइदच्या पुढल्या बाजूच्या बाहेरील अंगास सुमारें $\frac{१}{८}$ इंच रुंद बंद असतो, त्यास **सिलियरी स्नायु** म्हणतात, व हा पट्ट्यांनीं रहित लांबलांब तंतूंनीं घटित आहे. हे तंतु कार्निया आणि स्क्लिरातिक् ह्यांच्या संधीपासून निघून, मागल्या बाजूस जाऊन रेतिनाच्या पुढल्या बाजूस कोराइदवर बद्ध होतात; ह्या स्नायूंच्या योगानें जवळचे पदार्थ पाहण्यास नेत्राचा झोंक जसा पाहिजे तसा होतो.

**रेतिना** हा मज्जेनें झालेला पडदा आहे, व ह्याच्या पृष्ठभागावर बाहेरील पदार्थांच्या प्रतिमा उठतात. ह्याचें बाहेरील आंग कोराइदशीं, व आंतील वित्रियस ह्यूमर ह्याशीं लागलें आहे. मागें हा आप्तिक् मज्जातंतूशीं सलग्न आहे. पुढल्या आंगास सिलियरी लिगमेंतपर्यंत पुढें जाऊन ह्याचा शेवट

आहे. हा पुढें लेन्सच्या क्याप्सूलशीं व सस्पेन्सरी लिगमेंतशीं दृढ जुळला आहे.

**स्फटिकवत् रस.** लेन्स व त्याचें **क्याप्सूल** म्हणजे **आच्छादन.**

लेन्स लागलेंच कनीनिकेच्या मागें, व वित्रियस ह्यूमरच्या पुढें आहे. ह्याच्या सभोंवतीं सिलियरी प्रोसेसेस आहेत, ते ह्यास किंचित् आच्छादितात.

लेन्सचें आच्छादन म्हणजे **क्याप्सूल** हें पारदर्शक, व अत्यंत स्थितिस्थापक त्वचेनें घटित असून, लेन्सच्या सभोंवतीं अगदीं लागून आहे. मागें ही त्वचा वित्रियस ह्यूमरवर खळगा आहे त्यांत बसते; पुढें हिच्या योगानें मागला आशय पूर्ण होतो. ही लेन्सच्या सस्पेन्सरी लिगमेंतनें जागच्या जागीं राहते.

**लेन्स** हा पारदर्शक आणि दोन्ही आंगास गोलबाह्य असा एक पिंड आहे, त्याची गोलबाह्यता मागील अंगास अंमळ अधिक आहे. ह्याची रुंदी म्हणजे एका बाजू पासून दुसऱ्या बाजू पर्यंत अंतर सुमारें $\frac{1}{3}$ इंच, व लांबी म्हणजे पुढून मागें अंतर सुमारें $\frac{1}{4}$ इंच आहे. ह्यांत समकेंद्रक थर आहेत, त्यांपैकीं केंद्राजवळचे फार कठीण आहेत. ह्याचे थर समांतर तंतूंचे असून, त्यांची व्यवस्था अशी आहे कीं, एका तंतूचें गोलबाह्य आंग दुसऱ्याच्या गोलांतरांत बसतें. लेन्समध्यें वय परत्वें फेरफार घडतात ते,– प्राणी गर्भावस्थेंत असतांनां हें गोलाकार व मृदु असतें.

प्रौढावस्थेंत मागील आंग पुढल्या पेक्षां विशेष गोलबाह्य असतें. हें पारदर्शक, स्वच्छ म्हणजे रंग रहित, व दृढ असतें.

वृद्धपणीं दोन्ही आंगें चापट होतात, रंग पिवळा अंबर म्हणजे तृणस्फटिक ह्या सारखा असतो, व हा अपार दर्शक व घट्ट होतो.

**सस्पेन्सरी लिगमेंत** ही बारीक व पारदर्शक त्वचा, कोराइदच्या सिलियरी प्रासेसेस व वित्रियस बादी ह्यांच्या मध्यें असते, आणि तिच्या योगानें रेतिनाची पुढली कड, लेन्सच्या पुढल्या भागास जुळते. हिच्या योगानें लेन्स जागच्या जागीं राहतें. हिच्या बाहेरील आंगास पुष्कळ चुण्या आहेत, त्यां मध्यें सिलियरी प्रोसेसेस ह्यांच्या आंतल्या चुण्या बसतात. ह्या चुण्या लेन्स भोंवतीं समकेंद्रक त्रिज्यां प्रमाणें लागल्या आहेत, आणि मध्यें मध्यें सिलियरी प्रोसेसेस ह्यांच्या रंगाचे छट्टे आहेत. सस्पेन्सरी लिगमेंतास बाहेरील व आंतील असे दोन थर आहेत. बाहेरील थर सिलियरी प्रोसेसेस ह्यांचें

आंतील आंग आच्छादून त्यांच्या मोकळ्या शेंड्या पर्यंत पोहोंचतो; आंतील थर लेन्सच्या आच्छादनाच्या पुढील आंगाच्या घेरा पर्यंत पोहोंचतो. सस्पेन्सरी लिगमेंतच्या मागें हैलैद त्वचा आहे, व हे दोन्ही भाग पेतीत ह्याच्या नळानें परस्परां पासून सोडविले आहेत.

नेत्रपिंडाच्या धमन्या लहान, लांब, व पुढील सिलियरी, व आर्तिरिया सेंत्रलिस रेतिना ह्या होत. ह्या सर्वांचें वर्णन आफ्थाल्मिक् धमनीच्या वर्णनांत केलें आहे.

## नेत्राचे अनुषंगिक भाग.

ह्यांत भंवया, कांजेंक्तैवा, व ल्याक्रिमल् अपरेतस म्हणजे अश्रुसामग्री, हे भाग आहेत. ही सामग्री ल्याक्रिमल् ग्ल्यांद, म्हणजे अश्रुपिंड, ल्याक्रिमल् स्याक् म्हणजे अश्रुआशय, व नेजल् दक्त म्हणजे नाकांतील आश्रुवाहिनी, अथवा नळ, इतके मिळून होते.

प्रत्येक आश्रुकोशाच्या वरच्या बाजूस जे कातड्याचे कमानी सारख्या-आकाराचे भाग दिसतात, त्यांस **भंवया** म्हणतात. ह्यांवर पुष्कळ अरूंद आणि दाट केश वाकडे उगवलेले असतात. भंवयांस कांहीं स्नायु आहेत, त्यांच्या साहाय्यानें त्या नेत्रांत जाणाऱ्या उजेडाचें कांहीं अंशीं आकलन करतात, किंवा त्यास आवरतात.

नेत्राच्या पुढल्या बाजूस चलन पावणारे दोन पडदे आहेत, त्यांस **पापण्या** म्हणतात. दोहों पापण्यांपैकीं वरची लांब असून ज्यास्ती चलन पावण्या जोगी आहे, तिला उचलणारा लेवेतरप्याल्पिब्री नामक स्वतंत्र स्नायु आहे. पापण्या नेत्राचें संरक्षण करतात, व ते उघडले असतां जें दीर्घ वर्तुलाकार स्थान रिकामें पडतें, त्याच्या कोणांस त्यांच्या ठिकाणा वरून आंतील, व बाहेरील क्यांथै, म्हणतात. आंतल्या **क्यांथस** जवळ **लेकस् ल्याक्रिमेलिस्** म्हणून त्रिकोणाकार स्थान असतें. त्याच्या आरंभीं प्रत्येक पापणीच्या काठावर एक प्यापिला म्हणजे कंटक अथवा शंकूच्या आकाराचा ग्रंथि असतो, त्याच्या शेंड्यावर एक सूक्ष्म छिद्र असतें, त्यांस **पंक्ता ल्याक्रिमेलिस्** म्हणतात, व त्यापासून **ल्याक्रिमल् कनाल्** ह्याचा आरंभ होतो.

**पापण्यांची रचना.** पापण्या बाहेरून आंत पातळ चर्म, त्या खालची

अरियोलर त्वचा, आर्बिक्युलेरिस स्नायूचे तंतु, पापण्यां संबंधी कूर्चा, ह्या कूर्चांस अक्षिकोशाच्या कांठांशीं जुळविणारा फैब्रस त्वचेचा पडदा, मैबोमियन ग्ल्यांद, आणि कांजेंक्तैवा म्हणजे म्यूकस त्वचा, ह्या भागांनीं घटित आहेत. **मैबोमियन ग्ल्यांद** हे कूर्चा व कांजेंक्तैवा ह्यांच्या मध्यें असतात; हे वरच्या कूर्चेंत सुमारें तीस असतात, व खालचींत कांहीं कमी असतात. हे कातडयांतल्या सिबेशियस ग्ल्यांदचीच एक जाति आहेत. हे नळ्यांनीं घटित आहेत, त्या नळया ओळीनेंच लागल्या असून त्यांची लांबी कूर्चेच्या रुंदी इतकी असते. हे ग्ल्यांद एक जातीचा स्नेहयुक्त पदार्थ उत्पन्न करतात, त्याच्या योगानें पापण्या चिकटत नाहींत.

**कांजेंक्तैवा** ही नेत्राची म्यूकस त्वचा होय. हिचे दोन भाग असतात, एक भाग पापण्यांचें आंतलें आंग मढवितो, आणि दुसरा दुमडला जाऊन स्क्लिरातिक् व कार्निया ह्यांनां मढवितो.

**कांजेंक्तैवाचा पापण्यां संबंधी भाग** जाड व अपारदर्शक असून, त्यांत रक्तवाहिन्या फार आहेत. पापण्यांस मढविणारी त्वचा त्यांच्या कांठांपाशीं मैबोमियन ग्ल्यांदच्या नळास मढविणाऱ्या म्यूकस त्वचेशीं, व ल्याक्रिमल् कनाल् मधून ल्याक्रिमल् स्याक व नेजल् दक्त ह्यांच्या त्वचेशीं सलग्न असते.

**स्क्लिरातिक् ह्यास वेष्टणारी कांजेंक्तैवा** पातळ व पारदर्शक आहे. हिजमध्यें पापण्यांच्या कांजेंक्तैवा पेक्षां रक्तवाहिन्या कमी आहेत. कार्नियास मढविणारी कांजेक्तैवा स्क्लिरातिक्च्या कांजेंक्तैवा पेक्षां पातळ आहे, व तिजमध्यें रक्तवाहिन्या मुळींच नाहींत.

**क्यारंक्युला ल्याक्रिमोलिस** हा तांबूस व शंकूच्या आकाराचा पिंड नेत्राच्या आंतल्या कोणापाशीं जें त्रिकोणाकार स्थान आहे त्यांत असतो, ह्यांत मैबोमियन ग्ल्यांद पुष्कळ आहेत, व ह्या पासूनच नेत्राच्या आंतल्या कोणापाशीं जमणारें चिपडें उत्पन्न होतें.

पापण्यांच्या मोकळ्या कांठांवर बद्ध असणाऱ्या आखूड, जाड, व वाकडया, केशांस पापण्यांचे केश म्हणतात, हे कधीं कधीं एकेरी व कधीं कधीं दुहेरी लागले असतात.

## अश्रूंचा संज. ल्याक्रिमल् आपरेतस.

ल्याक्रिमल् ग्ल्यांद् म्हणजे अश्रु उत्पन्न करणारे पिंड; अश्रूंस नेत्रपिंडाच्या पृष्ठ भागावर आणणाऱ्या वाहिन्या; ह्या वाहिन्यांतून ल्याक्रिमल् स्याक म्हणजे अश्रुआशय, ह्या मध्यें, अश्रु नेणारे ल्याक्रिमल् कनाल् म्हणजे नळ; आणि स्याक मधून त्यांस नाकाच्या खांचेंत नेऊन सोडणारे नेज़ल् दक्त म्हणजे नाकांतील अश्रुवाहिन्या अथवा नळ;हे सर्व भाग मिळून अश्रूंचा संज होतो.

**ल्याक्रिमल् ग्ल्यांद** हा फ्रांतल् अस्थीच्या बाहेरील कोणाच्या आंतल्या आंगावर जो खळगा आहे, त्यांत वसतो. हा अंडाकार असून आकृतीनें व आकारमानानें बदामा एवढा आहे. वरील गोलबाह्य आंग कोशाच्या पेरियास्तियमवर म्हणजे अस्थित्वचेवर टेंकतें, आणि खालचें आंग नेत्रपिंडाच्या गोलबाह्य आंगावर, व वरील आणि बाहेरील रेक्तस स्नायूंवर टेंकतें, ह्याची घडण व साधारण आकार हीं लाळ उत्पन्न करणाऱ्या पिंडांसारखीं असतात, व ह्याच्या सात अश्रुवाहिन्या असतात, त्या कांहीं अंतर पानेतां कांजेंक्तैवाच्या खालून गेल्यावर पुष्कळ सूक्ष्म छिद्रांनीं त्याच पडद्याच्या वरील भागावर सुटतात.

**क्यारंक्युला ल्याक्रिमेलिस** हें लेकस ल्याक्रिमेलिस नामक त्रिकोणाकार स्थानांत असतें. त्या स्थानाच्या बाहेरील टोंकास जीं पंक्ताल्याक्रिमेलिया, ह्या नांवाची दोन सूक्ष्म छिद्रें आहेत, त्यां पासून **ल्याक्रिमल् कनाल्** ह्याचा आरंभ होतो.

नाकाच्या नळाचा वरला फुललेला शेंडा असतो, त्यास **ल्याक्रिमल् स्याक** म्हणतात. हा ल्याक्रिमल् अस्थि व वरच्या म्याक्सिलरीचा नाकाचा भाग, हीं मिळून जी एक खोल खांचणी होते तींत असतो. हा वर गोल असून बंद आहे, आणि खालीं नेज़ल्दक्त ह्याशीं सलग्न होतो. हा म्यूकस त्वचेनें मढलेल्या फैब्रस त्वचेच्या स्थितिस्थापक पडद्यानें झाला आहे. म्यूकस त्वचा खालीं नाकाच्या म्यूकस त्वचेशीं, व वर कनालीक्युलैमधून कांजक्तैवाशीं सलग्न आहे.

**नेज़ल् दक्त** म्हणजे नाकाचा नळ हा त्वचेनें घटित असून $\frac{1}{2}$ इंच लांब असतो. हा ल्याक्रिमल् स्याक ह्याच्या खालच्या भागा पासून नाकाच्या खालच्या मियेतस पर्यंत पोहोंचतो. ह्या ठिकाणीं ह्याचें तोंड पसरलेलें असून,

त्यास एक म्यूकस त्वचेचा अपूर्ण वोहक म्हणजे पडदा असतो. हा वरचें म्याक्सिलरी, ल्याक्रिमल्, व खालचें त र्बिनेवेद, ह्या अस्थींच्या योगानें झाले ल्या नळांत असतो. हा दोहों टोंकांपेक्षां मध्यें बारीक असून खालीं, मागें, व किंचित् बाहेर, झुकला आहे.

## कर्णेंद्रिय.

**कर्णेंद्रिय** हें, बाहेरील, आंतील, व मधील, अशा तीन भागांनीं झालें आहे.

कर्णेंद्रियाचा **बाहेरील भाग**, हा ज्यास कान म्हणतात तो, व त्या पासून जाणारी नळी जिला कर्णेंद्रियाचें बाहेरलें छिद्र म्हणतात ती, ह्या भागांनीं झाला आहे. कानास **आरिक्ल्** म्हणतात, व हा कातडयानें आच्छादिलेल्या कूर्चेनें युक्त आहे. हा अंडाकार असून वांकला जाऊन एक खोल खळगा होतो, त्यास **कोंका** असें म्हणतात. बंधनें व स्नायु ह्यांच्या योगानें कान मस्तकाच्या बाजूस जुळला आहे.

कर्णेंद्रियाचा नळ सुमारें $1\frac{1}{4}$ इंच लांब असून पुढें व आंत झुकला आहे, आणि त्याला किंचित् बांक आहे. ह्या नळा मधून हवेच्या लाटा तिंपनमूला जातात.

ह्या नळाचा कूर्चायुक्त भाग, सुमारें अर्धइंच लांब व अत्यंत हलवया जोगा आहे.

अस्थियुक्त भाग सुमारें $\frac{3}{4}$ इंच लांब आहे.

ह्या नळाच्या छिद्राजवळच्या कातडयावर तेलकट पदार्थ उत्पन्न करणारे ग्ल्यांद, केश, आणि कित्येक सिरुमिनस ग्ल्यांद आहेत, ते विपुल मल उत्पन्न करतात, त्याच्या योगानें बाहेरील पदार्थांस आंत शिरण्यास प्रतिबंध होतो.

## कर्णेंद्रियाचा मधला भाग अथवा तिंपनम्.

**तिंपनम्** हें वांकडें तिकडें विवर बाहेरून आंत दबत गेलें आहे. हें पीत्रस अस्थीमध्यें असतें. ह्याची पुढून मागें लांबी सुमारें पांच लैन, उंची तीन लैन, आणि रुंदी दोन अथवा तीन लैन, ह्या प्रमाणें आहेत. ह्या भागास बाहेर मेंब्रेनातिंपनै नामक पडदा, आंत कर्णेंद्रियाच्या आंतल्या भागाचें बाहेरील आंग, मागें म्यास्तैद अस्थींतलीं छिद्रें, व पुढें कर्णनळी (युस्टेकियनट्यूब), ह्या प्रमाणें मर्यादा आहेत.

## कर्णेंद्रियाचा उभा छेद




१ आरिकल् किंवा बाहेरचा कर्ण. २ त्याचा कांका नामक भाग. ३ झांपा. ४ बाहेरील कर्णाचा नळ. हा कांहीं अंशीं कूर्चायुक्त, व कांहीं अंशीं अस्थियुक्त आहे. ५ तिंपनम्-चा पडदा. ६ तिंपनम्चें विवर किंवा मधला कर्ण. ७ म्यालियस हें कर्णांतील लहान अस्थींपैकीं एक होय, ह्याच्या प्रत्येक बाजूस एक एक अशीं दुसरीं दोन अस्थि रि-सत आहेत. ८ तेन्सर तिंपनै स्नायु. ९ युस्तेकियन नळी. १० पीमस अस्थींत गढ-ळेले तीन अर्धवर्तुलाकार नळ. ११ आंतील कर्णाचा विस्तिब्युल भाग. १२ काक्लिया.

तिंपनम् मध्यें तीन लहान अस्थींची सांखळी आहे, त्या अस्थींस मागून पुढें **म्यालियस, इंकस, व स्टेपीज**, असें म्हणतात. हीं अस्थि तिंपनम् पासून फिनिस्ट्रा ओवेलिस नामक पडद्या पर्यंत ध्वनीचे धक्के पोहोंचवितात. हीं बाहेर, **मेंब्रेनातिंपनै** पडद्यास, आणि आंत **फिनिस्त्रा ओवेलिस** पडद्यास बद्ध आहेत. हीं परस्परांशीं बंधनांनीं जुळलीं आहेत, व लहान स्नायूंच्या योगानें गति पावतात, तेणेंकरून वर सांगितलेला पडदा शिथिल अथवा ताठ होतो.

## कर्णेंद्रियाचा आंतिल भाग.

हा भाग कर्णेंद्रियाच्या सर्व भागांमध्यें अत्यंत महत्वाचा आहे. हा तेंपरल् अस्थीच्या पीत्रस भागांतल्या कित्येक लहान पोखरलेल्या विवरांनीं घटित असून, बाहेर **फिनिस्त्रा ओवेलिस व फिनिस्त्रारोतंदा** ह्या छिद्रांतून तिंपनम्शीं, आणि आंत आदितरी मज्जातंतु ज्या नळांत असतो, त्या नळाशीं ह्याचा संयोग आहे. ह्यास ह्याच्या बिकट रचने वरून **ल्याबरिंथ** म्हणजे घोटाळ्याचें स्थळ म्हणतात. ह्याचे मुख्य तीन भाग मानले आहेत. एक मधलें विवर अथवा **विस्तिब्यूल्**, ह्याच्या पुढें, **काक्लिया** म्हणून गोगलगायीच्या कवची सारखें नागमोड इंद्रिय आहे, आणि मागें, विस्तिब्यूल्मध्यें तीन **अर्धवर्तुलाकार** नळ ज्यांस **सेमिसर्क्युलर कनाल्स** म्हणतात, ते येऊन सुटतात. काक्लियास मज्जातंतु जातात, व त्यामध्यें प्रवाही पदार्थ असतो मेंब्रेनस म्हणजे त्वचेचें ल्याबरिंथ अस्थीच्या ल्याबरिंथच्या आंत असतें, व त्या अस्थीच्या ल्याबरिंथांत प्रवाही पदार्थ असतो. त्वचेच्या ल्याबरिंथावर आदितरी मज्जातंतूच्या शेवटील शाखा वांटल्या जातात, व त्याच्या आंतही प्रवाही पदार्थ असतो. ह्याच्या विस्तिब्यूल् कडल्या भागांत थोडासा चुनखड्या सारखा पदार्थ असतो, तोच इतर जातीच्या प्राण्यांच्या कर्णांत लहान दगडा सारखा असतो.

ध्वनि उत्पन्न करणाऱ्या हवेच्या लाटा पूर्वीं वर्णिलेल्या कर्ण संबंधी भागांपासून, कर्णेंद्रियाच्या आंतील भागांस जातात, व तेथें त्यांचा आदितरी मज्जातंतूशीं संबंध झाला म्हणजे ध्वनीचें ज्ञान होतें.

# भाग सातवा.

## अंतरवयव. विसरा.

### पचनेंद्रियें.

अन्न पचनाचा संज हा अन्न मार्ग, व दुसरीं किती एक सहायकारी इंद्रियें, ह्यांनीं झाला आहे.

अन्नमार्ग सुमारें तीस फूट लांब असून, तोंडा पासून गुदा पर्यंत पोहोंचतो. हा म्यूकस त्वचेनें मढविलेला स्नायुयुक्त व त्वचायुक्त भाग होय. अन्नापासून धातुप उत्पन्न करणें, व धातुपाचें रक्तांत शोषण झालें म्हणजे मल विसर्जन करणें, हाच अन्न मार्गाचा व त्याच्या सहायकारी इंद्रियांचा उपयोग जाणावा.

### अन्नमार्ग. अलिमेंतरी कनाल्.

**मौथ .... तोंड.**

**फेरिंक्स .. सप्तपथ.**

**इसाफगस. . गलमार्ग.**

**स्तमक् .. पक्वाशय.**

लहान आंतडें { दूओदीनम्. जजूनम्. इलियम्.

**मोठें आंतडें** { सीकम्. कोलन. रेक्तम्.

### सहायकारी इंद्रियें.

**तीथ .... दंत.**

स्यालिवरी ग्ल्यांद म्हणजे लालोत्पादक पिंड { परातिद. सबूम्याक्सिलरी. सबूलिंग्वल्.

लिवर .... काळिज.

प्यांक्रिज.

स्प्लीन .... प्लीहा.

तोंड ही अंडाकार खांच अन्नमार्गाच्या आरंभीं आहे. ही गुलाबी रंगा-

च्या म्यूकस त्वचेनें मढलेली आहे, ती त्वचा पुढें ओठांच्या, व मागें घशाच्या म्यूकस त्वचेशीं संलग्न आहे. तोंडास पुढें ओंठ; मागें तालूचा नरम भाग व घसा; वर तालूचा कठिण भाग व वरील दांत; खालीं जीभ आणि खालचे दांत; ह्या मर्यादा आहेत. तोंडामध्यें चर्वण व अन्नाशीं लाळेचें मिश्रण होतें.

**ओंठ** हे दोन मांसवत् पडदे तोंडाचें छिद्र वेष्टितात. हे बाहेरून चर्मानें, आंतून म्यूकस त्वचेनें, आणि मध्यें आर्बिक्युलेरिस स्नायूनें घटित असून, म्यूकस त्वचेच्या एका पडद्यानें हिरड्यांशीं जुळले आहेत. ओठाचे ग्ल्यांद गोल व लहान वांटाण्या एवढे आहेत. ह्यांची रचना लाळ उत्पन्न करणाऱ्या ग्ल्यांद सारखी आहे, व हे म्यूकस त्वचेच्या खालीं असून तिजवर सुटतात.

**गल्ल.** गालांनीं मुखाच्या बाजू पूर्ण होतात; ह्यांची रचना ओठां सारखी आहे, ह्यांवर वरच्या दुसऱ्या दाढे जवळ एक कंटक असतो, त्याच्या शेंड्यावर परातिद्च्या लाळ वाहिनीचें सूक्ष्म छिद्र आहे. बक्सिनेतर व दुसरे कांहीं स्नायु मिळून गाल झाले आहेत. गालाचे ग्ल्यांद ज्यांस बक्लू ग्ल्यांद म्हणतात ते, ओठांच्या ग्ल्यांद सारखे आहेत.

**हिरड्या.** ह्या म्यूकस त्वचेनें आच्छादिलेल्या दृढ फैब्रस त्वचेनें घटित असून, अल्वियोलर भागांस आच्छादणाऱ्या अस्थित्वचेशीं जुळल्या आहेत. ह्या दंताच्या मानेस वेष्टितात.

## दंत. तीथ.

मनुष्यास दोन जातीचे दांत येतात, त्यांत **कच्चे** अथवा दुधाचे दांत, चार छेदक, दोन शूल, आणि चार दाढा, असे प्रत्येक दाभाडांत दहा, व दोन्ही दाभाडांतले धरून एकंदर वीस असतात. **पक्के** अथवा अन्नाचे दांत प्रत्येक दाभाडांत सोळा ह्या प्रमाणें बत्तीस असतात. ते, ४ छेदक, दोन शूल, चार **द्वय्ग्र**, आणि सहा दाढा, हे होत.

प्रत्येक दांतास तीन भाग असतात. एक हिरडीच्या वरतीं वाढून आलेला भाग अथवा **शेंडा**, दुसरा दांताच्या खळींत झांकलेला भाग अथवा **मुळी**, आणि ह्या दोहोंच्या मधला आकुंचित् झालेला भाग अथवा **मान**, असे आहेत. ख-

ळींत झांकलेला भाग त्या ठिकाणच्या अस्थिमज्जेनें मढला आहे. वरचे दांत खालच्यां पेक्षां मोठे असून, त्यांच्या पुढें वाढून आले असतात.

**कच्चे दांत** पक्क्या दांतां सारखेच असतात. ते पुढील अनुक्रमा प्रमाणें निघतात, त्यांत खालचे अधीं निघतात,–७ व्या महिन्यांत मधले छेदक; ७ व्या पासून १० व्या महिन्या पर्यंत बाजूचे छेदक; १२ व्या पासून १४ व्या महिन्या पर्यंत पुढील दाढा; १४ व्या पासून २० व्या महिन्या पर्यंत शूलदंत; आणि १८ व्या पासून ३६ व्या महिन्या पर्यंत मागील दाढा.

**पक्के दांत.** छेदक ( इन्सैजर )दंत पुढल्या आंगास मध्यरेषे जवळ असतात. ह्यांनां एकच मुळी असते, व ह्यांचा शेंडा अन्नादि पदार्थांचें छेदन करावया जोगा तीक्ष्ण असतो. **शूलदंत** ( कनैन ) अथवा नेत्रदंत हे श्वान जातीच्या प्राण्यांत जे दंत अत्यंत पूर्णस्थितींत आसतात, त्यां सारखेच आहेत. हे मांसादि पदार्थ कुरतुडण्यास व फाडण्यास उपयोगी आहेत; हे मोठे व त्रिकोणाकार असून छेदक दंतांच्या पलीकडे असतात. **द्व्यग्रदंत.** ( बैकस्पिद ) शूल दंतांच्या मागें असतात. ह्यांच्या शेंडयावर दोन ग्रंथि असतात, व बहुधा एकच मुळी असते, तिजवर दुभागण्याचें चिन्ह असतें. ह्यांच्या पलीकडे **दाढा** ( मोलर्स ) असतात, आणि त्या सर्व दंतांपेक्षां मोठ्या असतात. ह्यांचा शेंडा रुंद असून त्यावर ४ अथवा ५ ग्रंथि असतात, आणि मुळीचे २ पासून ६ पर्यंत विभाग असतात, दाढा व द्व्यग्रदंत ह्यांचे शेंडे रुंद असल्या मुळें, हे दंत अन्नाचें चर्वण करण्यास अत्यंत उपयोगी आहेत.

पक्के दांत खालीं लिहिलेल्या वेळेस निघतात. खालचे वरल्यांच्या अधीं निघतात. ६ $\frac{1}{2}$ वर्षांनीं पुढल्या दाढा; ७ पासून ८ वर्षांपर्यंत छेदक दंत; ९ पासून १० वर्षांपर्यंत द्व्यग्रदंत; ११ पासून १२ वर्षांपर्यंत शूलदंत; १२ पासून १३ वर्षांपर्यंत मागल्या दाढा; १७ पासून २१ वर्षां पर्यंत अक्कल दाढा. अक्कल दाढा कधींकधीं सांठ वर्षांपर्यंत येत नाहींत.

**दांतांची रचना.** दांतांचा उभा छेद केला तर, त्यांत रक्तवाहिन्यांनीं अत्यंत व्याप्त आणि अत्यंत तीव्र स्पर्शज्ञानविशिष्ट अशा गीरयुक्त मांसल पदार्थानें भरलेली खांच आहेशी दिसते. गीरयुक्त पदार्थांस दांताच्या मुळीच्या

शेंड्यावरल्या छिद्रांतून रक्तवाहिन्या येतात, व ह्या पदार्थास **पल्प** म्हणतात; ज्या खाचेंत हा पदार्थ असतो, तिला **पल्पक्याविती** म्हणतात. दांताचें मुख्य द्रव्य सूक्ष्म व समांतर नळ्यांनीं युक्त असून, खांचेच्या सभोंवतीं लागलेलें आहे, त्या नळ्या खांचेंत जाऊन सुटतात. हा भाग खनिज व प्राणिज अंशांनीं घटित आहे. खनिज अंशांत कार्बोनेत आफ्लैम्, फासफेत् आफ्लैम्, फासफेत् आफ् म्याग्नीशिया, आणि फ्लोरैद् आफ् क्याल्सियम् हे पदार्थ असतात. ह्या कठिण भागास **ऐवरी** किंवा **दैंतीन** म्हणतात. दैंतीनमध्यें शेंकडा २८ भाग प्राणिजांश, आणि ७२ भाग पार्थिवांश असतो. दंत उकळले असतां दैंतीनच्या प्राणिजांशाचें जेलतीन होतें.

दांताचा मोकळा भाग अथवा **शेंडा** एका पातळ पापोदऱ्यानें आच्छादिला आहे, व तो पापोदरा सूक्ष्म समांतर व षट्कोण छड्यांनीं घटित आहे. ह्या पापोदऱ्यास **इन्यामल्** म्हणतात. ह्याचे घटक पदार्थ दैंतीन ह्याच्या घटक पदार्थां सारखेच असतात, इतकेंच कीं, ह्यांत प्राणिजांश कमी असतो. ह्यांत शेंकडा ९६.५ भाग पार्थिवांश, आणि ३.५ भाग प्राणिजांश असतो, ह्यामुळें इन्यामल् हा दंताच्या सर्व भागांपेक्षां कठिण आहे.

दांतांच्या शेंड्यावर पातळ अस्थिवत् आच्छादन असतें, त्यास **क्रस्तापित्रोजा** म्हणतात. ह्याची रचना व घटना ह्या, अस्थींप्रमाणें असतात.

### **दंतांचा आविर्भाव** किंवा उत्पत्ति.

गर्भाच्या दाभाडाच्या कमानीच्या कांठांस मढविणाऱ्या म्यूकस त्वचेपासून दंतांचा आविर्भाव होतो, असें अरनोल्द व गुदसर ह्यांच्या शोधा वरून सिद्ध झालें आहे. ह्यां कमानींस म्याक्सिलरी आर्चेस म्हणतात. गर्भ सहा आठवड्याचा झाला म्हणजे, वरच्या दाभाडाच्या कांठांस मढविणाऱ्या म्यूकस त्वचेंत एक अर्धवर्तुलाकार खांचणी दिसते, तिला **प्रिमितिव दैंतल् ग्रूव** म्हणतात. ह्या खांचणीच्या जमीनी पासून दुधाच्या दहा दांतांचीं बीजें निर्माण होतात. प्रत्येक दांताचें बीज म्यूकस त्वचेच्या शंक्वाकृति उंचवट्यानें किंवा कंटकानें होतें; हें बीज दुधाच्या दांताच्या मांसल भागाचें मूळबीज होय. दुधाच्या दांतांचीं बीजें पुढें लिहिलेल्या क्रमानें निर्माण होवात,— सातव्या आठवड्यांत वरच्या दाभाडाच्या पहिल्या दाढेचें बीज; आठव्या आठ-

वड्यांत शूल दंताचें बीज; नवव्या आठवड्यांत दोन छेदक दंतांचीं बीजें, ह्यांत मधल्यांचीं बाजूच्यांच्या आधीं निर्माण होतात; आणि दहाव्या आठवड्यांत पहिलीच्या मागें दुसऱ्या दाढेचें बीज; अशीं निर्माण होतात. खालच्या दाभाडाचे दांत कांहींसे मागाहून निघतात, सातव्या महिन्यांत पहिल्या दाढेचा कंटक फक्त दिसूं लागतो, आणि दहावा कंटक अकराव्या आठवड्याच्या अधीं निघत नाहीं. ह्या फेरफारांस प्यापिलरी स्तेज म्हणजे कंटक उत्पत्तीचे फेरफार म्हणतात.

आतां वर सांगितलेली खंचणी आकुंचित होते, तिचे कांठ घट्ट व ठळक होतात, आणि हे कांठ एक प्रकारच्या त्वचेच्या पडद्याच्या योगानें परस्परांशीं जुळून कंटकां साठीं फालिकल्स म्हणजे आशय होतात. हे आशय दांत राहण्याच्या अल्वियोलै म्हणजे खाचा होत, ह्यांच्या आंतल्या अंगास पेरियोस्तियम्‌चें आच्छादन असतें. पहिल्या दाढेचा आशय दाहाव्या आठवड्याच्या सुमारास पूर्ण होतो, नंतर शूलदंतांचे आशय होतात, ह्यांच्या मागून व अकराव्या किंवा बाराव्या आठवड्याच्या सुमारास छेदक दंतांचे आशय निर्माण होतात, शेवटीं, चवदाव्या आठवड्याच्या सुमारास दुसऱ्या किंवा मागच्या दाढेचा आशय पूर्ण होतो. ह्या फेरफारांस फालिक्युलर स्तेज म्हणजे दांतांच्या खाचा किंवा आशय उत्पन्न होण्याचे फेरफार म्हणतात.

तेराव्या आठवड्याच्या सुमारास कंटक लवकर वाढूं लागतात, विशेष ठळक होतात, आणि त्यांस पुढें निर्माण होणारे जे दांत त्यांची आकृति येते. आशयही लवकरच विशेष खोल होतात, आणि त्यांच्या कांठां पासून त्वचेचे अंकुर वाढून येऊन व ते एकत्र जुळून आशय बंद होतात. ह्या अंकुरांस अपर्क्युला म्हणतात, आणि ह्यांच्या संयोगानें जो पडदा होतो, तो त्या आशयांवर झाकणा सारखा बसलेला असतो. ह्या अंकुरांची आकृति पुढें होणाऱ्या दांताच्या शेंड्याच्या आकृति सारखी असते. आणि अंकुरांची संख्या दांताच्या शेंड्या वरच्या ग्रंथींच्या संख्ये बरोबर असते. अशा प्रकारें हे आशय बंद होतात व दांताचें विवर होतें, आणि कंटका पासून विवरांतलें मांसल द्रव्य होतें. आतां प्रथम सांगितलेल्या अर्धवर्तुळाकार खंचणीचे कांठ उत्तरोत्तर परस्परांच्या जवळ जवळ येऊं लागतात, आणि शेवटीं संयोग पाव.

तात, तेणें करून ती खंचणी बंद होते म्हणजे नाहींशी होते. हे फेरफार पंधराव्या आठवड्याच्या शेवटास घडतात, आणि ह्यांस स्याक्युलर स्टेज म्हणतात. हे फेरफार खंचणीच्या खालच्या भागांत चालू असतात, आणि खंचणीचा वरचा भाग कांहीं अशीं मोकळाच असतो.

मुळच्या खंचणीचा खालचा भाग आतां बंद झालेला असतो, परंतु वरचा किंवा उथळ भाग मोकळा असतो, आणि ह्या शेवटील भागा पासून पुढच्या दहा पक्क्या दांतांचा आविर्भाव होतो. मूळबीज स्थितींत असणारे जे दुधाचे दांत त्या प्रत्येकाच्या आशयाच्या मागें, चवदाव्या आठवड्याच्या सुमारास अर्धचंद्राकार खाचण्या निर्माण होतात. प्रत्येक दाभाडांत अशा दहा खाचण्या होतात, ह्यां पासून दहा पक्क्या दांतांचे आशय पूर्ण होतात. हे आशय पुढून मागें आविर्भूत होतात ते असे,—प्रथम चार छेदक दंतांचे, नंतर दोन शूल दंतांचे, आणि शेवटीं चार द्व्यग्र दंतांचे आशय पूर्ण होतात. मूळच्या खंचणीचा वरचा भाग बंद झाला म्हणजे, दुधाच्या दांताच्या आशया प्रमाणें हे आशयही अगदीं बंद होतात, आणि ह्यांच्या बुडा पासून एक कंटक निघतो. हा कंटक पक्क्या दांताचें बीज होय.

प्रत्येक दाभाडांतले पक्के सहा दांत म्हणजे प्रत्येक बाजूचे तीन तीन दांत हे मुळच्या खंचणीचा मागें प्रसार होऊन निर्माण होतात.

**दंतांची वृद्धि.** दंतांचे आशय निर्माण झाले म्हणजे, ते आशय त्यांतल्या कंटकांसह मोठे होऊं लागतात. आशय दोन थरांनीं झालेले असतात; आंतला थर रक्तवाहिन्यांनीं झालेला असतो, आणि बाहेरला अरियोलर फैब्रस त्वचेचा असतो.

कंटकांस आतां देंतूल् पल्प्स म्हणतात, आणि ह्यांची आकृति पुढें निर्माण होणाऱ्या दांतां सारखी होते. कंटकांचीं बुडें खालीं दांतांच्या आशयास बद्ध असतात, आणि ह्या बुडां पासून दांतांच्या मुळ्या निर्माण होतात. जितक्या मुळ्या होणें असतील, तितकेच कंटकांच्या खालच्या भागाचे विभाग होतात. गर्भ चार किंवा पांच महिन्याचा झाला म्हणजे दुधाच्या सर्व दांतांच्या कंटकांच्या ठळक भागावर दंतीनचा पातळ थर निर्माण होतो. छेदक व शूल ह्या दंतांच्या थरांची आकृति पोकळ शंकु सारखी असते, दाढां-

च्या शेंड्यांवर जितके ग्रंथि तितकेच त्यांच्या कंटकांवर देंतीनचे थर निर्माण होतात. जसजशी देंतीनची वृद्धि होऊं लागते तसतसें कंटकाचें द्रव्य कमी कमी होत जातें, आणि शेवटीं तें अगदीं नाहींसें होतें. ही वृद्धि बाहेरून आंत होत जाते, आणि ती होत असतां कंटकाचें द्रव्य मध्यभागीं आकुंचित होतें, तेणें करून दांताची मान होते.

देंतीनच्या उत्पत्तीस आरंभ झाला म्हणजे, दांताच्या आशयाच्या आंतल्या आंगून मृदु व मांसल द्रव्याचा आविर्भाव होतो. ह्या द्रव्यास इन्यामल् आर्गन म्हणतात, आणि ह्या पासून इन्यामल् उत्पन्न होतें. हें द्रव्य देंतीनच्या बाहेरून लागलें असतें.

क्रस्ता पित्रोजा ह्याची उत्पत्तिही अशीच होते. हा भाग इतरांच्या मागून निर्माण होतो.

**दंतांचा स्फोट.** दंतांचे निरनिराळे भाग दृढ होऊन त्यांस घर्षण व दाब सहन करण्याचें सामर्थ्य आलें म्हणजे दंतांचा स्फोट होऊं लागतो, किंवा ते बाहेर पडूं लागतात. दंत हे हिरड्यांतून बाहेर पडतात. दांताच्या शेंड्याच्या दाबानें हिरडीचें शोषण होतें, आणि मुळीचें आकारमान वाढल्या मुळें शेंडा वर ढकलला जातो. ह्याच वेळेस दांतांच्या आशयांच्या मध्यें जे फैब्रस त्वचेचे पडदे असतात, त्यांचें अस्थिभवन होतें, आणि अशा प्रकारें दांतांच्या खाचा होतात. ह्या खाचा दांतांच्या मानेस गच्च लागलेल्या असतात, आणि ह्यांच्या योगानेंच दांतांस दृढत्व येतें. दांत बाहेर पडण्याचा क्रम पूर्वीं सांगितलाच आहे.

## तालू. प्यालेत.

**तालू** तोंडाचें छत होतें, ती दोन भागांनीं घटित आहे. तालूचा कठिण भाग पुढें व बाजूस दांतांच्या कमानींनीं मर्यादिला आहे. हा अस्थित्वचा व म्यूकसत्वचा ह्यांनीं मढविला असून ह्याच्या मध्यावर एक सेवनी किंवा शिवण आहे. म्यूकसत्वचा सुरकुतलेली असून तिच्या खालीं कित्येक ग्लयांद आहेत.

तालूच्या कठिण भागाच्या मागल्या कांठा पासून टांगलेला फिरता पडदा जो तोंड व घसा ह्यांच्यामध्यें अपूर्ता पडदा होतो, तोच **तालूचा नरम भाग**

होय. हा म्यूकस त्वचेनें घटित आहे, आणि ह्यांत स्नायूचे तंतु, रक्तवाहिन्या, मज्जातंतु, व कित्येक ग्ल्यांद आहेत. ह्याच्या खालच्या कांठाच्या मध्या पासून प्रतिजिव्हा टांगली आहे, व हिच्या प्रत्येक बाजूस नरम भागाचे स्तंभ आहेत, त्यांस पिलर्स म्हणतात. **पुढचा स्तंभ** कमानी सारखा आहे, आणि पुढें व खालीं उतरतो. हा प्यालेतोग्लासस स्नायूनें घटित आहे, व स्नायूवर म्यूकस त्वचेचें आच्छादन आहे. **मागला स्तंभ** खालीं व मागें कमानी सारखा उतरतो; हा प्यालेतोफ्यारिंजियस स्नायूनें घटित आहे, व स्नायूवर म्यूकस त्वचेचें आच्छादन आहे.

**तान्सिल्.** हे बदामा एवढाले दोन ग्ल्यांद तालूच्या नरम भागाच्या पुढल्या व मागल्या स्तंभांच्या मध्यें आहेत, बाहेरील आंगानें आंतल्या करातिद धमनीस हे लागले आहेत, आंतल्या आंगावर कित्येक छिद्रें आहेत, त्यांतून ह्यांत उत्पन्न झालेला पदार्थ म्यूकस त्वचेवर येतो.

### लालोत्पादकपिंड. स्यालिवरीग्ल्यांद.

परातिद्, सबम्याक्सिलरी, व सबलिंग्वल्, हे लाळ उत्पन्न करणारे मुख्य ग्ल्यांद होत. ह्यांत निर्माण झालेली लाळ तोंडांत येते.

ह्यांपैकीं **परातिद** सर्वांत मोठा आहे, ह्याचें वजन $\frac{1}{2}$ पासून १ औंस असतें, ह्याचें स्थान कानाच्या पुढें मुखाच्या बाजूवर आहे. बाहेरील करातिद्, आंतली म्याक्सिलरी, मागची आरिक्युलर, त्रान्सवर्स फेशियल्, (आंतली करातिद ही ग्ल्यांदच्या खोल आंगास लागली आहे) व तेंपरल् ह्या धमन्या, फेशियल् मज्जातंतु, आणि आंतल्या करातिद धमनी जवळ आंतली जुग्युलरशिर, हे भाग ह्याच्या द्रव्यात गढले असतात. परातिदची वाहिनी किंवा नळ पुढें जाऊन बक्सिनेतर स्नायूस विंधितो, व वरल्या दुसऱ्या दाढे जवळ म्यूकस त्वचेवर सुटतो, ह्याला **स्तीनोचा दक्त** म्हणतात. हा नळ सुमारें अडीच इंच लांब असतो. कानाच्या लागलींच खालून व जिगोमा पासून एक बोट खालतीं मुखावरून आडवी रेषा काढून ती, वरचा ओंठ व नाकपुडी ह्यांच्या मधोमध आणली असतां ह्या नळाचा मार्गदर्शक होते. ह्याचा व्यास सुमारें कावळयाच्या पराच्या व्यासा बरोबर आहे. परातिद ग्ल्यांदला वर, जिगोमाची मर्यादा आहे; खालीं, खालच्या म्याक्सिलरी अस्थीचा कोण व

ह्या कोणा पासून स्तर्नोम्यास्तैद स्नायूस जाणारी कल्पितरेषा; पुढें, ह्या म्यासि- तर स्नायूवर थोडा फार पसरलेला असतो; मागें ह्यास कर्णाचें छिद्र, म्यास्तै- द भाग, व स्तर्नोम्यास्तैद स्नायु, ह्या मर्यादा असतात. ग्ल्यांदच्या "बाहेरील आंगास कावडें फाशिया व प्लातिज्मा ह्यांचें आच्छादन आहे, आणि ह्यावर एक दोन लिम्फ्यातिक ग्ल्यांद टेकतात; आंतलें आंग रेमसच्या मागच्या भागा- पासून म्यास्तैद् भागापर्यंत पोहोंचतें. ग्लांद चा आंतला भाग फार खोल आहे. ह्या वर ग्लीनैद खाचेच्या मागच्या भागांत बसतो; मागें व खालीं, ह्या स्तैलैद् भाग व स्तैलैद स्नायु ह्यां वर टेकतो; आणि पुढें, ह्या रेमसच्या खालून दोहों तेरिगैद् स्नायूंच्या मध्यें येतो.

**सब्म्याक्सिलरी** ग्ल्यांदचा आकार वांकडातिकडा असून ह्याचें वजन सु- मारें २ द्राम आहे. ह्या खालच्या दाभाडाच्या अस्थीच्या आंगाखालीं झांकला जातो, मैलोहैयैद व ह्यायोग्लासस स्नायूंवर टेंकतो, व प्ल्यातिज्मा व फाशिया ह्यांनीं आच्छादला आहे. ह्याची लालवाहिनी सुमारें दोन इंच लांब आ- हे, ती वर व आंत वळून जिव्हेला सिंफिसिसशीं जुळविणाऱ्या म्यूकस त्वचेच्या पडद्याच्या बाजूवर सुटते. हिला **व्हार्तनचादक्त** म्हणतात.

**सब्लिंग्वल्** ह्या सर्वांत लहान ग्ल्यांद मैलैहैयेद स्नायूच्या वरतीं सिंफिसि- सच्या बाजूवर जो खळगा आहे, त्यांत बसतो. ह्याच्या वाहिन्या ७ पासून २० पर्यंत असतात, त्या जिभे पासून सिंफिसि सला गेलेल्या पडद्याच्या प्र- त्येक बाजूवर सुटतात. ह्यांस **दक्तसरिविनिय नै** म्हणतात.

**रचना.** लाळ उत्पन्न करणारे ग्ल्यांद अरियोलर त्वचेनें एकत्र जुळलेल्या गड्ड्यांनीं घटित आहेत, ह्या कारणा वरून त्यांस कंग्लाम्नरेत ग्ल्यांद म्हणतात. प्रत्येक गड्डा अनेक लहान गड्ड्यांनीं झालेला असतो. लहान गड्डा बंद आ- शयांनीं झालेला असतो. आणि हे आशय एका सामान्य वाहिनींत सुटतात.

## सप्तपथ. फेरिंक्स.

**फेरिंक्स** ही स्नायुयुक्त व त्वचायुक्त सुमारें चार इंच लांब थैली, मस्तकाच्या बुडा पासून मानेच्या पांचव्या मणक्या ज वळ क्रैकैद कूर्चे पर्यंत पोहोंचते. फेरिं- क्स हें नासिक, तोंड, व लेरिंक्स, ह्यांच्या मागें आहे. ह्याचें बूड वर व तोंडा- खालीं अशीं झुकलेलीं आहेत. आडवा व्यास सर्वांत अधिक आहे. वर

## मस्तकाचा उभा छेद; ह्यांत नाक, फेरिंक्स इत्यादिभाग दिसतआहेत




१ कपाल्यससेरीब्री. २ तिंतोरियम् सेरिबेलै. ३ आरंभाजवळ ल्यातरल्सैनसच्या छेद. ४ कण्याच्या नळ. ५ नासिकाचें विवर, ६, ७, ८, तीन तर्बिनेतेद अस्थि, ह्यांच्यामध्यें तीन मीयेतस आहेत. ९ युस्टेकियन नळीचें छिद्र. १० तालूचा कठिण भाग, नरमभाग ह्यास लागून आहे. ११ घशाचे मागचे स्तंभ. १२ पुढचे स्तंभ. १३ तान्सिल्. १४. १४ फेरिंक्सचें विवर. १५ जिव्हा. १६ तोंडाचें विवर. १७ लेरिंक्सचें छिद्र रक्षणारा एपिग्लातिस पडदा. १८ लेरिंक्सचें विवर. १९ रैमाग्लातिदिस. २० त्रकीया. २१ इसाफगस.

ह्यास ऑक्सिपतच्या ब्याजिलर भागाची मर्यादा आहे; खालीं हें इसाफगस-शीं सल्लग्न आहे; मागें हें कण्यावर टेंकतें; आणि पुढें हें अनुक्रमें करून आंतला तेरिगैद पडदा, तेरिगोम्याक्सिलरी बंधन, खालचें दाभाड, जिव्हा, हैयैद अस्थि, आणि लेरिंक्स, ह्या भागांस बद्ध आहे; बाजूनें हें स्तैलैद भाग व त्यापासून निघणारे स्नायु ह्या भागांस जुळलें असून, कामन करातिद व आंतली करातिद ह्या धमन्या, आंतली जुग्युलरशीर, आणि ८वा, ९वा, आणि सिंपथेतिक् मज्जातंतु, ह्या भागांस लागले आहे.

फेरिंक्समध्यें सात छिद्रें येऊन मिळतात,—दोन नासिकाचीं मागील छिद्रें, २ कर्णेंद्रियाच्या नळीचीं, १ तोंडाचें, १ लेरिंक्सचें, व १ इसाफगसचें.

**रचना.** फेरिंक्सला आंतला म्यूकस त्वचेचा, मधला फैब्रस त्वचेचा, आणि बाहेरचा स्नायुयुक्त त्वचेचा, असे तीन पडदे आहेत. ह्याच्या म्यूकस त्वचेच्या पडद्याच्या खालीं कित्येक लहान ग्ल्यांद आहेत.

**सप्तपथा पासून पक्वाशया पर्यंत जाणारी नळी. इसाफगस.**

ही त्वचायुक्त व स्नायुयुक्त नलिका सुमारें ९ इंच लांब आहे, व फेरिंक्स पासून पक्वाशया पर्यंत पोहोंचते. ही मानेच्या पांचव्या मणक्या समोर क्रैकैद कूर्चेच्या खालच्या कांठा पासून चालू होऊन, मागच्या मीदियस्तैनम् मधून जाऊन दैफ्रम् मधल्या छिद्रांतून पक्वाशयाच्या कार्दियाक् शेंड्य जवळ संपते. हिचा साधारण झोंक उभा आहे, परंतु मार्गांत हिला एक दोन बाक आहेत. मानेच्या मुळा जवळ ही डावीकडे झुकलेली असते, ह्याच्या वरतीं व खालतीं ही नीट असते, शेवटीं पुनः डावीकडे वळते.

**संबंध.** मानेंत हिला पुढें त्रकीया; मागें कणा; व प्रत्येक बाजूस कामन करातिद धमनी व थैरैद ग्ल्यांद; ह्यांचा संबंध आहे. पिंजरामध्यें ती एयोर्ताच्या उजव्या आंगानें दैफ्रम्च्या छिद्रा पर्यंत उतरते. एथें पुढें त्रकीया, एयोर्ताची कमान, व पेरिकार्दियम्; मागें लांगसकोलै स्नायु, कणा, आणि खालीं किंवा दैफ्रम् जवळ एयोर्ताचा पुढचा भाग, ह्यांवर टेंकते; प्रत्येक बाजूस प्लूराचें आच्छादन आहे.

**रचना.** इसाफगसला तीन पडदे आहेत, बाहेरचा स्नायूचा, मधला सेल्युलर त्वचेचा, व आंतला म्यूकस त्वचेचा असे आहेत. स्नायूच्या पडद्या-

चे दोन थर आहेत, बाहेरील लांब लांब तंतूंनीं व आंतील चक्राकार किंवा आडव्या तंतूंनीं घटित आहे. वरील भागांतले तंतु आरक्त वर्ण असून त्यांवर आडवे पट्टे असतात, परंतु खालच्या भागांतल्यांवर ते नसतात.

म्यूकस त्वचेच्या पडद्याच्या खालीं इसाफगसचे ग्ल्यांद आहेत, ते पैंडद्याच्या मोकळ्या आंगावर सुटतात.

# पोट. अब्दोमन्.

पोट शरीरांतल्या सर्व विवरां पेक्षां मोठें आहे, हें अंडाकार असून ह्याचा उभा व्यास मोठा आहे. ह्यास वर दैफ्रम्; खालीं पेल्विसचा कांठ; मागें कणा व सोअस आणि क्वाड्रेतस लंबोरम् स्नायु; आणि बाजूस व पुढें फासळ्या व पोटाचे स्नायु; ह्या मर्यादा आहेत.

कित्येक भाग आंत जाण्या करितां व कित्येक बाहेर येण्या करितां पोटास हीं पुढील छिद्रें आहेत, इसाफगस, एयोर्ता व विनाकेवा, ह्यांसाठीं दैफ्रम्ला तीन छिद्रें आहेत, एक नाभीचें छिद्र, आणि इंग्विनल् व फेमरल् नळ, हीं दोन छिद्रें एकंदर सात मुख्य छिद्रें आहेत. एयोर्ताच्या छिद्रांतून वीना अजिगास मेजर व थोऱ्यासिक्‌दक्त आणि इसाफगसच्या छिद्रांतून न्यूमोग्यास्त्रिक् मज्जातंतु असे जातात.

ह्या खाचेंत अन्न मर्गाचा अर्ध्या पेक्षां अधिक भाग, काळीज, प्लीहा, व प्यांक्रीज, हीं पचन संबंधी सहायकारी इंद्रियें आहेत. ह्यां खेरीज ह्या खाचेंत मूत्रपिंड व सुप्रारिनल्‌क्याप्सूल्, हेही भाग आहेत. ही खांच व तींत असणारीं इंद्रियें पेरितनियम् नामक सीरूस त्वचेनें मढविलेलीं आहेत. वर्णन सुलभ होण्यास्तव पोटाचे निरनिराळे देश कल्पिले आहेत. आतां शरीरा सभोंवतीं एक नवव्या फासळीच्या कूर्चेशीं समांतर, व दुसरी इलियमच्या शिखेच्या अत्यंत उंच भागाशीं समांतर अशा वर्तुळ रेषा काढल्या तर, पोटाच्या खांचेचा वरला, मधला, व खालचा, असे तीन विभाग होतात. आतां आठव्या फासळीच्या कूर्चेपासून पूपार्तच्या लिंगमेंतच्या मध्यापर्यंत प्रत्येक बाजूस समांतर रेषा काढली तर, प्रत्येक विभागाचे मधला, व बाजूचे दोन, असे तीन प्रतिविभाग होतात. वरच्या विभागाच्या मधल्या देशास

पिंजर व पोट ह्यांच्या अंतर अवयवांचीं स्थानें दाखविणारी आकृति; स्तर्नम् व फासळ्यांच्या कूर्चा ह्यांची रूपरेषा बिंदूंनी दाखविली आहे.




* डैफ्रम्चें स्थान दाखविणारी रेषा. १ एपिग्यास्त्रिक् देश. २ उजवा हैपो कांद्रियाक्. ३ डावा हैपो कांद्रियाक्. ४ अंबलैकल् देश. ५ उजवा लंबर. ६ डावा लंबर. ७ हैपो-ग्यास्त्रिक् देश. ८ उजवा इंग्विनल्. ९ डावा इंग्विनल्. मोठें ओमेंतम् काढून टाकलें आहे.

**एपिग्यास्त्रिक्** म्हणजे पक्काशया वरचा, व बाजूंच्यास उजवा व डावा **हैपोकांद्रियाक्** म्हणजे कूर्चां खालचा देश म्हणतात. मधल्या विभागाच्या मधल्या देशास **अंबलैकल्** म्हणजे नाभीसंबंधी देश, व बाजूंच्यास उजवा व डावा **लंबर** म्हणजे कमरेचा देश म्हणतात. खालच्या विभागाच्या मधल्या देशास **हैपोग्यास्त्रिक्** अथवा **प्यूबिक्**, आणि बाजूंच्यास उजवा व डावा **इलियाक्** अथवा **इंग्विनल्** देश म्हणतात. ह्या निरनिराळ्या देशांत भाग आहेत ते येणें प्रमाणें,—

**उजवा हैपोकांद्रियाक् देश.** ह्यांत काळजाचा उजवा गड्डा, पित्ताशय, दूओदिनम्, कोलनाचें काळजा जवळचें वांकण, उजव्या मूत्रपिंडाचा वरचा भाग, व उजवें सुप्रारीनल् क्याप्सूल् हे भाग आहेत.

**एपिग्यास्त्रिक् देश.** ह्यांत पक्काशयाचा मध्य व पैलोरिक् शेंडा, काळजाचा डावा गड्डा व लाब्युलस स्पिजिलियै गड्डा, हिप्यातिक् रक्तवाहिन्या, सिलियाक् आक्सिस, सेमिल्यूनर ग्यांग्लियन, प्यांक्रीज, आणि एयोर्ता, वीनाकेवा, वीना अजिगास, व थोऱ्यासिक् दक्त, ह्यांचे भाग आहेत.

**डावा हैपोकांद्रियाक् देश.** ह्यामध्यें पक्काशयाचा प्लीहेकडला भाग, प्लीहा, प्यांक्रिजचा शेंडा, कोलनचें प्लीहा जवळचें वांकण, डाव्या मूत्रपिंडाचा वरला अर्ध भाग, आणि डावें सुप्रारीनल् क्याप्सूल्, हे भाग आहेत.

**उजवा लंबर देश.** ह्या मध्यें चढतें कोलन, उजव्या मूत्रपिंडाचा खालचा भाग, व लहान आंतड्याचीं कांहीं वेंटोळीं, हे भाग आहेत.

**अंबूलैकल् देश.** ह्यांत अडवें कोलन, मोठ्या ओमेंतमूचा थोडा भाग, मेजेंतरी, दूओदीनमूचा आडवा भाग, आणि जजूनम् व इलियम् ह्यांचीं कांहीं वेटोळीं, हे भाग आहेत.

**डावा लंबरदेश.** ह्यामध्यें उतरतें कोलन, डाव्या मूत्रपिंडाचा खालचा भाग, व लहान आंतड्याचीं कांहीं वेंटोळीं, हे भाग आहेत.

**उजवा इंग्विनल् देश.** ह्या मध्यें सीकम् व त्याचा अनुषंगिक भाग, मूत्रवाहिनी, आणि स्पर्म्यातिक् रक्तवाहिनी, हे भाग आहेत.

**हैपोग्यास्त्रिक् देश.** ह्या मध्यें लहान आंतड्याचीं वेंटोळीं, मुलांत मूत्रा-

शय व प्रौढांत तो फुगला असतां मात्र, आणि गरोदर स्थितींत गर्भाशय, हे भाग असतात.

**डावा इंग्विनल् देश.** ह्यामध्यें कोलनची सिगमैद् फ्लेक्सर, मूत्रवाहिनी, व स्पर्म्यातिक् रक्तवाहिनी, हे भाग असतात.

## पेरितनियम्.

**पेरितनियम्** हा सीरस त्वचेचा बंद आशय आहे. ही त्वचा पोट व पेल्विस ह्या खांचांमधील अवयव आणि पोटाच्या भिंती, ह्या भागांचें थोडें किंवा फार आच्छादन होतें. अवयवांस आच्छादणाऱ्या थरांस आंतला थर, व भिंतींस आच्छादणाऱ्या थरास बाहेरला थर असें म्हणतात. ह्या दोहों थरांच्या मध्यें रक्ताच्या पाण्यासारखा थोडासा पदार्थ (सीरम्) उत्पन्न होतो, त्याच्या योगानें ते भाग बुळबुळीत होतात. खालीं सांगितल्याप्रमाणें पेरितनियमूचा थांग लावतां येतो,—

काळीज वर उचललें असतां त्याच्या आडव्या चिरे पासून पक्वाशयाच्या वरच्या आंगास गेलेला थर दिसतो. हेंच **धाकटें ओमेंतम्** होय.

धाकट्या ओमेंतमूचा पुढला थर पक्वाशयाचें पुढलें आंग आच्छादून लहान आंतड्याच्या पुढून उतरतो, व पुनः दुमडून आडव्या कोलनचें खालचें आंग आच्छादितो, आणि पोटाच्या मागल्या भागांकडे जातो. नंतर हा दूओदीनम् व एयोर्ता ह्यांच्या पुढून जाऊन लहान आंतड्यास वेष्टितो, व मेजेंतरीस पूर्ण करण्या करितां परत कण्याकडे जातो. नंतर हा पेल्विस मध्यें उतरून रेक्तमूचा वरचा भाग वेष्टितो, आणि पुरुषांत रेक्तम् व मूत्राशय ह्यांच्या मध्यें एक त्याची घडी पडते. स्त्रियांत हा योनि व गर्भाशय ह्यांचे वरचे भाग वेष्टून, गर्भाशयाच्या प्रत्येक बाजूस दुमडला जातो, त्या योगानें गर्भाशयाचीं ब्राद लिगमेंत्स होतात. स्त्रियांमध्यें पेरितनियम् फेलोपियन नळ्यांच्या म्यूकस त्वचेशीं सलग्न असल्या मुळें तो पुरता बंद नाहीं. गर्भाशय व मूत्राशय ह्यांवरून तो पोटाच्या पुढील भिंतीनें दैफ्रमूच्या खालच्या आंगास येतो, व येथून काळजाच्या आडव्या चिरेस जातो.

धाकट्या ओमेंतमूचा मागला थर पक्वाशयाचें मागील आंग आच्छादून लहान आंतड्याच्या पुढें उतरतो, व मोठ्या ओमेंतमास पूर्ण करण्या साठीं

दुमडून, आडव्या कोलनचें वरलें आंग आच्छादितो, व मागें कण्याकडे वळतो. कण्या पासून मग दैफ्रमूचें खालचें आंग, व काळजाची आडवी चीर, ह्या ठिकाणां पर्यंत त्याचा थांग लावतां येतो. पेरितनियमूचे थर असे दुमडले आहेत कीं, पोट व पेल्विस ह्यांतील अवयव पेरितनियमूच्या आशयाच्या बाहेर राहातात.

मागल्या थरानें घटित पोकळीस मोठ्या ओमेंतमूची **पोकळी** अथवा **खांच** म्हणतात. ती पेरितनियमूच्या खांचेशीं **विन्स्लोच्या छिद्रा** मधून संयोग पावते.

**मोठें ओमेंतम्** चार थरांनीं घटित आहे, पैकीं दोन लहान आंतड्याच्या पुढून उतरतात, व तेच दोन पुनः वर चढतात. धाकटें ओमेंतम् वर सांगितलेंच आहे.

**मेजेंतरी** ही ६ इंच लांब घडी लहान आंतड्यास आच्छादून त्याला कण्याशीं जुळविते.

**मीजोसीकम्** व **मीजोरेक्तम्** हे सीकम् व रेक्तम् ह्यांस पोटाच्या भिंतीशीं जुळवितात.

**मीजो कोलन** हे पेरितनियमूचे पडदे कोलनच्या निरनिराळ्या भागांस पोटाच्या भिंतीशीं जुळवितात. हे कोलनच्या ज्या भागांस पोटाच्या भिंतीशीं जुळवितात, त्या त्या प्रमाणें त्यांस चढतें, अडवें, व उतरतें मीजोकोलन, अशीं नांवें आहेत.

एक पडदा पक्वाशया पासून प्लीहेस जातो, त्यास **ग्यास्त्रोस्प्लेनिक् ओमेंतम्** म्हणतात.

**विन्स्लो ह्याच्या छिद्रास** पुढें धाकटें ओमेंतम्; मागें खालची वीनाकेवा शीर; वर काळजाचा लाब्युलस स्पिजिलिये गडा; आणि खालीं हिप्यातिक् धमनी; ह्या भागांच्या मर्यादा आहेत.

## पक्वाशय. स्तमक्.

**पक्वाशय** हा पचन संबंधी मुख्य अवयव अन्नमार्गाचा अत्यंत फुललेला भाग आहे. ह्यांत अन्नाचा रस होऊन तें कमी होतें. हा आशय डावा हैपोकान्द्रियाक्, एपिग्यास्त्रिक्, व कांहीं अंशीं उजवा हैपोकान्द्रियाक्, ह्या देशां

मध्यें काळीज व दैफ्रम् ह्यांच्या खालीं, व आडव्या कोलन्च्या वर आहे. ह्याचा आकार शंकूसारखा असून बूड डावीकडे वळलें आहे, व ह्याचें आकारमान निरनिराळ्या मनुष्यांत निरनिराळें असतें, तसेंच हा कमी किंवा ज्यास्ती फुगला असतो, त्याप्रमाणें तें कमी किंवा ज्यास्त होतें. ह्याचा आडवा व्यास सुमारें १२ इंच, व उभा ४ इंच असतो. वजन सुमारें ४½ औंस असतें. ह्याला दोन शेंडे, दोन तोंडें, दोन कांठ, व दोन आंगें, अशीं असतात.

**डावा अथवा मोठा शेंडा** पक्काशयाच्या सर्व भागांपेक्षां मोठा आहे, हा पेरितनियम्च्या पडद्यानें प्लीहेशीं जुळला आहे. हा इसाफगस शिरण्याच्या स्थानापलीकडे फासळ्यांच्या खालीं आहे.

**उजवा अथवा लहान शेंडा** काळजाचें खालचें आंग, पित्ताशय, व पोटच्या भिंती, ह्यांस लागला आहे.

**कार्दियाक् छिद्र** अथवा तोंड इसाफगसशीं संयोग पावतें, ह्याचा आकार फनेला सारखा आहे. **पैलारिक् तोंड**, दूओदीनम्शीं संयोग पावतें, ह्याला एक **वाल्व** म्हणजे पडदा आहे.

**लहान वांकण** वरल्या कांठानें पैलारिक् शेंड्याकडून कार्दियाक् शेंड्यापर्यंत जातें; व **मोठें** अथवा **खालचें वांकण** त्याप्रमाणेंच खालच्या कांठानें जातें.

**पुढचें आंग** वर व पुढें झुकलें असून, काळजाचें खालचें आंग व दैफ्रम् ह्या भागांशीं जुळलें आहे. **मागलें आंग** खालीं व मागें झुकलें असून, प्यांक्रीज, पोटाच्या मोठ्या रक्तवाहिन्या, दैफ्रम्चे स्तंभ, व सोलरप्लेक्सस, ह्या भागांशीं जुळलें आहे. पक्काशयाच्या बैठकींत फार फेरफार घडतो. तो फार फुगला म्हणजे त्याचें पुढचें आंग वर, व मागलें खालीं, अशीं होतात.

धाकट्या ओमेंतम्नें व दैफ्रम्पासून आलेल्या पेरितानियम्च्या एका पडद्यानें पक्काशय जागचे जागीं राहतो.

**रचना.** पक्काशयास, सीरस, मस्क्युलर, सेल्यूलर आणि म्यूकस, असे चार पडदे आहेत.

**सीरस त्वचेचा पडदा** पेरितानियम् पासून येतो.

**स्नायूचा पडदा** बाहेरील लांब लांब, मधील वर्तुळाकार व आडवे, आणि

आंतील चिरपे, अशा तंतूंनीं घटित आहे. आडव्या तंतूंच्या योगानें **पैलारिक्** शेंड्या जवळच्या **स्फिंक्तर** म्हणजे आकुंचन करणारा स्नायु होतो.

**सेल्यूलर त्वचेचा पडदा** स्नायूच्या व म्यूकस त्वचेच्या पडद्यांस परस्परांशीं जुळवितो.

**म्यूकस त्वचेचा पडदा** जाड, गुळगुळीत, व भरदार असून धूसर भस्मी रंगाचा आहे. सर्व ठिकाणांपेक्षां हा पैलोरस जवळ जाड आहे. आकुंचन स्थितींत ह्याला लांब लांब सुरकुत्या पडल्या असतात. ह्याच्या संपूर्ण भागांवर $\frac{१}{१००}$ पासून $\frac{१}{२००}$ इंच व्यासाचे लहान खळगे आहेत, त्यांस **स्तमक् पिरस** म्हणजे पैकाशयाचे खळगे म्हणतात. त्यांच्यामध्यें व बुडाशीं सूक्ष्म वाहिन्यांचीं छिद्रें अथवा तोंडें आहेत. त्या वाहिन्या परस्परांस आजूबाजूनें लागल्या असून म्यूकस पडद्यावर उभ्या आहेत. ह्या वाहिन्यांस **ग्याख्रिक् फालिकूल्स** म्हणतात.

कार्दियाक् शेंड्याजवळ ह्या वाहिन्या एकाकी व अखूड असतात, परंतु पैलोरस शेंड्याजवळ त्या फुगलेल्या असतात, व त्यांच्या खालच्या भागापासून २ पासून ६ पर्यंत शाखा निघतात. ह्या वाहिन्या सूक्ष्म सेल्स म्हणजे आशय ह्यांनीं मढलेल्या व बेसमें त त्वचेनें घटित आहेत. दोन्ही शेंड्यांवरचीं सेल्स लक्षणानें परस्परांपासून भिन्न आहेत, व तीं कार्दियाक् शेंड्याजवळ **ग्याख्रिक् जूस** म्हणून आंबट पाण्या सारखा पदार्थ उत्पन्न करतात, व पैलोरसजवळ आंवे सारखा पदार्थ उत्पन्न करतात, त्याला इंग्रेजींत **म्यूकस** म्हणतात.

## लहान आंतडें. स्माल् इन्तेस्तीन.

अन्नमार्गाच्या ज्या भागांत अन्नाचा धातुप होतो, त्यास **लहान आंतडें** म्हणतात. हें आंतडें पोट व पेल्विस ह्यांच्या खांचांत असणारी सुमारें २० फूट लांब व वेटाळलेली नळी होय. हिला वरतीं व बाजूस मोठ्या आंतड्याचें आच्छादन असून, ही मेजेंतरीच्या योगानें कण्याशीं जुळली आहे. आंतड्याचे **दूओदिनम्, जजूनम्, व इलियम्,** असे तीन विभाग केले आहेत.

**दूओदीनम्** हा भाग तिहींत अखूड असून सुमारें ८ किंवा १० इंच लांब आहे. ह्याची लांबी १२ बोटें असल्या मुळें ह्यास हें नांव दिलें आहे. हा लहान आं-

तड्याचा अत्यंत अखूड व रुंद भाग आहे, ह्यास पेरितनीयम्चें अपूर्ते आच्छादन आहे, आणि मेजेंतरी नाहीं. ह्याच्या गतीमध्यें ह्यास चमत्कारिक बांक आहे, त्याची गोलबाह्यता उजवीकडे व गोलांतरता डावीकडे झुकली आहे; तींत प्यांक्रिजचें डोकें बसतें. दूओदिनम्चे तीन भाग केले आहेत; पहिला किंवा चढता भाग पैलोरस पासून काळजाच्या खालच्या आंगापर्यंत जातो, व त्यास आणि पित्ताशयास लागला आहे. ह्यास वर व पुढें काळीज व पित्ताशयाची मान, आणि मागें धाकट्या ओमेंतम्चा उजवा कांठ, हिप्यातिक् धमनी, पित्तवाहिनी, व पोर्तल्शीर, ह्या मर्यादा आहेत. दुसरा किंवा उतरता भाग, उजव्या मूत्रपिंडाच्या पुढून कमरेच्या तिसऱ्या मणक्या पर्यंत उतरतो, ह्याच्या आंतल्या आंगास प्यांक्रीजचें डोकें आहे, आणि ह्याच आंगास **सामान्य पित्त वाहिनी** व **प्यांक्रियातिक्** वाहिनी ह्या ह्यास विंधितात. तिसरा किंवा अडवा भाग कमरेच्या तिसऱ्या मणक्या पासून दुसऱ्या पर्यंत चढतो, व त्याच्या पुढून डाव्या बाजूस जाऊन जजूनम् मध्यें संपतो. ह्यास पुढें अडवें मीजोकोलन व वरच्या मजेंतेरिक् वाहिन्या; मागें एयोर्ता, वीनाकेवा, व दैफ्रम्चे क्रूरा; आणि वर प्यांक्रीजचा खालचा कांठ, ह्या मर्यादा आहेत.

**जजूनम्** हा भाग कमरेच्या दुसऱ्या मणक्याच्या डाव्या बाजू पासून निघून इलियम् मध्यें संपतो, व त्याचीं वेंटोळीं मुख्यत्वें अंबलैकल् व डावा इलियाक् ह्यां देशांत असतात. दूओदिनम् सोडून बाकीच्या लहान आंतड्याचा जजूनम् $\frac{२}{५}$ भाग होय. इलियम् पेक्षां जजूनम् विशेष रुंद आहे, ह्याचे पडदे आधिक घट्ट असून त्यांचा रंग अधिक गहिरा आहे, आणि त्यांत रक्तवाहिन्या ही ज्यास्ती असतात.

**इलियम्ला** वेंटोळीं फार असतात, व हा भाग मोठ्या आंतड्याच्या आंतल्या आंगास संपतो. हा अंबलैकल्, हैपोग्यास्त्रिक्, व उजवा इलियाक्, ह्यां देशांत असतो. दूओदीनम् सोडून जो लहान आंतड्याचा शेष भाग, त्याचा इलियम् $\frac{३}{५}$ होय.

**रचना**. लहान आंतड्यास चार पडदे आहेत. एक बाहेरील किंवा **सीरस त्वचेचा** आहे, तो दूओदिनमास अपूर्ते आणि लहान आंतड्याच्या भागांस पूर्ते आच्छादतो.

**स्नायूचा पडदा** बाहेरील लांब लांब व आंतील वर्तुलाकार किंवा अडव्या तंतूंनीं घटित आहे.

**सेल्युलर पडदा** स्नायूच्या व म्यूकस त्वचेच्या पडद्यांस जुळवितो. ह्यास सब्म्यूकस पडदाही म्हणतात,

**म्यूकस त्वचेचा पडदा** सर्वांच्या आंत असतो. हा वरल्या भागांत रक्तवाहिन्यांनीं फार व्याप्त आहे. खालच्या भागांत पातळ व फिकट आहे. म्यूकस त्वचेच्या पडद्यांत हे पुढील भाग आहेत,— पडद्यास संपूर्ण भागीं मढविणारीं एपिथिलियमसेल्स, हीं कालम्नर म्हणजे स्तंभाकृति असतात.

म्यूकस पडद्याच्या व्यालव्युलीकानिवेंतीज नामक कित्येक आडव्या घड्या आहेत, त्या शोषण करणाऱ्या स्थानास विस्तीर्ण करतात, व अन्नास मार्गांत प्रतिबंध करितात, तेणें करून धातुपोत्पत्तीच्या क्रियेस सहाय होतें

**विली** हे बहुत रक्तवाहिन्यांनीं युक्त त्रिकोणाकार, शंक्वाकार, अथवा दीर्घ वर्तुळाकार भाग, म्यूकस त्वचेच्या पडद्या वर वाढून आले आहेत. हे रक्तवाहिन्या व शोषकवाहिन्या ह्यांच्या जाळ्यांनीं घटित असून, त्या जाळ्यांस एपिथीलियमनें मढलेल्या म्यूकस त्वचेचें आच्छादन आहे. एका चौरस लैनींत हे ५० असतात, व एकंदर सुमारें ४०,००,००० चाळीस लक्ष आहेत. हे सूक्ष्म दर्शक यंत्रा वांचून सरासरी दिसतात, व ह्यांच्या योगानें म्यूकस त्वचा मखमली सारखी दिसते.

**लैबरक्यून फालिकल्स** म्हणून लहान ग्ल्यांद असतात, ते म्यूकस त्वचेंत असून लहान छिद्रांनीं तीजवर सुटतात.

**ब्रनर ह्याचे ग्ल्यांद** डूओदीनम् मध्यें मात्र असतात, हे कणा सारखे पिंड, म्यूकस पडद्या खालीं असून त्यावर सूक्ष्म वाहिन्यां मधून सुटतात, ह्या पिंडांची रचना लालोत्पादक पिंड व प्यांक्रीज ह्यांच्या रचने सारखी असते.

**सालितरी ग्ल्यांद** हे गोल व मोहरी एवढे पिंड वाहिनी शिवाय असतात, व ह्यांत पांढुरका सद्रव पदार्थ असतो.

**पेयर ह्याचे ग्ल्यांद** सूक्ष्म असून म्यूकस पडद्यांत गढलेले असतात. हे सुमारें टांचणीच्या डोक्या एवढे आहेत, व म्यूकस त्वचेंत किंचित् चढून येतात, ह्यांस कणयुक्त द्रवानें भरलेलें वर्तुळाकार विवर आहे, पण वाहिनी ना-

ळांत पोटाच्या खांचेंतून आंतडें आंतील अंगठी सारख्या छिद्रा जवळ निसटतें, व इंग्विनल् नळ आणि बाहेरील अंगठी सारखें छिद्र, ह्यांच्या मधून अंडाच्या रज्जूच्या पुढून वृषणांत उतरतें, आणि खालीं येतांनां पेरितनियम्‌ला पुढें ढकलतें, तेणें करून एक आशय होतो, त्यास अंतर्गळाचा आशय म्हणतात, इंग्रजींत स्याक म्हणतात. ह्या खेरीज, आंतड्यास त्रान्सवर्सेलिस फाशियाच्या इंन्फदिम्युलिफार्म प्रोसेसचें म्हणजे फनलाच्या आकाराचा भाग ह्याचें वेष्टन आहे, तें आंतला आब्लिक व त्रान्सूवर्सेलिस ह्या स्नायूंच्या कमानदार तंतूंस बाजूस ढकलतें, व क्रिमास्तर स्नायूनें आच्छादिलें आहे. ह्या जातीचा अंतर्गळ बाहेरील अंगठी सारख्या छिद्रातून निसटला म्हणजे त्यास बाहेरून आंत, हीं पुढील आच्छादनें असतात,—कातडें, उथळ फाशिया, इन्तरकालम्नरफाशिया, क्रिमास्तर स्नायु, त्रान्सूवर्सेलिस फाशिया, आणि पेरितनियम्. स्त्रिक्चर म्हणजे अटकाव हा बाहेरील अंगठी सारखे छिद्र, इंग्लिनल् नळ, अथवा आंतलें अंगठी सारखे छिद्र, ह्यांतून कोणत्या एका ठिकाणी असतो. अंतर्गळ बाहेरील अंगठी सारख्या छिद्रांतून बाहेर न पडला तर, त्यास व्युबानोसील अथवा अपुरता अंतर्गळ म्हणतात.

**उपजत अंतर्गळामध्यें** अंड उतरतांनां त्यास व त्याच्या रज्जूस वेष्टणारा पेरितनियम्‌चा आशय खुला राहतो, त्यामुळें आंतडें त्यूनिकाव्याजिनेलिस ह्याच्या खांचेंत उतरतें, व अंडास लागलेलें असतें. ह्या अतर्गळाला स्वतंत्र आशय नसतो, त्यूनिकाव्याजिनेलिस हाच त्याचा आशय ( स्याक ) होय.

**बाल्यावस्थेंतल्या अंतर्गळांत** वर सांगितलेल्या पेरितनीयम्‌च्या आशयाचें पोटाशीं संयोग पावणारें छिद्र बंद असतें, परंतु इंग्विनल् नळांतला भाग खुला असतो, तेणें करून अंतर्गळाच्या आशयास ( स्याक ह्याला ) त्यूनिका व्याजिनेलिस ह्याच्या मागल्या थराचें आच्छादन होतें, आणि ह्या अंतर्गळांत आंतडे परत पोटांत घालविण्या साठीं शस्त्र उपाय केला असतां; पेरितनियम्‌चे तीन थर तोडावे लागतात ते असे,— दोन त्यूनिकाव्याजिनेलिसचे थर आणि तिसरा अंतर्गळाचा थर.

### नीट अंतर्गळ. दैरेक्त इंग्विनल् हर्निया.

ह्या जातीचा अंतर्गळ हा पोटाची भिंत घटित करणारीं आच्छादनें, व बा-

हेरील अंगठीसारखें छिद्र, ह्यांतून आतल्या एपिग्यास्त्रिक् धमनीच्या आंतल्या आंगानें जातो. पोटाच्या खालच्या भागांत एक त्रिकोणाकार स्थान आहे, त्याला बाहेर एपिग्यास्त्रिक् धमनी, आंत रेक्तस स्नायूचा आंतला कांठ, आणि खालीं पूपार्तचें लिगमेंत, ह्या मर्यादा आहेत. ह्याच्या आंतील दोनतृतीयांश भागावरून संयुक्त तेंदन आडवें ताणलेलें असतें, व बाहेरील तृतीयांश ट्रान्सुवर्सेलिस फाशियानें झांकलेला असतो. ह्या स्थानांमधून अंतर्गळ निसटतो. कधीं कधीं अंतर्गळ संयुक्त तेंदनाच्या बाहेरल्या आंगानें, व बहुधा त्याच्या तंतूंमधून ढकलला जातो, आणि क्वचित् हें तेंदन अंतर्गळाच्या पुढें ताणलें जाऊन त्यास आच्छादितें. नीट जातीच्या अंतर्गळास तिरप्यासारखींच आच्छादनें आहेत, इतकेंच कीं, क्रिमास्तर स्नायूबद्दल एथें संयुक्त तेंदनाचें आच्छादन असतें.

**अटकाव** बहुधा आशयाच्या मानेंत अथवा बाहेरील अंगठी सारख्या छिद्रांत असतो.

**नीट अंतर्गळ** तिरप्या अंतर्गळा प्रमाणें पुष्कळ मनुष्यांस होत नाहीं, व पुरुषांत बाहेरील अंगठी सारखें छिद्र मोठें असल्यामुळें अंतर्गळ होणाऱ्या पुरुषांची संख्या अंतर्गळ होणाऱ्या स्त्रियांच्या संख्येपेक्षां ज्यास्ती असते. कोणत्याही जातीचा अंतर्गळ असला तरी अटकाव नीट वर तोडावा, म्हणजे एपिग्यास्त्रिक् धमनी चुकते.

**फेमरल् हर्निया** म्हणजे **मांडींतला अंतर्गळ** ह्याच्या शस्त्रविद्येसंबंधी शारीराचा विचार.

**छेदन.** साधल्यास स्त्रीजातीचें शव घ्यावें, व उताणें टाकावें: एक छेद इलियमच्या पुढच्या वरच्या कंटकतुल्य भागापासून पूपार्तच्या लिगमेंतावरून सिंफिसिस प्युबिस ह्या पर्यंत, व दुसरा ह्याच्या खालीं सुमारें ६ इंचांवर मांडीवरून आडवा करावा, आणि मांडीच्या आंतल्या आंगानें तिसरा उभा छेद करून हे परस्परांशीं जुळवावे. कातडें काढलें म्हणजे उथळ फाशिया उघडा पडतो.

**मांडीचा उथळ फाशिया** उथळ व खोल अशा दोन थरांनीं झाला आहे. उथळ थर काढला म्हणजे उथळ रक्तवाहिन्या, मज्जातंतु, व लिंफ्यातिक् ग्ल्यांद, हे खोल थरांवरले भाग उघडे पडतात. रक्तवाहिन्यां पैकीं सफीना शीर बरीच मोठी आहे, व ही फेमरल् शिरेंत सुटण्या करितां सफीनस छिद्रामधून जाते,

**उथळ फाशियाचा खोल थर** पातळ असून बळकट आहे, व हा पूपार्तच्या लिगमेंतच्या खालच्या कांठास दृढ बद्ध असून, ह्या ठिकाणाच्या खालीं एक इंचावर हा सफीनस छिद्राचा घेर, व फेमरल् रक्तवाहिन्यांचे वेष्टन, ह्या भागांसही दृढ बद्ध आहे. सफीनस छिद्राजवळ हा फाशिया आंतील सफीनस शीर व इतर रक्तवाहिन्या आणि शोषकवाहिन्या ह्यांनी विधिला असून चाळणी सारखा होतो, म्हणून त्यास **क्रिब्रिफार्म फाशिया** म्हणतात. हा खोल थर काढला म्हणजे फाशिया लेता उघडा पडतो.

**फाशियालेता** जो पूर्वींच वर्णिला आहे, त्यांत मांडीच्या वरल्या व आंतल्या आंगास एक मोठें अंडाकार छिद्र आहे, तेच **सफीनसछिद्र** होय. ह्या छिद्राच्या पूर्णते विषयीं विचार करण्या साठीं फाशिया लेताचे प्यूबिक्, व इलियाक्, असे दोन भाग मानिले आहेत.

**इलियाक् भाग** छिद्राच्या बाहेरील आंगास असून, इलियम्च्या शिखेच्या पुढच्या वरच्या कंटकतुल्य भाग व शिखा, प्यूबिसच्या कंटकतुल्य भागा पर्यंत पूपार्तचें लिगमेंत, व गिबर्नातच्या लिगमेंतसह पेक्तिनियल् रेषा, ह्या भागांस बद्ध आहे, आणि शेवटच्या ठिकाणी प्यूबिक् भागाशीं सलग्न होतो. प्यूबिसच्या कंटकतुल्य भागा पासून हा खालीं व बाहेर उलटून सफीनस छिद्राची बाहेरील मर्यादा होतो, ह्या भागास **फ्याल्सिफार्म प्रोसेस** म्हणतात. हा खालीं फेमरल् वेष्टनास बद्ध आहे, ह्याच्या कांठास क्रिब्रिफार्म फाशिया बद्ध आहे, आणि खालीं हा फाशिया लेताच्या प्यूबिक् भागाशीं सलग्न आहे.

**प्यूबिक् भाग** सफीनस छिद्राच्या आंतल्या आंगास आहे. हा इलियाक् भागाशीं सलग्न होऊन, फेमरल् वेष्टनाच्या मागें जाऊन त्याशीं दृढ संयोग पावतो.

**सफीनस छिद्र** अंडाकार व १$\frac{1}{2}$ इंच लांब व $\frac{1}{2}$ इंच रुंद असून, खालीं व बाहेर झुकलें आहे. हें छिद्र मांडीचें प्रसरण केलें तर आकुंचित होतें, व आकुंचन केलें तर शिथिल होतें.

फाशियालेताचा इलियाक् भाग काढल्यावर **फेमरल् वेष्टन** उघडें पडतें, तें पूपार्तच्या लिगमेंत खालून उतरतानां दृष्टीस पडतें, आणि पूपार्तचें लिगमेंत तोडल्यावर तें पुर्तें उघडें पडतें. हें वेष्टन घटित होण्याची, रीति पू-

वीं सांगितलीच आहे. वेष्टनाच्या आच्छादनाचा पुढचा भाग काढल्यावर धमनी, व शीर, ह्या एकीच्या बाजूस एक ह्या प्रमाणें लागलेल्या असून, एकमेकां पासून सूक्ष्म पडद्यानें सोडविल्या आहेत. शिरेच्या व वेष्टनाच्या आंतल्या भागाच्या मध्यें रिकामें स्थान आहे, त्यास **फेमरल् अथवा क्रूरल् नळ** म्हणतात. हा नळ बहुधा सेल्युलर त्वचा, शोषकवाहिन्या, व कधींकधीं लिंफ्यातिक् ग्ल्याद, ह्या भागांनीं बुजलेला असतो, आणि मांडींतला अंतर्गळ झाला म्हणजे ह्यांतूनच आंतडें मांडींत उतरतें.

**दीपक्रूरल् आर्च** म्हणून त्रान्सूवर्सेलिस फाशियाचा जाड झालेला बंद आहे, तो बाहेर पूपार्तच्या लिगमेंतच्या मध्यावर बद्ध असून, फेमरल् वेष्टनाच्या पुढून कमानी सारखा जाऊन पेक्तिनियल् रेषेस बद्ध होतो.

**फेमरल्** अथवा **क्रूरल नळ** हा पुढें, त्रान्सूवर्सेलिस फाशिया, पूपार्तचें लिगमेंत, व फाशिया लेताचा इलियाक् भाग; मागें, इलियाक् फाशिया, व फाशिया लेताचा प्यूबिक् भाग; बाहेर, फेमरल् शिरेचें आंतलें आंग आच्छादणारा फ्रैब्रस त्वचेचा पडदा; व आंत, त्रान्सूवर्सेलिस व इलियाक् फाशियांची जुळणी; ह्या भागांनीं घटित झाला आहे. ह्या नळास दोन छिद्रें अथवा तोंडें आहेत; खालचें तोंड **सफीनस छिद्र** होय, व हें क्रिब्रिफार्म फाशियानें बंद झालें आहे. वरचें तोंड अंडाकार व अंगठी सारखें आहे, त्यास **फेमरल्** अथवा **क्रूरल्रिंग** म्हणतात. ह्या छिद्रास पुढें, पूपार्तचें लिगमेंत, व **दीपक्रूरल आर्च**; मागें, पेक्तिनियस स्नायूनें आच्छादिलेला प्यूबिसचा भाग, व फाशियालेताचा प्यूबिक् भाग; आंत, गिंबर्नातचें लिगमेंत, संयुक्त तेंदन, त्रान्सूवर्सेलिस फाशिया, व दीपक्रूरल आर्च; आणि बाहेर, फेमरल् शीर; ह्या भागांच्या मर्यादा आहेत. पुरुषांत अंडाची रज्जु, व स्त्रियांत रौंदालिगमेंत, हेभाग फेमरल् छिद्राच्या पुढच्या कांठाच्या लागलेंच वरतीं असतात. फेमरल् शीर बाहेरल्या आंगास असते, व एपिग्यास्त्रिक् धमनी छिद्राच्या वरच्या व बाहेरच्या कोणावरून आडवी जाते. मांडीच्या अंतर्गळाचा स्त्रिक्चर म्हणजे अटकाव तोडतांनां वर सांगितलेले निरानिराळे भाग चुकविण्याकरितां चाकूचें पातें आंत व किंचित् वर झुकवावें लागतें.

**आब्ट्यूरेतर धमनी** कित्येक प्रसंगीं बाहेरील इलेयाक् शिरेच्या आंतल्या

आंगानें आबूत्यूरेतर छिद्राकडे येते, व फेमरल् छिद्राच्या बाहेरील आंगास असते, आणि असें झालें असतां मांडींतल्या अंतर्गळासाठीं शस्त्रोपाय केलातर, ही कापली जाण्याचा संभव नसतो; परंतु कधी कधी ही गिंबर्नातच्या लिगमेंतच्या मोकळ्या कांठावरून कमानी सारिखी जाते, आणि असें झाले असतां शस्त्रोपायांत ही कापली गेल्यावांचून राहणार नाही.

फेमरल् छिद्र जाड अरियोलर त्वचेच्या पडद्याने बंद आहे, त्या पडद्यास **सेप्तम् क्रूरेली** म्हणतात.

**अंतर्गळाचें उतरणें.** वर सांगितलेल्या वर्णनावरून पोटाच्या भिंतीत फेमरल् छिद्र हें अदृढ स्थान आहे, असे स्पष्ट झाले. आता पोटातल्या अवयवावर एकदम अथवा सावकाश पुष्कळ दाब पडला तर, आंतडें ह्या छिद्रांत उतरंत. स्त्रियांत पेल्विस मोठें असल्यामुळे हें छिद्र पुरुषांपेक्षा मोठे आहे, ह्या कारणावरून मांडींतला अंतरगळ होणाऱ्या स्त्रियाची संख्या तोच रोग होणाऱ्या पुरुषा पेक्षा जास्ती असते.

फेमरल् छिद्रांतून आंतडे उतरले म्हणजे ते पेरितनियम् त्वचेस पुढं ढकलून तिची स्याक् म्हणजे आशय ह्यामध्यें वेष्टिलें जांते, आशयाच्या बाहेरून सेप्तम् क्रूरेली म्हणून जो भाग आहे, त्याचे आच्छादन होते. नंतर अंतर्गळ फेमरल् नळामधून सफीनस छिद्रा पर्यंत उतरतो. ह्या ठिकाणा खाली फेमरल् नळ अरुंद असून वेष्टन रक्तवाहिन्यास दृढ बद्ध असल्यामुळे तो ज्यास्ती खालीं उतरत नाहीं. ह्या ठिकाणापासून तो पुढं वळतो, व क्रिब्रिफार्म फाशियास आपल्या पुढें ढकलतो, व शेवटी वाकडा वर वळून फ्यालसिफार्म प्रोसेस व बाहेरील अब्लीक स्नायूच्या तंदनाचा खालचा भाग ह्याजवळ येतो. एथें तो फक्त उथळ फाशिया व कातडें ह्या भागानीं आच्छादिला असतो, हा प्रथम खालीं, नंतर पुढें, व शेवटी वर झुकतो. हा झोंक ध्यानात ठेवणं आवश्य आहे; कारण हा अंतर्गळ दाबून वर बसविताना दाब अगदीं उलटा लावला पाहिजे. तो असा, प्रथम खाली, मग मागें, आणि शेवटी वर

ह्या अंतर्गळास आंतून बाहेर **पेरितनियम्, सेप्तम् क्रूरेली, फेमरल् वेष्टन, क्रिब्रिफार्म फाशिया. उथळ फाशिया, व कांतडें,** हीं आच्छादनें **आहेत.**

## मांडींतल्या अंतर्गळाचे प्रकार अथवा जाति

आंतडें सफीनस छिद्रा पर्यंत उतरून त्याच्या बाहेर न पडलें तर, त्यास अपुरता अंतर्गळ म्हणतात, व ह्याची परीक्षा करणें फार कठीण आहे. ह्या जातीच्या अंतर्गळाचीं आच्छादनें बाहेरून आंत हीं पुढील होत, कांतडें, उथळ फाशिया, फाशियालेताचा फ्यालूसिफार्म प्रोसेस, फाशिया प्रोप्रिया ( हा त्रान्स्वर्सेलिस फाशियाच होय ), सेप्तम् क्रूरेली, व पेरितनियम्. अंतर्गळ कधींकधीं फेमरल् रक्तवाहिन्यांच्या बाहेरल्या आंगास, कधीं पुढें, व कधीं मागेंही उतरतो.

मांडींतल्या अंतर्गळाचा स्त्रिक्चर म्हणजे अटकाव पेरितनियम्च्या आशयाच्या मानेंत, अथवा फ्यालूसिफार्म प्रोसेस व गिंबर्नातचें लिगमेंत ह्यांच्या संयोगा पाशीं, अथवा मांडींत सफीनस छिद्राच्या कांठा जवळ असतो. कोठेंही असला तरी तो आंत व वर दोन अथवा तीन लैन तोडावा.

### पेरिनियम् व इस्कियोरेक्तल् देश ह्यांच्या शस्त्रविद्ये संबंधी शारीराचा विचार.

छेदन. ज्याच्या आंगांत चर्बी फार नाहीं तें शव घ्यावें, व उताणें टाकावें. मूत्राशयांत सळई घालावी, पाय अखडून हात आणि पाय एका ठिकाणीं बांधावे, आणि मांड्या बाहेर वळवाव्या. वृषण वर उचलून तसाच राखावा आणि रेक्तम् मध्यें तागाचें अथवा वाखाचें बुरकूल भरावें. एक छेद वृषणाच्या बुडापासून मध्यरेषेंत गुदाच्या पुढच्या कांठापर्यंत आणावा, व त्याच्या छिद्रा सभोंवतीं मागल्या कांठापर्यंत न्यावा, व ह्या ठिकाणापासून सुमारें $१\frac{१}{२}$ इंच मागें काक्सिक्सच्या शेंड्यापर्यंत न्यावा. हे छेद करून फक्त कांतडें तोडावें, व पहिल्या छेदावरून तीन आडवे छेद करावे. त्यांत एक वृषणाच्या बुडाजवळ, दुसरा गुदाच्या पुढच्या कांठाजवळ, आणि तिसरा गुदाच्या मागल्या कांठाजवळ असे करावे.

आतां जें स्थान उघडें पडतें, तें पेल्विसच्या विवराचें खालचें अथवा बाहेरचें छिद्र होय. ह्याला इंग्रेजींत औतलेत् म्हणतात. ह्याला पुढें प्यूबीसची कमान, व सबप्यूबिक् संधिबंधन; मागें काक्सिक्सचा शेंडा; आणि प्रत्येक बाजूस प्यूबिस, व इस्कियम् ह्या अस्थींच्या रेषे; ह्या मर्यादा आहेत. ह्या स्थानाचा आकार चौकोण आहे, व त्या चौकोणाची लांब कर्णरेषा पुढून मागें जाते. एका बाजूच्या इस्कियम्च्या उंचवट्यापासून दुसऱ्या बाजूच्या इस्कियम्च्या उंचवट्यापर्यंत, गुदाच्या पुढून रेषा नेली तर ह्या स्थानाचे दोन विभाग

होतात. पुढच्यास **पेरिनियम्** म्हणतात. ह्यांत शिश्न व युरिथ्रा हे भाग आहेत; मागल्यास **इस्कियोरेक्कल्** देश म्हणतात, व ह्यांत रेक्तमूचा शेवट आहे.

## इस्कियोरेक्तल देश.

ह्यांत रेक्तमूचा शेवट आहे, व रेक्तमूचा आणि इस्कियमूचा उंचवटा ह्यांच्या मध्यें प्रत्येक बाजूस वसेनें भरलेली एक खांच आहे, तिला **इस्कियोरेक्कल्फासा** म्हणजे खांच म्हणतात. इस्कियोरेक्कल् देशाच्या मध्यावर गुदाचें छिद्र आहे, व ह्या छिद्रा भोंवतालच्या कातड्यावर पुष्कळ सुरकुत्या असून तें रेक्तमूच्या म्यूकस पडद्याशीं सलग्न आहे, व त्यावर घर्म व स्नेह हे पदार्थ उत्पन्न करणारे कित्येक ग्लॅंद आहेत.

**एक्स्तर्नेल् स्फिंक्तर** हा लंबवर्तुळाकार स्नायु गुदाचें छिद्र वेष्टतो, व कातड्यास दृढ बद्ध आहे. हा कॉक्सिक्सच्या शेंड्यापासून निघून गुदाचें छिद्र वेष्टितो, व पेरिनियमूच्या तेंदनाच्या मध्यावर बद्ध होतो, ह्या स्नायूचें खोल आंग इन्तर्नल् स्फिंक्तर स्नायूस लागलें आहे.

**इन्तर्नेल स्फिंक्तर स्नायु** हें अर्ध इंच रुंद स्नायूचें कडें, रेक्तमूच्या खालच्या शेंड्याच्या आंतल्या आंगा समोंवतीं आहे, व हें गुदाच्या कांठाच्या अर्ध इंच वरतीं असतें. हा स्नायु अर्ध इंच जाड आहे, व आंतड्याचे वर्तुळाकार तंतु एकत्र जुळून झाला आहे.

**क्रिया.** स्फिंक्तर म्हणजे आकुंचन करणारा; तेव्हा ह्या स्नायूची क्रिया त्याच्या नांवा वरून समजते.

**इस्कियोरेक्तल् खांच** त्रिकोणाकार असून रेक्तमूचा शेंडा, व इस्कियमूचा उंचवटा, ह्या भागांच्या मध्यें आहे. हिची रुंदी १ इंच व खोली २ इंच असून, बूड खालीं व शेंडा वर झुकला आहे. हिला आंत, स्फिंक्तर एनै, लेवेतरएनै, व कॉक्सिजियस, हे स्नायु; बाहेर, इस्कियमूचा उंचवटा, व आब्त्यूरेतर इन्तर्न्स स्नायूस आच्छादणारा आब्त्यूरेतर फाशिया, पुढें, पेरिनियमूचा उथळ व खोल फाशिया, आणि मागें, ग्लूतियस म्याक्सिमस स्नायु, व मोठें सेक्रोसायातिक् बंधन, ह्या मर्यादा आहेत. ही खांच चर्बीनें भरली असते, व हिच्या बाहेरल्या आंगास इस्कियमूच्या उंचवट्याच्या कांठाच्या

वर आंतली प्यूदिक् धमनी, शीर, व मज्जातंतु, हे आवृत्युरेतर फाशियांत वेष्टिले जातात, आंतल्या प्यूदिक् धमनीच्या शाखा ह्या स्थानांतून आडव्या जातात.

## पेरिनियम्.

हें स्थान त्रिकोणाकार असून बाजूंस, इस्कियम् व प्यूबिस ह्यांच्या रेमै; मागें, इस्कियम्चे उंचवटे जुळविणारी कल्पित आडवी रेषा; व पुढें, सिंफिसिस प्यूबिस; ह्या भागांनीं मर्यादिलें आहे. बाजूच्या मर्यादा ३ पासून ३$\frac{1}{2}$ इंच लांब, बूड २ पासून ३$\frac{1}{2}$ इंच रुंद, असून त्याच्या व्यासाचें मध्यपरिमाण २$\frac{3}{4}$ इंच आहे. एका मधल्या सेवनीनें पेरिनियम्चे दोन सारखे भाग झाले आहेत, त्यापैकीं डावीकडच्या भागांत मूतखडा काढण्या साठीं शस्त्रोपाय करितात. ह्या ठिकाणचें कातडें काळसर व पातळ असून खालच्या भागावर मोकळेपणानें फिरतें, आणि ह्यावर पातळ केश आहेत. हें कातडें काढल्यावर दोन थरांनीं झालेला उथळ फाशिया उघडा पडतो.

ह्या फाशियाचा **उथळथर** जाड व सईल असून ह्याच्या जाळ्यांत वसा असते. हा पुढें वृषणाच्या दार्तास पडद्याशी, व इतर भागांच्या उथळ फाशियाशीं सलग्न आहे.

**खोलथर** पातळ व बळकट असून शिश्नाच्या मुळीच्या स्नायूस बांधून टाकतो. हा पुढें वृषणाच्या दार्तास पडद्याशीं सलग्न होतो; बाजूस हा इस्कियम् व प्यूबिस ह्यांच्या रेमैच्या कांठांस दृढ बद्ध आहे; आणि मागें हा त्रान्स्वर्सस पेरिनियै स्नायूच्या मागल्या आंगावर कमानी सारखा वळून, खोल फाशियाच्या खालच्या कांठाशीं जुळतो.

फाशियाची अशा प्रकारची व्यवस्था असल्यामुळें युरिथ्राचा मेंब्रेनस भाग फुटून मूत्र बाहेर पडलें असता, तें मागें गुदाकडे अथवा बाजूस मांड्याकडे न जातां, पुढें वळून वृषण, शिश्न, व पोटाच्या बाजूच व पुढचे भाग, ह्यांच्या अरियोलर त्वचेंत शिरून पुढला मार्ग धरितें. हा फाशिया काढल्यावर मध्य रेषेंत अक्सिलरेतरयुरैनी म्हणजे मूत्रगतिवर्द्धक, बाजूस इरेक्तर पीनिस म्हणजे शिश्नाचा उत्थापक, आणि मागें त्रान्स्वर्सस पेरिनियै, हे स्नायु उघडे पडतात.

**अक्सिलरेतर युरेनी स्नायु** दोन समान भागांनीं घटित आहे, व हे भाग मध्यरेषेंत एका तेंदनाच्या शिवणींत जुळले आहेत. हा स्नायु पेरिनियमूचें मध्य रेषेंतलें तेंदन, व त्या पुढें असणारी मधली शिवण ह्यां पासून निघतो, व ह्याचे तंतु परस्परांपासून अंतर पावत जातात. मागले तंतु खोल फाशियाच्या पुढल्या आंगास बद्ध होतात, मधले बल्बला वेढा घालून त्याच्यावरतीं समोरच्या स्नायूशीं जुळतात, आणि पुढले तंतु पसरले जाऊन कार्पसक्यावर्नोजम् ह्यावर बद्ध होतात.

**क्रिया.** हा स्नायु मूत्र आणि रेत ह्यांच्या प्रवाहाची गति वाढवितो, व शिश्न उत्थापित करण्यास सहाय होतो.

**इरेक्तर पीनिस** हा लांबट स्नायु इस्कियमूचा उंचवटा, शिश्नाचा दंड ज्यास क्रस म्हणतात तो, व प्यूबिसची रेमस, ह्या भागां पासून निघतो, व ह्याचें अपान्युरोसिस होतें, तें शिश्नाच्या दंडाचे खालचे आंग व बाजू ह्यावर बद्ध होतें.

**क्रिया.** हा स्नायु शिश्नाच्या दंडास दाबून शिश्न उत्थापित करतो.

**त्रान्स्वर्सस पेरिनियै** हा अरुंद स्नायु इस्कियमूच्या रेमसच्या आंतल्या आंगा पासून निघून, तिरपा पुढं व आंत वळून पेरिनियमूच्या मध्यावरच्या तेंदनाच्या भागांत बद्ध होतो. ह्या ठिकाणी समोरच्या स्नायूशीं, मागं स्फिंक्तर एनैशीं, आणि पुढें अक्सिलरेतर यूरेनीशीं जुळतो.

ह्या प्रकारें जुळणी झाल्यानें एक त्रिकोणाकार स्थान होतें, त्याच्या आंतल्या बाजूस अक्सिलरेतर युरेनी, व बाहेरल्या बाजूस इरेक्तरपीनिस हे स्नायु आहेत; बूड त्रान्स्वर्सस पेरिनियै स्नायुनें झाले आहे; आणि जमीन पेरिनियमूच्या खोल फाशियानें झाली आहे. ह्या स्थानातून पेरिनियमूच्या उथळ रक्तवाहिन्या अडव्या जातात, आणि मागें त्रान्स्वर्सस पेरिनियल् धमनी आडवी जाते. मुतखडा काढण्याकरितां बाजूस शस्त्रोपाय करणें झाल्यास ह्या स्थानाच्या मागल्या भागातून चाकू तिरपा खाली व बाहेर ओढून इस्कियोरेक्तल् खांचेंत आणतात, तेव्हां कातडें व उथळ फाशिया, त्रान्स्वर्ससपेरिनियै स्नायु व धमनी, अक्सिलरेतरयुरेनी स्नायूचे मागले तंतु, पेरिनियमूच्या उथळ रक्तवाहिन्या व मज्जातंतु, आणि त्याहून मागं खालची अथवा बाहेरची

हेमरैदल् धमनी, ह्या खेरीज खोल फाशिया, लेवेतरएनैचे पुढचे तंतु, कंप्रे· सरयुरिथ्रा स्नायूचा भाग, मेंब्रेनस व प्रोस्त्यातिक् भाग, व प्रोस्तेत ग्ल्यांदचा कांहीं भाग, हे भाग तुटले जातात. आक्सिलरेतरयुरैनी व इरेक्तर पीनिस हे स्नायु काढून टाकल्यावर पेरिनियमूचा खोल फाशिया उघडा पडतो.

## स्त्रियांच्या पेरिनियमूचे स्नायु.

**सिंफक्तर वेज्जायनी** म्हणजे योनीचें आकुंचन करणारा स्नायु हा योनीचें छिद्र वेष्टितो, व हा पुरुषांतल्या अक्सिलरेतरयुरैनी स्नायूशीं तुल्य आहे. हा मागें पेरिनियमूच्या मधल्या तेंदनाच्या भागास बद्ध असून स्फिंक्तरएनैशीं जुळतो, व शेवटीं ह्याचे तंतु योनीच्या प्रत्येक बाजूनें जाऊन कार्पोराक्यावर्नोजा, व क्लितारिस म्हणजे योनिलिंग, ह्या भागांवर बद्ध होतात. **इरेक्तरीक्लतरिस** म्हणजे योनिलिंग उत्थापित करणारा हा पुरुषांतल्या इरेक्तर पीनिस स्नायूशीं तुल्य आहे, परंतु त्यापेक्षां लहान आहे.

**त्रान्सूवर्ससपेरिनियै** हा स्फिंक्तरवेज्जायनीच्या बाजूवर, आणि लेवेतरएनै हा योनीच्या बाजूवर बद्ध होतो. बाकीचे सर्व स्नायु पुरुषांच्या स्नायूं सारखेच आहेत.

पेरिनियमूचा खोल फाशिया म्हणजे **त्रायांग्युलरलिगमेंत** हा दृढ पडदा औतलेतूचा पुढचा भाग बंद करतो. ह्याचा आकार त्रिकोण असून खोली १$\frac{1}{2}$ इंच आहे. ह्याचा शेंडा सिंफिसिसप्यूबिस व सब्प्यूबिक् बंधन ह्या भागांस बद्ध आहे. बाजूस हा इस्कियम् व प्यूबिस ह्यांच्या रेमैनां बद्ध आहे, व ह्याचा खालचा कांठ मागें रेक्तमूकडे झुकला असून, पेरिनियमूच्या मधल्या तेंदनयुक्त शिवणीस बद्ध आहे. त्रान्सूवर्ससपेरिनियै स्नायूच्या पुढें हा उथळ फाशियाच्या खोल थरांशीं, व लेवेतरएनै स्नायूचें बाहेरील आंग आच्छादणाऱ्या पातळ फाशियाशीं संलग्न आहे.

पेरिनियमूच्या **खोल फाशियाचे** दोन थर आहेत. **पुढचा थर** युरिथ्राच्या मेंब्रेनस भागाच्या पुढल्या भागा सभोंवतीं चालू होऊन बल्बवर नाहींसा होतो. **मागला थर** मेंब्रेनस भागाचा मागला भाग, व प्रोस्तेत ग्ल्यांदचें बाहेरील आंग ह्यांच्या सभोंवतीं मागें चालू होतो. दोहों थरांच्या मध्यें बल्बच्या

धमन्या, कौपर ह्याचे ग्ल्यांद, युरिथ्राचा मेंब्रेनस भाग, आणि कंप्रेसरयुरिथ्री स्नायु, हे भाग आहेत; ते खोल फाशियाचा पुढचा थर काढला म्हणजे उघडे पडतात.

**कंप्रेसरयुरिथ्री** स्नायु प्रत्येक बाजूस प्यूबिसच्या रेमसच्या वरल्या भागापासून निघून आंत वळतो, व विभागला जाऊन त्याचे दोन पुंजके होतात. ते प्रोस्तेतग्ल्यांदपासून बल्बपर्यंत युरिथ्रास वेष्टितात, व त्याच्या वरच्या व खालच्या आंगावर तेंदनयुक्त शिवणींत समोरच्या स्नायूशीं जुळतात.

पेरिनियमूच्या खोल फाशियाचा मागला थर व एका बाजूचा शिश्नाचा देंठ काढला असतां, लेवेतरएनै स्नायूचें खालचें अथवा पेरिनियमूकडचें आंग दृष्टिगोचर होतें.

**लेवेतरएनैस्नायु** सिंफिसिसच्या एकीकडे प्यूबिस व तिची रेमस ह्यांचें मागलें आंग, इस्कियमूच्या कंटकतुल्य भागाचें आंतलें आंग, आणि पेल्विक् फाशिया विभागून आब्तुरेतर व रेक्तोविसेकल् थर होतात, त्यांच्या मधला कोण, ह्या भागांपासून निघतो; व ह्याचे तंतु पेल्विसच्या जमिनीच्या मध्यरेषेकडे खालीं वळून पुढें सांगितल्या प्रमाणें बद्ध होतात.

मागले तंतु एकत्र जुळून एक तेंदनाची शिवण होते, ती काक्सिक्सच्या शेंड्या पासून गुदाच्या कांठा पर्यंत पोहचते; मधले तंतु रेक्तमूच्या बाजूवर बद्ध होऊन स्फिक्तर स्नायूच्या तंतूंशीं जुळतात; आणि पुढचे तंतु समोरच्या स्नायूशीं जुळण्या करितां प्रोस्तेत ग्ल्यांदच्या खालून जातात, व हे पेरिनियमूच्या मध्यावरल्या तेंदनाच्या शिवणींत स्फिक्तर एनै, व त्रान्स्वर्सस पेरिनियै, ह्या स्नायूंच्या तंतूंशीं जुळतात.

**संबंध.** वरच्या अथवा पेल्विस कडच्या आंगानें रेक्तोविसेकल् फाशियाशीं ह्याचा संबंध आहे; ह्याचें खालचें अथवा पेरिनियम् कडचें आंग इस्कियोरेक्तल् खांचेची आंतली मर्यादा होतें; मागला कांठ काक्सिजियस स्नायूशीं सलग्न आहे; पुढचा कांठ समोरच्या स्नायू पासून एका त्रिकोणाकार स्थानानें वेगळा केला आहे; त्या स्थानांतून पेल्विस मधून पुरुषांत युरिथ्रा व स्त्रियांत योनि अशीं जातात.

**क्रिया.** पोटांतून कांहीं पदार्थांचें विसर्जन करण्या साठीं वेग आली म्हणजे हा स्नायु रेक्तम्‌चा खालचा शेंडा, योनि, व मूत्राशय, ह्या भागांस उचलून धरतो. त्यामुळें ते बाहेर पडत नाहींत.

**काक्सिजियस** हा त्रिकोणाकार स्नायु इस्क्रियम्‌चा कंटक तुल्य भाग, व धाकटें सेक्रोसायातिक् बंधन, ह्या भागां पासून निघून, काक्सिक्सचा कांठ व सेक्रम्‌च्या खालच्या तुकड्याची बाजू ह्या भागांवर बुडा कडून बद्ध होतो.

**क्रिया.** मलविसर्जन होतांनां अथवा प्रसूत होतांनां काक्सिक्स मागें दबलें गेलें म्हणजे हे स्नायु त्यास उचलून धरून आश्रय देतात.

पेरिनियम्‌च्या मध्यावर जो तंदनाचा भाग आहे, तो तोडल्यावर लेवेतर एनै स्नायूचे तंतु तोडून रेक्तमूला जुळलेले भाग सोडवून तें मागें मुरडून टाकलें असतां, प्रोस्तेत ग्ल्यांदचें खालचें आंग, मूत्राशयाची मान व बूड, रेताशय, आणि रेतवाहिन्या, हे सर्व भाग उघडे पडतात. ह्या भागां विषयीं पूर्वीं वर्णन केलेंच आहे.

प्रोस्तेतच्या मागें मुत्राशयाचा एक त्रिकोणाकार भाग आहे, त्यास पुढें प्रोस्तेत ग्ल्यांद, मागें पेरितनियम्‌ची रेक्तोविसेकल् नामक घडी, आणि प्रत्येक बाजूस रेताशय व रेतवाहिनी, ह्या भागांच्या मर्यादा आहेत. ह्या स्थानास पेरितनियम्‌चें आच्छादन नाहीं, आणि मुत्रावरोध झाला असतां कित्येक प्रसंगीं मूत्र विसर्जन करविण्या साठीं ह्याच ठिकाणीं रेक्तम् मधून मूत्राशयास विंधितात अथवा छिद्र पाडतात.

## पेल्विक् फाशिया अथवा पेल्विसचा फाशिया.

**पेल्विक् फाशिया** हा पातळ पडदा पेल्विसच्या खांचेस मढवून त्रान्स्वर्सेलिस व इलियाक् फाशियाशीं सलग्न आहे. हा फाशिया पेल्विसच्या कांठा जवळ म्हणजे आंतील छिद्राजवळ, व आंतल्या आबत्युरेतर स्नायूच्या सभोंवतीं अस्थीस बद्ध आहे. ह्या स्नायूच्या मागल्या कांठा जवळ खऱ्या पेल्विसचा मागला भाग मढविण्या साठीं हा फाशिया मागें चालू होतो. हा आबत्युरेतर नळ घाटित करण्यासाठीं आब्त्यूरेतर रक्तवाहिन्यांच्या खालून कमानी सारखा पुढें जातो. पेल्विसच्या पुढल्या भागांत हा सिंफिसिस प्यूबिस ह्याला बद्ध होतो, व ह्या स्थानाच्या खालीं हा समोरच्या फाशियाशीं सलग्न हो·

ऊन पेल्विसच्या खालच्या अथवा बाहेरच्या छिद्राचा पुढचा भाग बंद करतो, आणि त्रायांग्युलर लिगमेंतच्या मागल्या थराशीं सलग्न होतो. सिंफिसिस प्यूबिस ह्याच्या खालच्या भागा पासून इस्कियमच्या उंचवटया पर्यंत जाणाऱ्या रेषेच्या सपाटी वर एक जाड पांढरा बंद आहे, तोच लेवेतरएनै स्नायूच्या बद्धस्थानाची मर्यादा आहे, व त्या जवळ पेल्विक् फाशिया विभागला जाऊन, त्याचे **आबृत्युरेतर** व **रेक्तोविसैकल्** असे दोन थर होतात.

**आबृत्युरेतर फाशिया** आबृत्युरेतेर इन्तर्नस स्नायूस आच्छादून प्युदिक् रक्तवाहिन्या व मज्जातंतु हीं पुढें पेरिनियमकडे जात असतां त्यांचा नळ घटित करतो, व लेवेतर एनै स्नायूचें खालचें अथवा पेरिनियम् कडचें आंग आच्छादणाऱ्या फाशियाशीं सलग्न होतो.

**रेक्तो विसैकल् फाशिया** लेवेतरएनै स्नायूच्या वरल्या आंगावर पेलिस् मध्यें उतरून प्रोस्तेत ग्ल्यांद, मूत्राशय, व रेक्तम्, ह्या भागांस वेष्टितो. हा सिंफिसिस प्यूबिस ह्याच्या आंतल्या आंगास बद्ध असून, ह्या आंगांग प्रोस्तेत ग्ल्यांद, व मूत्राशय, हे भाग जुळवितो. ह्या खेरीज हा रेक्तमला, मूत्राशय व प्रोस्तेत ग्ल्यांद ह्यांशीं जुळवितो.



# ह्या ग्रंथांत आलेल्या इंग्रेजी ल्याटिन वगैरे शब्दाचा कोश.

अंबलैकल्. नाभी संबंधी.
अल्ना. कूर्परास्थि.
अस्त्रागलस. जंघाधेयास्थि.
आलिमेंतरीकनाल. अन्नमार्ग.
आंकूल जाइंत. गुल्फसंधि.
आक्सिलरी. काखेचा.
आक्सिला. काख, कक्षि.
आक्सेसरी. सहायकारी.
आंतीरियर. पुढचा.
आंतिकस. पुढचा.
आदक्तर. आंत वळविणारा.
आन्यातमी. शारीर, शारीरक. शारीर शास्त्र.
आन्यास्तमातिका. संयोगी.
आनिमलम्यातर. प्राणिज अंश, प्राण्यंश.
आपान्युरोसिस. स्नायूचा प्रसृत झालेला अस्थीस बद्ध असणारा भाग.
आपेंदेज. अनुषंगिक भाग.
आब्दक्तर. बाहेर वळविणारा.
आब्दोमन. पोट, पोटाचें विवर.
आर्तिक्युलेशन. संधि.
आऱ्याक्नेदमेंब्रेन. मेंदूस वेष्टणारा सीरस लवेचा पडदा.
आक्सिपितल्बोन. शिरःपृष्ठास्थि.
आंग्युलै. कोण संबंधी.
आर्बिक्. अक्षिकोश संबंधी.
आफ्थ्याल्मिक्. नेत्रसंबंधी.
आब्लीक. तिरपा.
आब्लैकस. तिरपा, तिर्यक.
आरिकल्. कान, हृदाच्या विवरांपैकीं एक विवर.
आरिक्युलोवेंत्रिक्युलर. आरिकल व वेंत्रिकल ह्यांच्या मधील.
आर्गन. इंद्रिय.
आर्गन आफ् सेन्स. ज्ञानेंद्रिय.
आर्ग्यानिक्. सेंद्रिय.
आर्तरी. धमनी.
आर्बित. अक्षिकोश.
आसा त्रिक्वेत्रा. नेमणुकी बाहेरचीं अस्थि.
आसिस. अस्थी संबंधी.
आसक्याल्सिस. पार्ष्ण्यस्थि
आसप्युबिस. जघनास्थि.
इंग्विनल् क्यनाल्. स्पर्शानिककनाल पहा.
इंग्विनल्रीजन. नितंबास्थि देश.
इंग्विनल् हर्निया. ऊरुसंधीजवळच्या देशांतला अंतरगळ.
इंनर्मिस्., इंनर्मस., इंनर्मल्. आंतला.
इंतस्तैन. आंतडें.
इंदिसिस. तर्जनीचा.
इन्फीरियर., इन्फीरियोरिस. खालचा.
इन्फीरियर तरबिनेतबोन. ज्ञाण्यास्थि.
इन्फीरियर म्याक्सिलरी बोन. हन्वस्थि.

इनूलेत. पेल्विसचें आंतलें छिद्र.
इन्वालंतरी. स्वेच्छानधीन.
इन्सेजर्स. छेदकदंत.
इरेक्तर. उत्थापक.
इलियम्. नितंबास्थि.
इलियाक्‌रीजन. नितंबास्थिदेश.
इसाफगस. फेरिंक्सपासून पक्काशयापर्यंत पोंहचणारी अन्नमार्गाची नळी.
इस्कियम्. आसनास्थि.
इस्कियोरेक्तल्‌रीजन. पेल्विसच्या बाहेरील छिद्राचा म्हणजे औतूलेतचा देश. ह्या देशास पुढें प्यूबिसची कमान व सब्‌ प्यूबिक्‌ बंधन; मागें काक्सिक्सचा शेवट; व प्रत्येक बाजूस प्यूबिस व इस्कियम्‌ ह्या अस्थींच्या रेषे ह्या मर्यादा आहेत. गुदाच्या पुढून इस्कियमचे उंचवटे जुळविणारी आडवीरेषा काढली तर ह्या देशाचे दोन विभाग होतात, पुढल्यास पेरीनियम व मागल्यास इस्कियोरेक्तल्‌ देश म्हणतात. ह्या देशांत रेक्तम्‌चा शेवट आहे.
एअर. हवा.
एक्वियस ह्यूमर. नेत्राचा जलवत्‌ रस.
एक्स्तर्नम्, एक्स्तर्नस } बाहेरचा.
एक्स्तेन्सर. प्रसरण करणारा, प्रसारक.
एथमैदबोन. सछिद्रास्थि. हें करटीच्या अस्थींपैकीं १ आहे.
एन्दोकार्दियम्. ह्रदाचें आंतलें अंग मढविणारा सीरस त्वचेचा पडदा.
एपिग्यास्त्रिक्‌ रीजन. पक्वाशयावरचा पोटाचा देश.
एपिग्लातिस. श्वासमार्गाचा पडदा.
एपिदर्मिस. कातड्याचा उथळ थर.
एल्बो जाइंत. कोपर, कोपराचा सांधा.
ऐ. नेत्र, डोळा.
ऐबाल. नेत्रगोलक,+ नेत्रपिंड.
ऐरिस. ज्यांत कनीनिका असते तो नेत्राचा पडदा.
ओमेंतम्. पोटांतील पेरितनीयम्‌ त्वचेचे भाग.
ओरिस. मुखाचा.
ओवरी. स्त्रियांचा अंडाशय
औतूलेत. पेल्विसचें बाहेरील छिद्र.
कनैन. शूलदंत.
कन्स्त्रिक्तर. आकुंचन करणारा, आकुंचक.
कंप्रेसर. दाबणारा.
कम्यूनिकेतिंग. संयोग करणारा.
काक्सिक्स. गुदास्थि.
काक्सिजियल्‌. गुदास्थी संबंधी.
कांदैल्‌. संधी शेजारचा उंचवटा.
कामन. सामान्य, साधारण.
कामिस्यूर. मेंदूचा संयोगी भाग.
कार्तिलेज. कूर्चा.
कार्निया. नेत्राच्या बाहेरील पडद्याचा पुढचा भाग, काळें बुबूळ.
कार्पल्‌. मणगट अथवा मणिबंध ह्यांच्या संबंधी.
कार्पस. मणगट.
कालम्‌. स्तंभ.
कास्तल्‌, कास्तेलिस } फासळ्या संबंधी.
किद्नी. मूत्रपिंड. गुर्द,
कोत. पडदा, वेष्टन, आच्छादन.
कोराइद. नेत्राचा काळा पडदा.
कोलन. मोठ्या आंतड्याचा भाग.
कोलै. माने संबंधी.
क्याप्स्यूल्‌. कोश, आच्छादन, आशय.

+ नेत्रपिंड. ह्याला ३ पडदे आणि ३ रस आहेत. पडदे,—बाहेरला स्क्लेरातिक्‌ व कार्निया ह्यांनीं, मधला कोराइद ऐरिस व सिलियरी प्रोसेसेस ह्यांनीं, व आंतला रेतिना व सस्पेन्सरी लिगमेंत ह्यांनीं असे झाले आहेत; रस,— १ एक्वियस ह्यूमर. जलवत्‌ रस. २ लेन्स. स्फटिकवत्‌ रस. ३ वित्रियस ह्यूमर. कांचवत्‌ रस

क्याल् केनियम्. पार्ष्ण्यस्थि.
क्युतेनियस. चर्म संबंधी. कातड्याचा.
क्यूनिऐफार्म बोन. ग्रंथितुल्यास्थि.
क्रूरल्. देंठाचा.
क्रूरा. देंठ.
क्ल्याविकल्. जत्रु.
क्वाद्रिसेप्स. चार डोक्यांचा.
गालब्ल्याडर. पित्ताशय.
ग्यांग्लियन. ज्यांत मज्जातंतु संपतात व ज्यांपासून ते निघतात तो मज्जेचा पिंड.
ग्यास्त्रिक्. पक्काशयाचा.
ग्लान्स. शिश्नाचा मणी.
ग्लासस. जिव्हेचा.
चेंबर. नेत्राचा आशय. खोली.
जजूनम्. लहान आंतड्याचा भाग.
जाइंत. संधि.
जुग्युलर. माने संबंधी.
तान्सिल्. जिव्हेच्या बुडाजवळ असणारे दोन पिंड. हे बदामाएवढे आहेत.
तार्सस. पावलाचीं अस्थि.
तिंपनम्. कर्णेंद्रियाचा मधला भाग.
तिबिया. अंतर्जंघास्थि.
तिबियोफिब्युलर. अंतर्बहिर्जंघास्थींचा.
तीथ. दंत. हे दुधाचे अथवा कच्चे २० व अन्नाचे अथवा पक्के ३२ असतात.
तेंदन. स्नायूच्या शेंड्या कडचा रज्ज्वाकार दृढ भाग; ह्याच्या योगानें स्नायु अस्थीस बद्ध होतो.
तेन्सर. ताणणारा.
तेस्तीज, अंड.
त्युनिका अल्बुजिनिया. अंडाचा मधला पडदा.
त्युनिकाव्याजिनेलिस. अंडाचा बाहेरील पडदा.
त्युनिका व्यास्कुलोजा. अंडाचा आंतील पडदा.
त्रंक. धड— ह्याला पिंजर, पोट, व खालचें पोट, अशीं तीन विवरें आहेत.
त्रकीया. श्वासनळी.

त्राक्रिया. भुजास्थीच्या खालच्या शेंड्यावरचा कप्पी सारखा संधिभाग.
त्रान्सवर्स. आडवा.
त्रायांग्युलर. त्रिकोणाकार.
त्रायांग्युलर लिगमेंत. पेरिनियम् देशाचा खोल फाशिया.
त्रैसेप्स. तीन डोक्यांचा.
त्रोक्यांतर. ऊर्वस्थीच्या वरच्या शेंड्या वरचे दोन उंचवटे.
थोऱ्याक्स. पिंजर.
थोऱ्यासिक् पिंजर संबंधी.
थोऱ्यासिक् दक्त. भातुप वाहिनी.
दक्तस कम्युनिस कोलिदोकस. सामान्य पित्तवाहिनी.
दर्मा. कातड्याचा खोल थर.
दार्सल्. पाठीचा.
दिजिटल्. बोटांचा.
दिजिटोरम्. बोटांचा.
दिप्रेसर. खालीं दाबणारा.
दिप्लोई. करोटीच्या अस्थींच्या दोहों थरांच्या मध्यें असणारा विवरांनीं युक्त भाग.
द्युओदीनम्. लहान आंतड्याचा भाग.
देक्स्त्रा. उजवा.
द्विगास्त्रिक्. दोन पोटांचा, किंवा दोन फुगा-ऱ्यांचा स्नायु.
नर्व. मज्जातंतु.
निपल्. स्तनाग्र.
नी जाइंत. गुडघ्याचा संधि.
नेक्. मान, ग्रीवा.
नेजल् फासा. नासिकाची खाच.
नेजल् बोन. नासिकास्थि.
नोज. नासिका, नाक.
न्युरिलेमा. मज्जातंतूस वेष्टणारा पडदा.
पतेला. गुडघ्याच्या वाटीचें अस्थि.
परातिद ग्लांद. कानाजवळ असणारा लाळोत्पादक पिंड.

पर्फोरेटिंग. विंधणारा.

परैतल् बोन. सीमंतास्थि.

पल्मनरी
पल्मनेलिस } फुप्फुस संबंधी.

पान्सवेरोलियै. मेंदूचा एक भाग.

पाप्लितियल स्पेस. गुडघ्याच्या मागलें चौकोणाकार स्थान, चौकोणाची लांब कर्ण रेषा अधःशाखेच्या मधल्या रेषेंत पडते.

पाल्मर. तळ हाताचा.

पालिसिस. हाताच्या अथवा पायाच्या अंगुष्ठाचा.

पिरमिद. सुळका, शंकु.

पेरिकार्दियम्. हृत्कोश.

पेरितानियम्. पोटाच्या विवरास मढविणारी सीरस त्वचा.

पेरिनियम्. हें त्रिकोणाकार स्थान पुढें सिंफिसिसप्यूबिस, मागें इस्कियम्चे उंचवटे जुळविणारी कल्पित रेषा, व प्रत्येक बाजूस इस्कियम् व प्यूबिस ह्यांच्या रेषे म्हणजे शाखा ह्या भागांनीं मर्यादिलें आहे.

पेल्विस. खालचें पोट.

पोर्तल्. पचन संबंधी इंद्रियांच्या रक्ताभिसरणा संबंधी.

पोस्तीरियर. मागला.

पौच. थैली.

प्यांक्रीज. पोटांतलें एक इंद्रिय, लिबलिब

प्यांक्रियातिक् दक्त. प्यांक्रियातिक् जूस नामक रस नेणारी वाहिनी. ही वाहिनी पचन काळीं प्यांक्रीज ह्या इंद्रियापासून दुओदेनिम नामक जो लहान आंतड्याचा भाग त्यांत हा रस नेऊन पोंहचविते.

प्यापिला. कंटक.

प्यालेत. तालू.

प्यूपिल्. नेत्राची कनीनिका.

प्यालेतबोन. तात्वस्थि.

प्रैमै. पहिला.

प्रोनेतर. पालथें करणारा.

प्रोफंदा. खोल.

प्लसेंता. वार.

प्लांतर. तळ पायाचा.

प्लूरा. पिंजरास मढविणारी सीरस त्वचा.

प्लेक्सस. जाळें.

फनेल. गळणी, नरसाळें, चिमणी.

फंक्शन. कृत्य, क्रिया, व्यापार.

फंक्शन आफ् अनिमल् लैफ. प्राणिक्रिया.

फंक्शन आफ् आर्ग्यानिक् लैफ्. इंद्रियक्रिया.

फासा. खांच.

फिब्युला. बहिर्जंघास्थि.

फीमर. ऊर्वस्थि.

फीमेल. स्त्री.

फेमरल्. ऊरुसंबंधी, मांडीचा.

फेरिंक्स. सप्तपथ, घसा.

फेलोपियन ट्यूब. गर्भाशया पासून अंडाशया पर्यंत जाणारी नळी, हिजमधून अंडाशयापासून गर्भाशयांत अंडीं जातात.

फेल्यांजीज. हाताच्या अथवा पायाच्या बोटांचीं पेरीं.

फेशियल्. मुखाचा.

फेस. मुख.

फ्यासिक्युलस. तंतूंचा पुंजका.

फ्रांतल् बोन. ललाटास्थि.

बंदल्. जुडगा.

बर्सा. हे लहान आशय सांध्याच्या शेजारीं असतात व तेंदनाच्या वेष्टनांचा भाग होत. हे तेंदनें व अस्थि ह्यांजमध्यें घर्षण होऊं देत नाहींत.

बादी. आंग, पिंड.

बेस. बूड, पाया.

बैकस्पिद. द्व्यग्र दंत.

बैसेप्स. दोन डोक्यांचा.

बोन. अस्थि.

ब्रांकस्. श्वासनळीची शाखा.

ब्रांच. रक्तवाहिन्या, शोषक वाहिन्या इत्यादिकांच्या शाखा.

ब्रीविस. अखुड.

ब्रेकियल्. भुजसंबंधी.

ब्रेन. मेंदू.

ब्ल्याडर. मूत्राशय, क्लोमन.

मसल्. स्नायु.

मस्क्युलर. स्नायूचा.

मान्स वेनरिस. जघन.

मिदियस्तैनम्. दोहीं फुप्फुसांच्या मधलें स्थान.

मिनिमेदिजिते. हाताच्या अथवा पायाच्या करंगळीचा.

मियेतस. खोली, विवर, नाकाचें विवर.

मेजर. मोठा.

मेजेंतरी. लहान आंतड्यास कण्याशीं जुळविणारा पेरितनियमचा पडदा.

मेतातार्सल् बोन. पादांगुल्याधारास्थि.

मेदल्ला आब्लांगेता. मेंदूचा एक भाग.

मेल. पुरूष.

मेलर बोन. गंडास्थि.

मोलर्स. दाढा.

मौथ. तोंड.

म्याक्सिलरी. दाभाडा संबंधी.

म्याग्नस. मोठा.

म्यामरी ग्ल्यांद. स्तन.

युरेथ्रा. मूत्राशयापासून मूत्रविसर्जन करविणारी वाहिनी.

युरेतर. मूत्रपिंडा पासून मूत्राशयास मूत्र नेणारी वाहिनी.

युरेनी. मूत्राचा.

युतरस. गर्भाशय.

रिकरंत. उलटणारा, परतणारा.

रिंग. चक्र, अंगठी सारखें छिद्र.

रिब्ज. फासळ्या.

रिस्त जाइंत. मणगट्याचा संधि.

रीजन. देश.

रूत. मुळी.

रेक्तम्. उंदुक, मोठ्या आंतड्याचा शेवटचा भाग.

रेक्तस. नीट.

रेक्तो विसेकूल फोल्द. उंदुक व मूत्राशय ह्यांच्या मधला पदर किंवा घडी.

रेतिना. नेत्राचा आंतला पडदा, हा मज्जेचा आहे.

रेदियस. मणिबंधाधारास्थि.

लंग. फुप्फुस.

लंबर रीजन. कमरेचा देश.

लांग. } लांब.
लांगस. }

लांजिच्युदिनल्. लांब.

लाब्युल्. फुप्फुस, काळीज इत्यादिकांचा लहान गड्डा.

लार्ज इन्तेस्तीन. मोठें आंतडें.

लिगमेंत. संधिबंधन.

लिंग्वल्. जिव्हेचा.

लिम्फ्यातिक्. शोषकवाहिनी, उदकवाहिनी

लिवर. काळीज. यकृत्.

लेता. रूंद.

लेन्स. नेत्राचा स्फटिकवत् रस.

लेबियामेजोरा. उपस्थाचे बाह्यपाळी.

लेबियामिनोरा. उपस्थाचे अंतपाळी.

लेरिंक्स. कृक. कंठध्वनीचें व श्वासोच्छ्वासाचें इंद्रिय.

लेवेतर. वर उचलणारा.

लोब. मोठा गड्डा.

ल्याक्रिमल् आपरेतस. अश्रुसंबंधी यंत्र अथवा सामग्री.

ल्याक्रिमल् ग्ल्यांद. अश्रुपिंड.

वर्तिब्रा. मणका, पृष्ठकास्थि.

वल्वा. उपस्थ.

वाल्नतरी. स्वेच्छाधीन.

वाल्व. एकाच बाजूस उघडणारा पडदा.
वासदेफरन्स. रेतवाहिनी.
विट्रियस ह्यूमर. नेत्राचा कांचवत् रस.
विसिक्युलीसेमिनेलिस. रेताशय.
विस्कस. अंतरवयव.
वेजायना. योनि.
वेंट्रिकल्. ह्रदाचें विवर. कूकाचें विवर.
वेन. शीर.
वोकल् कार्ड. कंठध्वनीची रज्जु.
वोमर. फालास्थि.
शाफ्त. नळी.
शार्त. अखूड.
शोल्डर. स्कंधसंधि.
सब्म्याक्सिलरीग्ल्यांद. लालोत्पादक पिंड, हा खालच्या दाभाडाच्या खालीं आहे.
सब्लिंग्वल् ग्ल्यांद. जिव्हेच्या खालीं असणारा लालोत्पादक पिंड.
सरेतस. दांत्यांनीं युक्त भाग.
सर्वैकल्. मानेचा.
सर्वैसिस. मानेचा.
सार्कोलिमा. स्नायूस आच्छादणारा पडदा.
सिकंदे. दुसरा.
सिनिस्त्रा. डावा.
सिबेशियसग्ल्यांद. स्नेहोत्पादक पिंड.
सिलियरी प्रोसेसेस्. हे नेत्राच्या कोराइद पडद्याचा भातला व मधला थर दुमडून झालें आहेत. हे ६० पासून ८० पर्यंतीं असतात, व लेन्सच्या पुढें व ऐरिसच्या मागें आहेत.
सिस्तिकुदक्त. पित्ताशय वाहिनी.
सिस्तेमिक्. शरीर संबंधी.
सीकम. मोठ्या आंतड्याचा एक भाग.
सुदोरिफरसग्ल्यांद. घर्मोत्पादक पिंड.
सुपीरियर. वरचा.
सुपीरियर म्याक्सिलरी. ऊर्ध्वदंताधारास्थि.
सुपीरियोरिस. वरचा.
सुपैनेतर. उताणा करणारा, उत्तानक.
सेक्रम. त्रिकास्थि.
सेक्रल्. त्रिकास्थि संबंधी.
सेप्तम्. पडदा.
सेरिबेलम्. मेंदूचा लहान भाग.
सेरिब्रम्. मेंदूचा मोठा भाग.
सेरिब्रल्. मेंदूसंबंधी.
सेल्. निरनिराळ्या त्वचांस व इंद्रियांस घटित करणारे सूक्ष्म बंद आशय अथवा मूळपिंड.
सेसमैद. हीं अस्थि संधीच्या जवळ असतात, व तेंदना पासून उत्पन्न होतात. गुडघ्याच्या वाटीचें अस्थि हें ह्या जातीच्या अस्थींचें उत्तम उदाहरण होय. ह्या खेरीज दोन दोन अस्थि हातापायांच्या अंगुष्ठांच्या बुडाजवळ असतात.
सैनस. ह्या शब्दाचे दोन अर्थ आहेत.
१ मेंदूच्या दूरामेतर नामक पडद्यानें घटित झालेले नळ ह्यांतून काळसर रक्त वाहतें. उदाहरण वरचें लांजित्यूदिनल् सैनस इत्यादि.
२ अस्थींमधील विवरें जसें फ्रांतल्, स्फीनैदल्, व एथमैदल् सैनसेस लेरिंक्सचें म्हणजे कूकाचें सैनस.
स्कल्. मस्तक.
स्किन. चर्म, कातडें.
स्केलितन. अस्थिपंजर.
स्क्रोतम्. वृषण, अंडकोश.
स्क्लिरातिक्. हा नेत्राच्या बाहेरील पडद्याचा भाग आहे. ह्याचा रंग पांढरा आहे.
स्तमक्. पक्वाशय.
स्तर्नम्. उरोस्थि.
स्त्रिक्चर. अटकाव.
स्पर्म्यातिक् कनाल. हा नळ आहे, ह्यांतून पुरुषांत अंड रज्जू व स्त्रियांत रौंदलिगमेंत हे भाग जातात.

सम्पॅथेटिक् कार्ड. अंडरज्जु.
स्पैन. कणा, रीढक.
स्प्लीन. प्लीहा.
स्फिंक्तर. आकुंचन करणारा, आकुंचक
स्फीनॅद बोन. शीर्षतलास्थि.
स्टमक. आशय.
हार्नेया. अंतर्गळ.
हार्त. हृदय.
हिप्जाइंत. ऊरुसंधि.
हिप्यातिक्. काळजाचा.
हिप्यातिक् दक्त. पित्तवाहिनी.
हेअर फालिक्लस. केशाचें ग्व्हांद.
हैपोकाँद्रियाक् रीजन. खोट्या फासळ्यांच्या कूर्चा खालचा पोटाचा देश.
हैपोग्यास्त्रिक्रीजन. नाभीच्या खालचा पोटाचा देश.
हैयॅदबोन. जिव्हास्थि.
हैलस. प्लीहेच्या व मूत्रपिंडाच्या आंतल्या काठावरची चीर. ह्या चिरांतून रक्तवाहिन्या, शोषकवाहिन्या व मज्जातंतु जाण्या येण्याचा मार्ग आहे.
हैलॅद मेंब्रेन. नेत्राच्या काचवत् रसाचें आच्छादन.
ह्यूमर. नेत्राचा रस.
ह्यूमरस. भुजास्थि.

---

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३ | १२ | साधाणर | साधारण |
| १० | २७ | मेनिजियल | मेनिंजियल |
| १२ | ९ | त्राक्लियेरिल | त्राक्लियेरिस |
| १३ | ३ | ह्याचें | स्क्वेमस भागाचें |
| १३ | १० | फांसा | फाशिया |
| १३ | २२ | खबर रीत | खरबरीत |
| १४ | ८ | ह्मणातात | म्हणतात |
| १४ | ११ | फेलेपियन | फेळोपियन |
| १४ | १७ | कर्णेंदियाच्या | कर्णेंद्रियाच्या |
| १४ | २५ | जोत | जाते |
| १४ | २७ | हा भाग | पीत्रस भाग |
| १४ | २८ | हा नळीं | ही नळी |
| १५ | ३ | स्फानेंद | स्फीनेंद |
| १५ | ७ | जिजोम्यातिक | जिगोम्यातिक् |
| १५ | १४ | क्यावनस | क्यावर्नस |
| १७ | ६ | २ परैतल | २ परैतूल |
| २२ | ३ | बाहेरचें आंग | आंतलें आंग |
| २२ | ३ | आंतलें | बाहेरलें |
| २२ | १७ | चौपेलू | चौपैलू |
| २५ | १६ | चौपेलू | चौपैलू |
| २८ | ११ | आस्थि | अस्थि |
| २९ | २८ | ल्यासरम, मिदियम, | ल्यासरममीदियम |
| ३१ | २२ | झुकलेले. | झुकलेले, |
| ३१ | २२ | इंचाच्या | इंचांच्या |
| ३३ | १० | ह्या भागाच्या व ग्रंथीच्या बाहेर | ह्या भागाच्या बाहेर |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३३ | १६ | आंगच्या | आंगाच्या |
| ३४ | १४ | इतालिक $S$ एस | इतालिक $f$ एस |
| ३४ | २४ | नळीच्या | नळीचें |
| ३७ | २२ | खऱ्यामा नेपासून | खऱ्यामाने पासून |
| ३८ | २८ | त्रिकोकार | त्रिकोणाकार |
| ४२ | ७ | उंचखोल | उंच खाल |
| ४५ | १४ | इंद्रियास | इंद्रियांस |
| ५० | २४ | त्रोक्यांतरा | त्रोक्यांतरांच्या |
| ५१ | १२ | उंचबटा | उंचवटा |
| ५१ | १३ | वरतीं | वरतीं |
| ५६ | ५ | स्केफेद | दुसरें मेतातार्सल अस्थि |
| ६१ | २५ | ह्याच्या | ह्यांच्या |
| ६७ | २ | बैसेष्स | बैसेप्स |
| ६७ | २४ | उवंचस्या | उंचवऱ्या |
| ६८ | २३ | ह्यांच्या | ह्याच्या |
| ६८ | २६ | रिद्यस | रेदियस |
| ६८ | २६ | कारेकैद | कारोनैद |
| ६९ | २१ | ह्यास | ह्यांस |
| ६९ | २६ | ह्यांपासून | ह्या पासून |
| ७४ | २-३ | लिगमेतम् | लिगमेंतम् |
| ७४ | ६ | ह्याला लिगमेंतम् तीरीज म्हणतात. | |
| ७५ | २० | लिंगमेतम् पतेला | लिगमेंतम् पतेला |
| ७७ | २२ | अस्त्रागलेद | अस्त्रागलैद |
| ८३ | १३ | अर्ब्रिक्युलेरि | अर्विक्युलेरिस |
| ९१ | १ | जीभे | जीभ |
| ९५ | ८ | द्यावें | द्यावे |
| ९६ | ९ | कंठकतुल्य | कंटकतुल्य |
| ९९ | १४ | बोटासाख्या | बोटासारख्या |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १०१ | २६ | सिंफिससच्या | सिंफिसिसच्या |
| १०३ | १५ | कूर्चा पासून | कूर्चां पासून |
| १०३ | १६ | ग्रंथी पर्यंत | ग्रंथीं पर्यंत |
| १०४ | २० | त्रान्स्वर्तेलिसच्या | त्रान्स्वर्सेलिसच्या |
| १०४ | २२ | सोअस वक्वाद्रितस | सोअस व क्वाद्रितस |
| १०५ | ९ | चौपेलू | चौपेलू |
| १०५ | १३ | गोल बाह्य | गोलबाह्य |
| १०५ | १६ | प्वांक्रीज, | प्यांक्रीज, |
| १०६ | ४ | सवक्लेवियस | सवक्लेवियस |
| १०६ | ११ | थें कातडें | एथें कातडें |
| १०७ | १४ | चौपेलू | चौपेलू |
| १०९ | ५ | क्वयाविकल | क्वयाविकूलू |
| १११ | ६ | अंतीरियर ह्यमरल रीजन | अंतीरियर ह्यूमरल रीजन |
| ११३ | १ | ह्यांच्य विरुद्ध | ह्यांच्या विरुद्ध |
| ११९ | १० | उचवटा | उंचवटा |
| १२० | १२ | दान | दोन |
| १२१ | १ | हेरेदियस | हे रेदियस |
| १२४ | १५ | आकाराच्या | आकाराचा |
| १२९ | १० | लागत | लगत |
| १३१ | १२ | वद्ध | बद्ध |
| १३५ | १० | फिव्युलर रीजन | फिब्युलर रीजन |
| १३५ | २४ | फ्लेक्सर | एक्स्तन्सर |
| १३७ | ८ | प्लांतरेसि | प्लांतरिस |
| १४५ | १९-२० | प्रस, रण | प्रसरण |
| १४६ | १७ | सेल्युर | सेल्युलर |
| १४९ | १७ | दिसेंदिंग पोर्शन | दिसेंदिंग पोर्शन |
| १५० | ५ | उजवीडके | उजवीकडे |
| १५० | ९ | आगाची | आंगाची |
| १५० | १० | जवी | उजवी |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १५० | १२ | कमान करातिद | कामन करातिद |
| १५३ | १८ | संवध | संबंध |
| १५४ | ८ | वाहेर | बाहेर |
| १५५ | २१ | पराति दग्लांद | परातिद् ग्ल्यांद |
| १६० | ६ | दपि | दीप |
| १६४ | ४ | आर्ब्रितल | आर्बितूल् |
| १६५ | २० | आत्पिक मज्जातंतु | आत्पिक मज्जातंतु, |
| १६८ | १७ | डावी सबूक्लेबायन | डावी सबूक्लेवियन |
| १७२ | ११ | मागली कम्युनिकेतिंग | पुढली कम्युनिकेतिंग |
| १७३ | १९ | दायदैक्रम | दैक्रम |
| १७३ | २२ | म्याममगिच्या | म्यामरीच्या |
| १७७ | २२ | त्याच्या | त्यांच्या |
| १९० | १ | हिप्यातिक | हिप्यातिक् |
| १९८ | १ | शाखा खेरीज | शाखां खेरीज |
| २१० | २० | ज्यांमध्यें | मध्यें |
| २१६ | २४ | वरच्य | वरच्या |
| २१९ | ८ | अब्सार्वेत्स | अब्सार्वेत्स |
| २१९ | ११ | आतड्याच्या | आंतड्याच्या |
| २२१ | १० | ग्यांदची | ग्ल्यांदची |
| २४६ | २१ | फेशियल पोर्शियोडुरा | फेशियल्. पोर्शियोडूरा |
| २४६ | २६ | ६ वा | ७ वा |
| २४७ | १३ | मज्जा ततु | मज्जातंतु. |
| २४७ | १५ | मज्जतंतु. | मज्जातंतु |
| २४८ | ११ | सच्छिद्र | सछिद्र |
| २४९ | १३ | क्लैनेद | क्लैनेद |
| २४९ | २१ | वरचा आब्क्लीक | लेवेतरप्यालूपिब्री |
| २५१ | १५ | प्याल ब्रीवर | प्यालूपिब्रीवर |
| २५३ | २४ | वाजूस | बाजूस |
| २५४ | ४ | दैम्पास्त्रिकू | दैग्पास्त्रिकू |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २५४ | १६ | ंयाच | त्याच |
| २५६ | १२ | इन्फ्रात्राकियर | इन्फ्रात्राक्लियर |
| २५६ | १३ | काजेंक्तैवा | कांजेंक्तैवा |
| २५६ | १६ | ग्यांल्लियन | ग्यांग्लियन |
| २५८ | १३ | संबधी | संबंधी |
| २५९ | १९ | सबम्यास्क्सलरी | सब्म्याक्सिलरी |
| २६४ | १० | असें | असे |
| २७३ | १३ | शाख | शाखा |
| २८५ | १७ | बाटे | बोट |
| २९० | ७ | ह | हा |
| २९२ | १२ | रनिल | रीनल |
| २९२ | २६ | सुप्रारनिल | सुप्रारीनल |
| २९५ | ३ | ग्यांग्लियां | ग्यांग्लियन |
| २९७ | १४ | असन | असून |
| २९८ | १९ | ळवे | तळवे |
| ३०० | ११ | बरचे | वरचे |
| ३०० | १६ | ल्यांद | ग्ल्यांद |
| ३०४ | १५ | आसांशीं | आंसांशीं |
| ३१४ | १६ | हलवया | हलावया |
| ३२४ | ६ | ग्लांदचा | ग्ल्यांदचा |
| ३२४ | १८ | सिंफिसि सला | सिंफिसिसला |
| ३२४ | १९ | दक्तस रिविनिय नै | दक्तस रिविनियने |
| ३२४ | २३ | आ शय | आशय |
| ३२४ | २६ | ज वळ | जवळ |
| ३३० | १० | का ळजाचें | काळजाचें |
| ३३१ | २६ | तनि | तीन |
| ३४२ | २४ | शतिज्वरादि | शीतज्वरादि |
| ३४३ | ३ | हलैस | हैलस |
| ३४४ | ४ | इन्तर कास्तल स्नायु | इन्तर कास्तल स्नायु; |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३४९ | ८ | डाव्याा | डाव्या |
| ३४९ | २८ | वेंत्रिकलांत | आरिकलांत |
| ३५० | १४ | गंडाळतात, | गुंडाळतात, |
| ३५१ | ११ | वीना केवां पासून | वीनाकेवा पासून |
| ३५३ | १० | कुचचा | कूर्चेच्या |
| ३५६ | २१ | नळा | नळी |
| ३५७ | १९ | स्वेच्छाधीन | स्वेच्छानधीन |
| ३६४ | १५ | हलैस | हैलस |
| ३६६ | १९ | पारांर्ची | शिरांचीं |
| ३७१ | २५ | हाते | होत |
| ३७२ | १३ | ३ इंच | ३/४ इंच |
| ३७८ | ३ | वाहेरचा | बाहेरचा |
| ३८१ | २१ | ओवरी लिंगमेंत, | ओवरीचें लिगमेंत, |
| ३८५ | २१ | तेथें. | तेथें |
| ३८७ | १५ | लिंगमेंत | लिगमेंत |
| ३८७ | २३ | आब्लिाक | आब्लिक |
| ३९२ | ४ | फमरल | फेमरल |
| ३९६ | २४ | बाजूच | बाजूचे |
| ४०० | २८ | वद्ध | बद्ध |

# वर्णवार अनुक्रमणिका.



